# आमच्या आयुष्यांतील कांहीं

# आठवणी.



हें पुस्तक

कै० श्रीमती रमाबाई रानडे

यांनीं लिहिलें.



[ सहावी आवृत्ति. ]

१९३५.

किंमत १२ आणे.



माझी प्रिय कन्या

# कै. सौ. सखूताई विद्वांस

हिला

अत्यंत प्रेमानें

## हें पुस्तक

## अर्पण करीत आहें.

मुलीचें मन जात्याच कोमळ. तशांत आम्ही मुंबईहून पुण्यास आल्यावर तर ती सदोदित मला चिकटून असे व मला काय पाहिजे असेल, कशानें मला हलकं वाटेल, या योजनेंत असे. पोरवय तरी माझ्या अंतःकरणाला वाव मिळावा म्हणून मला सुखकर अशा आठवणी काढून माझें समाधान व्हावें असा ती प्रयत्न करी. याप्रमाणें या पुस्तकांत दिलेल्या कांहीं गोष्टी ऐकून ती एके दिवशीं मला म्हणाली, कीं, या तूं लिहून काढल्यास तर पुष्कळांना वाचावयाला नाहीं का मिळावयाच्या! नाहीं तर आमच्याकरितां तरी त्या लिहून काढ.

यावरून हें पुस्तक लिहिण्याचें मीं हातीं घेतलें. पण तें प्रसिद्ध झालेलें पाहण्यास माझी प्रिय कन्या दुर्दैवानें राहिली नाहीं! तरी याची हस्तलिखित प्रत बहुतेक तिच्या वाचण्यांत आली व तींत तिनें मार्मिकतेनें केलेल्या सूचनांचाही उपयोग करण्यांत आला.

याप्रमाणें तिच्या प्रेमामुळेंच हें पुस्तक लिहिण्याचें झालें म्हणून तिला हें मी अर्पण करीत आहें

पुणें, ता. २ फेब्रुवारी, सन १९१०.

रमाबाई रानडे

# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना.

कै० न्या० रावसाहेब रानडे यांचे संबंधाचा ग्रंथ व तो श्री० वहिनीबाई-साहेब रानडे यांनीं लिहिलेला—तेव्हां अशा ग्रंथास इतर कोणी प्रस्तावना लिहिण्याचें कारण नाहीं; पण श्री० वहिनीबाईनीं प्रदर्शित केलेली इच्छा म्हणजे एक प्रकारची आज्ञा, तिचें उल्लंघन करणें मला शक्य नाही, म्हणून मी पुढील दोन शब्द लिहीत आहें.

रावसाहेब रानडे हे एकोणिसाव्या शतकाची शेवटची तीस वर्षें प्रथम महाराष्ट्रांतील व पुढें सर्व हिंदुस्थानांतील राष्ट्रोन्नतीच्या नानाविध चळवळींचे केवळ आधारस्तंभच नव्हेत तर आद्यप्रवर्तक होते, ही गोष्ट आतां कोणास नव्यानें सांगितली पाहिजे असें नाहीं. त्यांची विशाल, व्यापक व तेजस्वी बुद्धि, अगाध ज्ञान, प्रचंड व्यासंग व अलौकिक आकर्षणशक्ति, हीं सर्व त्यांनीं एकनिष्ठपणें देशसेवेस वाहिलीं होतीं. ही आपली आर्यभूमि सर्वांग-सुंदर कशानें होईल, सामाजिक, राजकीय, धार्मिक, नैतिक, औद्योगिक, शिक्षणविषयक या सर्व बाबतींत हिचें पाऊल पुढें कसें पडेल, इष्ट प्रकारची प्रगति घडून येण्यास अवश्य असणारे गुण आपल्या समाजांतील स्त्रीपुरुषांचे अंगीं कसे येतील, या गोष्टींशिवाय दुसरा विचार त्यांचे मनास रात्रंदिवस माहीत नव्हता. अशी उज्ज्वल देशभक्ति, व देशोन्नतीसाठीं चाललेल्या प्रयत्नांवर एवढी दृढ श्रद्धा, कोठल्याही देशांत का होईना, क्वचितच आढळून येते. पण रावसाहेब रानड्यांची गणना या देशांतीलच नव्हे तर सर्व जगांतील अत्यंत श्रेष्ठ विभूतींमध्यें जी करावयाची ती केवळ त्यांच्या बुद्धिवैभवामुळें—विद्वत्तेमुळें अगर देशभक्तीमुळें नव्हे. हे गुण तर अगदीं असामान्य खरेच—इतके असामान्य—कीं पुष्कळांना त्यांपैकीं केवळ एके-काच्या जोरावरच जगांत मोठें नांव मिळवून जातां आलें असतें—पण याही-पेक्षां असामान्य अशी चित्तवृत्ति रावसाहेबांचे ठायीं वसत होती. अशी चित्तवृत्ति सहसा महान् साधुसंत खेरीजकरून इतरांचे ठिकाणीं दिसून येत नाहीं. या चित्तवृत्तीमध्यें अनेक सात्त्विक गुणांचा पूर्ण विकास झाला होता.

व रावसाहेबांचे अंगीं असलेल्या ईश्वरी अंशाची ही साक्ष मनास पूर्णपणें पटवीत असे. रावसाहेबांचा जन्म जर कांहीं शतकांपूर्वी झाला असता तर त्यांची गणना अवतारी पुरुषांमध्यें खास झाली असती. अशी विभूति ज्या राष्ट्रास हल्लींच्या काळांत लाधली त्यांस आपल्या भावी स्थितीबद्दल निराश होण्याचें कारण नाहीं.

रावसाहेबांच्या सार्वजनिक कामाचा व्याप इतका मोठा असे, कीं, त्याची सविस्तर हकिकत लिहूं म्हटल्यास लिहिणारास या देशाचा सुमारें तीस वर्षांचा इतिहास लिहावा लागेल. निदान तेवढ्या अवधींत ज्या अनेक महत्त्वाच्या सार्वजनिक संस्था निघाल्या व चळवळी अस्तित्वांत आल्या त्यांपैकीं बहुतेकांची हकीकत द्यावी लागेल. हें काम कांहीं सोपें नाहीं, तथापि राष्ट्रहिताच्या दृष्टीनें व भावी पिढ्यांस मार्ग दाखवून देण्यासाठीं तें झालें पाहिजे, हें उघड आहे. रावसाहेबांच्या चरणांपाशीं बसून देशकार्याचा धडा शिकण्याची ज्यांना अमोल संधि मिळाली व पुत्रवत् प्रेमानें वागवून मोठ्या आस्थेनें व काळजीनें ज्यांना रावसाहेबांनीं सार्वजनिक कामाचा मार्ग सुलभ करून दिला, त्यांच्या शिरावर ही एक पवित्र जबाबदारी आहे, यांत शंका नाहीं. त्या जबाबदारींतून ते कधीं व कसे पार पडतील ते पडोत, पण रावसाहेबांच्या लोकोत्तर गुणांमुळें त्यांच्या आयुष्याचा सार्वजनिक भाग जसा अत्यंत महत्त्वाचा व चिरस्मरणीय होऊन गेला, त्याचप्रमाणें वर सांगितलेल्या साधुसंतांस **साजे** अशा त्यांच्या स्वभावामुळें त्यांचा खाजगी आयुष्यक्रमही अत्यंत हृदयंगम व बोधपर झाला. या खाजगी आयुष्यक्रमाचें चित्र प्रस्तुत पुस्तकांत काढून श्री० वहिनिबाईंनीं तें वाचकांपुढें ठेविलें आहे.

या पुस्तकांत रावसाहेबांच्या सार्वजनिक चरित्राचा भाग मुळींच आलेला नाहीं, असें नाहीं. रावसाहेब अहर्निश देशकार्यांत इतके मग्न असत, कीं, त्यांच्या अत्यंत खाजगी विचारांत, वर्तनांत अगर बोलण्यांत देखील सार्वजनिक कामाचा कांहींतरी संबंध आल्यावांचून राहणें शक्य नव्हतें; पण या 'आठवणी' लिहितांना वहिनिबाईंचा प्रधान हेतु सार्वजनिक गोष्टींचा उल्लेख करण्याचा नसून रावसाहेबांच्या एकंदर आयुष्यक्रमाचें चित्र महाराष्ट्रीयांपुढें नीटपणें ठेवण्यासाठीं त्यांना स्वतःस असलेली व त्यांनीं इतरांपासून मिळविलेली खाजगी माहिती प्रसिद्ध करण्याचा आहे. या पुस्तकास 'आमच्या

आयुष्यांतील कांहीं आठवणी ' हें नांव दिलें आहे, तें यथायोग्य आहे. हें पुस्तक म्हणजे रावसाहेबांचें साग्र, संगतवार लिहिलेलें चरित्र नव्हे. तसेंच या 'आठवणी Reminiscences' कांहीं रोजनिशींवरून अगर इतर लेखी आधारावरून लिहिलेल्या नाहींत. वेळोवेळीं घडलेल्या गोष्टी व झालेलीं संभाषणें कांहीं सहज व कांहीं विशेष कारणांमुळें ध्यानांत राहिलीं तीं आठवलीं तशीं सध्यांचे स्थितींत अंतःकरणाचें सांत्वन करण्यासाठीं व जो श्रेष्ठतम सहवास आतां प्रत्यक्ष राहिला नाहीं त्याचा मानसिक रीतीनें अनुभव घेण्यासाठीं वहिनी-बाईनीं कागदावर मांडलीं व तीं आतां वाचकांस सादर केलीं आहेत. अनु-पमेय भक्ति व निःसीम प्रेम या भावनांनीं या 'आठवणी' लिहिल्या आहेत, त्या सहानुभूतिपूर्ण अंतःकरणांनीं वाचक वाचतील, अशी आशा आहे.

हा ग्रंथ लिहिण्याचें श्री. वहिनीबाईनीं मनांत आणिलें व हातीं घेतलेलें काम तडीसही नेलें, हें महाराष्ट्राचें मोठें भाग्य समजलें पाहिजे. पत्नीनें आपल्या पतीबद्दल अशा तऱ्हेनें लिहिलेला हा पहिलाच ग्रंथ हिंदुस्थानांत आहे असें वाटतें, व तो वहिनीबाईनीं लिहिला हें फार योग्य झालें. कारण, हल्लींच्या काळांत आपल्या इकडील स्त्रियांत श्री० वहिनीबाईची योग्यता फार मोठी आहे. आपल्या वयाचीं सत्तावीस वर्षे ज्यांनीं त्या विभूतीबरोबर त्यांची सहधर्मचारिणी या नात्यानें 'सावली' प्रमाणें घालविलीं, ज्यांच्या अंगचें नैसर्गिक तेज शिक्षणानें व अतिथोर सहवासानें अनेकपटींनीं वृद्धिंगत झालें, व ज्यांचें मन रावसाहेबांच्या भक्तींत कायमचें गढून राहिलें आहे, त्यांनीं आपल्या दिगंतकीर्ति पतीच्या स्वभावाचें व आयुष्यक्रमाचें काढलेलें चित्र आपणांस पहावयास मिळाल्याबद्दल महाराष्ट्रांतील लोकांस अभिमान व समाधान वाटणें साहजिक आहे.

हें पुस्तक वाचणाराचे मनावर ज्या कित्येक गोष्टींचा विशेष ठसा उमटल्या-शिवाय रहाणार नाहीं, त्यांपैकीं एकदोहोंचा येथें उल्लेख करणें जरूर वाटतें. पाश्चात्य समाजांत पुष्कळ कुटुंबांत पतिपत्नीमध्यें पराकाष्ठेचें प्रेम आढळतें, पण त्यांचा परस्परभाव बहुतेक बरोबरीचा असतो; पण तशा तऱ्हेचेंच प्रेम उभयतांमध्यें असतां पत्नीनें पतीच्या सेवेस आपणांस सर्वस्वीं वाहून घेऊन त्यांतच धन्यता मानावी, हा पूर्वेकडील स्त्रियांचा व त्यांतही हिंदुस्थानांतील स्त्रियांचा विशेष मनोधर्म आहे. हा मनोधर्म हजारों वर्षांच्या संस्काराचें व पर-

परेचें फल आहे व त्याचें अत्यंत मोहक स्वरूप या पुस्तकांत दिसून येत आहे. नवें शिक्षण, नव्या कल्पना व नवी परिस्थिति यांनीं विचारांस व आयुष्य-क्रमास नवें वळण लागलें असतांही वहिनीबाईसारख्या स्त्रियांचा हा मनोधर्म आहे तसाच कायम राहतो, यापासून पुष्कळ बोध घेतां येण्यासारखा आहे. दुसरी गोष्ट वाचकांच्या विशेष लक्षांत येईल ती जी पिढी आतां बहुतेक जात चालली आहे, तिला स्त्रीशिक्षण वगैरे समाजसुधारणेचे बाबतींत ज्या अडचणी सोसाव्या लागल्या त्यासंबंधाची होय. सध्यांच्या पिढीस या अडचणीची फारशी कल्पना नाहीं व कांहीं कालानें त्या अजीबात नाहींशा होतील हें स्पष्ट दिसत आहे. तथापि आरंभींच्या लोकांस त्यांपासून कसा दुःसह त्रास झाला, व त्यांनीं तो सोसून समाजावर केवढे उपकार केले, याची आठवण आपणांमधून जाऊं देणें केव्हांही इष्ट होणार नाहीं. ही आठवण कायम ठेवण्याचे कामीं प्रस्तुत ग्रंथाचा उत्कृष्ट उपयोग होईल व याही दृष्टीनें तो लिहिल्याबद्दल श्री० वहिनीबाईंचें अभिनंदन करणें जरूर आहे.

सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी,<br>पुणें, ता. २० एप्रिल, १९१०.

**गोपाळ कृष्ण गोखले.**

# चौथ्या आवृत्तीची प्रस्तावना.



"**आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी**" ह्या कै० श्री० रमा-बाईसाहेब रानडे ह्यांच्या पुस्तकाला प्रस्तावनेदाखल 'दोन शब्द' १९१० इ० स० सालीं माझे परमपूज्य राजकीय गुरु कै० गोपाळराव गोखले यांनीं लिहिले. लोकवंद्य महर्षि रावसाहेब रानडे ह्यांच्या "खाजगी आयुष्यक्रमाचें सुंदर व हृदयंगम चित्र" ह्या सरस '**आठवणींत**' श्री० वहिनीसाहेब यांनीं उत्तम प्रकारें रेखाटिलें आहे; त्यांची योग्यता किती मोठी आहे ह्याचें उत्कट वर्णन कै० गोपाळराव गोखले यांनीं आपल्या अधिकारयुक्त लेखणीनें प्रस्तावनेदाखल लिहिलेल्या आपल्या प्रगल्भ **दोन शब्दांत** केलेंच आहे. ती त्यांची सर्वच प्रस्तावना किंवा दोन शब्द फारच महत्त्वाचे असल्यामुळें—आणि विशेषतः तिच्या शेवटच्या प्यारिग्राफांत केलेल्या एकदोन गोष्टींचा उल्लेख या पुस्तकाचा सारभूत असल्याकारणानें त्यांच्याकडेच वाचकांचें लक्ष वेधिलें म्हणजे पुरे आहे; त्यांत जास्त भर घालून त्या मार्मिक शब्दांचें रहस्य मी कमी करूं इच्छीत नाहीं.

तथापि ह्या चौथ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत इतर कित्येक गोष्टींचा निर्देश करणें मला इष्ट दिसतें. कारण तसें करण्यास आजपर्यंत मला संधीच मिळाली नाहीं. '**आठवणींची**' पहिली आवृत्ति काढिल्यानंतर आपल्या या पुस्तकाचे सर्व हक्क श्री० वहिनीसाहेबांनीं पुणें सेवा-सदन (सोसायटीस) या संस्थेस अर्पण केले व या संस्थेवर मातृतुल्य असलेल्या त्यांच्या अकृत्रिम व निःसीम प्रेमाला हें त्यांचें करणें अनुरूपच झालें. पुढें या उत्कृष्ट ग्रंथाचें भाषांतर गुजराथी भाषेंत **श्रीमती सौभाग्यवती भद्राबाई माडगांवकर-नामदार जस्टिस मि० माडगांवकर** यांच्या पत्नी-ह्यांनीं मोठ्या उत्साहानें करून दिलें. न्यायमूर्ति रानडे ह्यांच्यासंबंधानें त्यांच्याच पत्नीनें लिहिलेल्या '**आठवणींची**' गुजराथींत प्रतिकृति करण्यास न्यायमूर्ति माडगांवकर ह्यांच्या **पत्नीनींच** पुढें यावें, हेंही यथोचित झालें असें कोण म्हणणार नाहीं! या त्यांच्या उपकाराबद्दल पुणें सेवासदन सोसायटी त्यांची

कार ऋणी आहे. पुणें सेवा-सदनानेंही तें भाषांतर मुंबईच्या गुजराथी प्रेसमध्यें छापून प्रसिद्ध केलें व त्याच छापखान्याच्या मार्फत या भाषांतराच्या दोन हजार प्रति काढून खपविल्या.

पुढें **मासिक-मनोरंजनाचे** मालक माझे मित्र कै० काशिनाथ रघुनाथ मित्र ह्यांना '**आठवणींची**' आणखी एक आवृत्ति काढण्याची परवानगी अल्प मोबदला घेऊन सोसायटीनें माझ्यामार्फत दिली. पुढें त्यांनीं 'पायका' टाइपांत आणखी एक आवृत्ति छापून घेऊन आपल्या **मासिक मनोरंजना**-बरोबर 'बक्षिस' पुस्तकाच्या रूपानें आपल्या वर्गणीदारांस या पुस्तकाच्या हजारों प्रति वांटल्या. मनोरंजनाच्या वाचक-वर्गांत स्त्रीवाचकांची संख्या प्रायः मोठी असल्यामुळें मित्रांचें हें दानही 'देशे काले च पात्रेच' झालें यांत संशय नाहीं. सारांश, कॉपी राईटसह पुस्तकाचे सर्व हक्क कै० वहिनी-साहेबांनीं संस्थेस इ. स. १९१२ मध्यें देऊन तिला आपलें कायमचें ऋणी करून ठेविलें आहे. ह्यामुळें त्याच वर्षाच्या डिसेंबर महिन्यांत त्यांना उद्देशून एक आभारदर्शक ठराव कौन्सिलानें पास केला आहे. शिवाय या पुस्तकाच्या कॉपी-राइटच्या हक्कासंबंधीं श्रीमती वहिनीसाहेब यांनीं स्वतः केलेल्या आपल्या शेवटच्या,—म्हणजे ता. २३ एप्रिल १९२४ इ० स० च्या, मृत्युपत्रांतील सहाव्या प्यान्यांत खालीलप्रमाणें उल्लेखही केला आहेः—

"**माझा 'आमच्या आयुष्यांतील आठवणी' याचे कापी-राइट पुणें सेवा-सदनास ( सोसायटीस ) मीं दिलाच आहे.**"

तेव्हां अशा निर्णायक रीतीनें हें पुस्तक सोसायटीस दिल्याबद्दल आमच्या सोसायटीच्या वतीनें त्यांच्या पश्चात् कां होईना, त्यांचे सार्वजनिक रीतीनें आभार मानणें मला येथें अवश्य वाटतें व तसें मी मोठ्या आनंदानें करीत आहें.

गुजराथींत '**आठवणींचें**' भाषांतर झाल्याचा उल्लेख वर आलाच आहे. त्याचें अनुकरण करून इतर देशी भाषांतूनही ह्या अत्यंत बोधपर पुस्तकाचें भाषांतर होणें सर्वतोपरी इष्ट आहे; कारण रावसाहेबांच्या चरित्राचा संबंध कुटुंबविशिष्ट किंवा प्रांतविशिष्ट नसून तो राष्ट्रविशिष्ट आहे. तसेंच वहिनी-साहेब म्हणजे रावसाहेबांची 'सावली' अर्थात् त्यांची इहलोकची यात्राही

राष्ट्रीयस्वरूपाची होय. तेव्हां अशा महनीय पतिपत्नींचा संबंध असलेल्या ह्या '**आठवणींचें**' भाषांतर राष्ट्रांतील भिन्न भिन्न देशी भाषांत होणें अत्यंत जरूर आहे व तें करण्यास कोणी ग्रंथकारांनीं परवानगी मागितल्यास आमची सोसायटी ती सुलभ अटींवर मोठ्या आनंदानें देईल. विशेषतः सौ० भद्राबाईंचा कित्ता गिरवून असे प्रयत्न करण्यास लेखिकाच पुढें आल्यास आम्ही त्यांचें मोठ्या प्रेमानें कौतुक करून त्यांस सर्व प्रकारें साहाय्य करण्यास एका पायावर तयार होऊं.

शेवटीं पुस्तकाच्या योग्यतेसंबंधानेंही दोन शब्द लिहिणें अस्थानीं होणार नाहीं. रावसाहेबांच्या परिचयाचा ज्यांना लाभ घडला ते भाग्यवान्. मला सुदैवानें हें भाग्य लाधलें होतें. ज्यांच्या नशिबीं तें नव्हतें त्यांना या महात्म्याच्या थोरवीची खूण या पुस्तकाच्या द्वारें पटेल. "रावसाहेबांच्या एकंदर आयुष्यक्रमाचें चित्र, महाराष्ट्रीयांपुढें ठेवण्यासाठीं" ह्या '**आठवणींचा**' जन्म, व त्यांना जन्मदात्या प्रत्यक्ष वहिनीसाहेब, ह्यांतच ह्या पुस्तकाचें **रहस्य** आहे.

महाराष्ट्र-वाङ्मयामध्यें **वस्तुतः** वाचनीय अशीं शें-दोनशें पुस्तकें निवडक काढिलीं, तर त्यांत ह्या '**आठवणींना**' बरेंच वरचें स्थान द्यावें लागेल. मागें अशाच प्रकारच्या पुस्तकांची एक यादी खुद्द रावसाहेबांनीं तयार केली होती व सर जॉन लबक ह्यांच्या एका ग्रंथाच्या मराठी भाषांतरांत प्रसंगानुसार ती छापिलेलीही आहे. त्या वेळीं त्यांच्या पत्नींची ही कृति अस्तित्वांत नव्हती; असती तर आपल्या पत्नीच्या ह्या कृतीचा योग्य नंबर लावण्याचा प्रसंग त्यांजवर आला असता; व आपल्या न्यायमूर्तित्वाची साक्ष सर्वांस पटवून द्यावी लागली असती. असो. मथितार्थ इतकाच कीं, वाङ्मयदृष्टीनें '**आठवणींची**' योग्यता फारच वरच्या दर्जाची आहे. ह्यामुळें मराठी भाषेच्या अभ्यासासाठीं 'क्रमिक' पुस्तक म्हणूनही हें पुस्तक नेमण्यांत येऊं लागलें आहे. शिवाय ह्या '**आठवणींचें**' अंतरंगही फार बोधप्रद आहे. हें अंतरंग इतरांच्या शब्दांनीं व्यक्त होण्याजोगें नाहीं. तर वाचकांनींच '**आठवणींशीं**' प्रत्यक्ष परिचय करून घेऊन जाणावयाचें आहे. दुसरी मौजेची गोष्ट अशी कीं, एका सर्वमान्य विदुषीनें लिहिलेलें पुस्तक, त्याच विदुषीचा अत्यंत निकट संबंध असलेल्या

संस्थेनें काढिलेल्या छापखान्यांत-**पुणें सेवासदन सोसायटीच्या महिला विजय** नांवाच्या छापखान्यांत-कंपोज झालेलें असून तेंही ह्या कलेंत शिक्षण घेतलेल्या स्त्रियांनींच कंपोज केलेलें पुस्तक आहे. सारांश, हा योगायोग कांहीं अपूर्व व स्त्री-वर्गाला अभिमानास्पद आहे. तसेंच, स्त्री-वर्गाच्या उन्नतीसाठीं यथाशक्ति सहाय्य करण्यास नेहमीं तत्पर असणाऱ्या **आर्यभूषण** छापखान्यानें प्रत्यक्ष छपाईचें काम आस्थापूर्वक केलें, हेंही येथें आभारपूर्वक नमूद करणें जरूर आहे.

तेव्हां अशा ह्या कृतीला अभिज्ञ वाचक उदार आश्रय देऊन आणि **परोक्ष** रीतीनें सोसायटीच्या ह्या नवीन उद्योगास उत्तेजन देतील अशी आशा प्रदर्शित करून बरीच लांबलेली ही चौथ्या आवृत्तीची प्रस्तावना मी पुरी करितों.

पुणें सेवासदन, पुणें-सिटी,<br>ता० ११ एप्रिल १९२६.

**गोपाळ कृष्ण देवधर,**<br>ऑनररी ऑर्गनायझर व जनरल सेक्रेटरी,<br>पुणें सेवासदन सोसायटी.

# पांचव्या आवृत्तीचे दोन शब्द.



या पुस्तकाच्या चौथ्या आवृत्तीच्या कांहीं प्रती ' आर्यभूषण ' छापखान्यास आग लागल्या वेळीं नाश पावल्यामुळें ही आवृत्ति लवकर प्रसिद्ध होत आहे.

पुणें सेवासदन सोसायटी,<br>ता० १।१।२८.

**गोपाळ कृष्ण देवधर.**

# सहाव्या आवृत्तीची त्रोटक प्रस्तावना.

कै० श्रीमती रमाबाईसाहेब रानडे यांनीं लिहिलेलें "आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी" हें पुस्तक लोकप्रिय झालें असून त्याची सहावी आवृत्ति ह्या वर्षी प्रसिद्ध करण्याची सुसंधि मिळाली ही कांहीं नवल करण्याची गोष्ट नाहीं; कारण तज्ज्ञांच्या मतें हें पुस्तक असेंच असामान्य योग्यतेचें ठरलें आहे. इतर प्रांतांतील मराठी वाङ्मयाच्या अभ्यासक्रमांत ह्या पुस्तकाचा अंतर्भाव केला गेला होता; त्याचप्रमाणें पुढील वर्षी मॅट्रिक्युलेशन परीक्षेस मराठी घेऊन बसणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां, मुंबई युनिव्हर्सिटीचा अभ्यासक्रम ठरविणाऱ्या बोर्डास, हें पुस्तक नेमण्याची प्रेरणा झाली यावरून हें पुस्तक मुंबई युनिव्हर्सिटीच्या क्षेत्रांत मराठी वाङ्मयाच्या अभ्यासासाठीं क्रमाक्रमानें आपलें पाऊल पुढें टाकील यासंबंधीं मला आतां संदेह वाटत नाहीं.

मीं या पुस्तकाच्या चौथ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें या पुस्तकाचे सर्व हक्क पु. से. स. सो. या संस्थेस अर्पण करून ग्रंथकर्त्रीनें या संस्थेला फार ऋणी करून ठेविलें आहे. व पु. से. स. सो. या संस्थेच्या मालकीचीं जीं जीं पुस्तकें आतांपर्यंत प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांतील हें पुस्तक म्हणजे मेरुमणि आहे असें म्हटल्यास चालेल. ही ७००० ची सहावी आवृत्ति सहा वर्षांच्या अवधींत छापण्याचा सुयोग प्राप्त झाला याबद्दल आमची संस्था मुंबई युनिव्हर्सिटीचीही फार आभारी आहे.

ज्याप्रमाणें मुंबई युनिव्हर्सिटीनें ह्या पुस्तकास मान्यता देऊन आम्हांस मदत केली आहे, त्याचप्रमाणें ज्या इतर युनिव्हर्सिट्यांमधून मराठी भाषेचा अभ्यासक्रम प्रचलित असेल, त्या युनिव्हर्सिट्यांनींही अशाच प्रकारचें गुणग्राहकत्व व्यक्त करून आमच्या संस्थेस मदत करावी अशी माझी सविनय प्रार्थना आहे.

शालोपयोगी लायब्ऱ्या व बक्षिसांसाठीं निवडलेल्या पुस्तकांचे ग्रंथसंग्रह यांसाठीं सरकारी खात्यानेंही हें पुस्तक मंजूर करण्यास आतां कोणत्याही तऱ्हेचा प्रत्यवाय असण्याचें कारण नाहीं व अशा तऱ्हेची मान्यता केवळ

मुंबई सरकारच्या शिक्षणखात्याकडूनच नव्हे तर ज्या ज्या प्रांतांत मराठी भाषेचा अभ्यास करण्यांत येतो त्या त्या प्रांतांतील शिक्षणखात्याकडून वरील प्रकारची मान्यता मिळाल्यानें या पुस्तकाचा जास्त प्रसार होऊन महाराष्ट्र वाङ्मयांतील एका उच्चतम पुस्तकाच्या वाचनाची गोडी वृद्धिंगत केल्याचें श्रेय मिळेल. इतकेंच नव्हे तर गेल्या शतकांत महाराष्ट्रांत जे बुद्धिमान्, मुत्सद्दी, देशहितैषी पुरुष होऊन गेले व देशास ललामभूत झाले त्यांच्यापैकीं एका श्रेष्ठ पुरुषाच्या उज्ज्वल चरित्राशीं मराठी वाङ्मयप्रेमी तरुण-पिढीचा परिचय करून दिल्याचें श्रेय किंवा पुण्य आमच्या सोसायटीस लाभेल, ही कांहीं माझ्या मतें लहानसहान देशसेवा नव्हे व अशा तऱ्हेची सेवा कर-ण्याची संधि ज्यांनीं आणून दिली, त्या कै० रमाबाईसाहेब रानडे व मुंबई युनि-व्हर्सिटी ह्या दूयाचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत.

पुणें सेवासदन सोसायटी,<br>७८९-९० सदाशिव पेठ,<br>पुणें शहर.<br>ता. १८।२।१९३५.

**गोपाळ कृष्ण देवधर**<br>M. A, C. I. E.,<br>( कैसर-ई-हिंद गोल्ड मेडॅलिस्ट )<br>ऑ. ऑर्गनायझर व जनरल सेक्रेटरी,<br>पु. से. स. सोसायटी-पुणें.

# आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी

## अथवा

# स्वतःसंबंधीं कांहीं गोष्टी.



पवित्र होईन चरित्रउच्चारें । रूपाच्या आधारें गोजिरिया ॥
अपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठीं । पायीं घाली मिठी पाहें डोळां ॥
गाईन ओंविया शिव्रांच्या आधारें । सारीन विचारें आयुष्या या ॥
तुका म्हणे तुझें नाम नारायणा । ठेवीन मी मना आपुलीया ॥१॥

—तुकाराम.

---

## भाग पहिला.

## पूर्वजांचें वृत्त व स्वतःचें बालपण.

आमच्या पूर्वजांचें ( रानड्यांचें ) मूळ ठिकाण रत्नागिरी जिल्ह्यांतील चिपळूण तालुक्यांत गुहागरानजीक मोभारपाचेरी ऊर्फ पाचेरिसडा या नांवाचें आहे. त्या गांवीं या घराण्याचे वंशज असून त्यांच्याकडे खोतीचें उत्पन्न अद्याप चालू आहे. तेथून भगवंतराव नांवाचे पुरुष ( स्वतःचे निपणजे ) कोकणांतून देशांत पंढरपुराजवळ कसबे करकंब येथें येऊन राहिले. हे जरी गृहस्थ होते, तरी त्यांना ज्योतिष फार चांगलें येत होतें. त्यांनीं एकदां नाना फडनविसांस त्यांच्याविषयीं जें जें भविष्य सांगितलें होतें, तें तें घडून आलें, असें म्हणतात.

भगवंतराव यांचे चिरंजीव भास्करराव ऊर्फ अप्पाजी हे आपल्या आईच्या पुष्कळ अपत्यांतून एकटेच व[illegible] आपल्या आईच्या ( कृष्णा-

बाईच्या ) सतत बारा वर्षें अत्यंत निष्ठापूर्वक व खडतर व्रताचरण करण्यानेंच वांचले. कृष्णाबाईंचीं मुलें वांचत नव्हतीं, म्हणून त्यांनीं सतत बारा वर्षें अश्वत्थाला व गाईला प्रदक्षिणा घातल्या व त्या कालांत गाईच्या गोमूत्रांत दशमी करून तीच खाऊन राहिल्या; त्यांनीं दुसरा आहार घेतला नाहीं, त्या भाविक व सात्त्विक वृत्तीच्या होत्या. अतिथि, अभ्यागत कोणत्याही वेळीं आपल्या घरीं आला असतां, न कंटाळतां आधीं उठून त्या त्याला स्वयंपाक करून जेऊं घालीत, आणि अश्वत्थ वृक्षाला हेंच मागणें मागत कीं, मला पुत्र होऊन त्याचीं पाळेंमुळें तुझ्यासारखीं खोल जावींत व विस्तारही तुझ्यासारखाच मोठा होऊन त्याची बहुतांना छाया मिळावी. त्या त्यांच्या मागण्याप्रमाणें, देवानें भास्कररावअप्पांना पूर्णायु करून भाग्यवान् व पराक्रमी केलें; आणि एकाचे एकवीस ह्या म्हणीप्रमाणें त्यांचा वेलविस्तार मोठा वाढून उत्तरोत्तर रानडेघराण्यांतील सर्व पुरुष बुद्धिमान्, शूर, पराक्रमी, उद्योगी, उंच व बांध्यानें मजबूद, तसेच मनाचे उदार असेच निपजले; हें त्या महासाध्वीच्या पुण्याईचें फळ आहे, असें म्हटलें पाहिजे.

अप्पाजी भगवंत हे वर सांगितलेल्या साध्वीचे एकुलते एक पुत्र व स्वतःचे सख्खे पणजे होत. सांगली संस्थानचे अधिपति प्रख्यात चिंतामणराव ऊर्फ अप्पासाहेब पटवर्धन यांच्याजवळ ते प्रथम कारकून होते. पटवर्धनी सैन्यांतील एका तुकडीचें प्रमुखत्व एके काळीं त्यांच्याकडे होतें. त्यांनीं एकदां मोंगलाशीं लढून एक किल्ला सर केला व त्या वेळीं लुटींत जो माल आला, त्यापैकीं ह्यांनीं कशालाही स्पर्श केला नाहीं असें सांगतात. मग आपल्या गुणांनीं वाढत वाढत जाऊन श्री० अप्पासाहेब यांजकडून इंग्लिश सरकाराकडे ते वकील होते. कोणत्याही गोष्टींत भीड न धरितां, आपल्या बुद्धीला शुद्ध व खरी वाटेल तशी ते आपल्या मालकाला सल्ला देत. तेवढ्यापुरती मालकाची थोडी नाराजी झाली तरी ते भीत नसत. प्रामाणिकपणा व बुद्धिमत्ता या दोन गुणांबद्दल पटवर्धनांची त्यांच्यावर बहाल मर्जी असे. त्यांनीं वंशपरंपरेनें यांना जी तैनात करून दिली आहे, ती अद्यापि सांगलींतील आमच्या घराण्या-

कडे चालत आहे. श्रीचिदंबरस्वामी म्हणून जे कर्नाटक प्रांतांत प्रसिद्धीस आले होते, ते आमच्या अप्पांचे गुरु होते. अप्पांना आपला मरणकाळ माहीत होता, असें म्हणतात. मरणाच्या पूर्वी सहा महिने अगोदरपर्यंत, ते मोठ्या घोड्यावर चटकन् बसत असत. दांत व इतर गात्रें शेवटपर्यंत शाबूत होतीं. ते आपला सर्व वेळ ईश्वरध्यानांत व चिंतनांत घालवीत व मुखानें नामस्मरण करीत. ते आपल्या वयाच्या पंचाण्णवाव्या वर्षी मुखानें नामस्मरण करीत बसल्याबसल्याच कैलासवासी झाले. देहावसान होण्यापूर्वी त्यांनीं आपल्या पुत्राला आपला निधनकाळ सांगून ठेविला होता, असें म्हणतात.

अप्पांचे वडील चिरंजीव म्हणजे स्वतःचे सख्खे आजे, अमृतरावतात्या हे सुरू इंग्रजींत प्रथम करकंबहून नगर जिल्ह्यांत नोकरीकरितां गेले. तेथें ते शिरस्तेदार होऊन पुढें मामलेदार झाले, व नगर जिल्ह्यांतून पुणें जिल्ह्यांत आले. पुण्यास व आंबेगांवास पुष्कळ वर्षें मामलत केल्यावर पावळ तालुक्यांत त्यांची बदली झाली, व तेथेंच त्यांनीं पेन्शन घेतलें. तात्यांना आमच्या मामंजींसुद्धां चार पुत्र होते. वडील बळवंतरावदादा, दुसरे गोविंदरावभाऊ, तिसरे गोपाळराव आने व चवथे विष्णुपंतअण्णा. या चवघांपैकीं गोविंदराव व विष्णुपंत प्रथम निफाडास नोकरीवर असून पुढें सन १८४१–४२ त कोल्हापुरास जबाबनिशीच्या कामावर आले, व दुसरे दोघे तात्यांजवळ पावळासच राहिले. तात्या हे आपल्या वडिलांप्रमाणेंच बांध्यानें उंच असून अगदीं मजबूत होते. हे घोड्यावर बसणारे उत्तम होते. त्यांना संस्कृताची व शास्त्रांची आवड फार असल्यामुळें त्यांचा त्यांनीं चांगला अभ्यास केला होता. पुष्कळ संस्कृत ग्रंथ वाचून त्यांनीं आपल्या हातानें कित्येक पोथ्यांच्या प्रती लिहून काढलेल्या आहेत. पुरुषसूक्तावर यांनीं टीका व मराठींत अर्थ केला होता आणि छापविण्याकरितां जवळ देऊन ठेविला होता. त्याप्रमाणें स्वतः तो छापविला होता, असेंही ऐकतें. तात्या भागवत फार उत्तम सांगत. शिवाय ज्योतिष उत्तम रीतीनें वर्तवीत, पत्रिका पहात व जातीनें करीतही असत.

आमचे मामंजी फडनीस असतांना स्वतःचा जन्म माघ शुद्ध ६ शके १७६३, म्हणजे तारीख १८ जानेवारी, सन १८४२, रोज मंगळवार या दिवशीं संध्याकाळीं झाला. ती वेळ तात्यांनीं टिपून ठेवून आपल्या हातांनीं स्वतःची पत्रिका विस्तृत लिहून ठेविली आहे.

तात्यांनीं अशा रीतीनें पूर्ववयांतील तसाच उत्तरवयांतील आपला आयुष्यक्रम उत्तम ठेऊन आपल्या वयाच्या ऐशींवे वर्षी म्हणजे सन १८६८ सालीं कोल्हापुरास आमच्या मामंजींजवळ येऊन आपली आयुष्ययात्रा संपविली. मामंजी कोल्हापुरास आल्यावर कांहीं दिवस जबाबनिशीचे कामावर होते. पुढें तेथेंच ते मामलेदार झाले. भूधरगड, पन्हाळा, गडहिंग्लज, वगैरे निरनिराळ्या पेट्यांत मामलतीचें काम केल्यावर पुनः त्यांची बद्‌ली कोल्हापुरास होऊन सन १८६२।६३ सालीं ते खासगी कारभाऱ्याच्या जागेवर कायमचे नेमले गेले. या वेळीं त्यांस अडीचशें रुपये पगार मिळत असे.

सन १८४२ सालीं ते करवीराकडे सडेच आले होते. बरोबर मुलेंमाणसें आणिलीं नव्हतीं; आमच्या सासूबाई पुढें तीनचार वर्षें वन्संचा ( दुर्गा अक्कांचा ) जन्म होईपर्यंत, निफाडास आजेसासूबाईच्याजवळ राहिल्या होत्या. वन्संचा जन्म झाला, तेव्हां स्वतःचें वय अडीच वर्षांचें होतें. आंबेगांवास तात्या अजून मामलेदारीवरच होते, त्यांच्याजवळ चारआठ दिवस राहून मग पुढें मामंजींच्याकडे कोल्हापुरीं जाण्याकरितां आमच्या सासूबाई स्वतःला व वन्संना घेऊन बैलगाडींतून निघाल्या. या प्रवासांत स्वतःवरचें एक संकट ईश्वरकृपेनें टळलें. ती हकीकत अशीः—

सासूबाई प्रथम निफाडाहून निघून आंबेगांवीं येतेवेळीं त्यांच्या बरोबर आंबेगांवाहून बोलवावयास आलेला एक शिपाई, व स्वतःचे चुलत चुलते विठ्ठल बाबाजी रानडे, असे दोघे बरोबर होते. विठूकाका घोड्यावर बसून गाडीच्या मागें येत होते. दिवस उन्हाळे असल्यामुळें संध्याकाळीं शिळोप्याच्या वेळीं गाडी जुंपून रात्रभर चालवीत असत. हे दिवस काळोख्या रात्रींचे होते. रात्रीं दोन वाजण्याच्या सुमारास गाडींतील सर्व माणसें (सासूबाई व दोन्ही

मुलें) गाढ झोंपीं गेलीं होतीं. तान्ही मुलगी पोटाशीं घेऊन सासूबाई निजल्या होत्या व वन्संचे पलीकडे वेगळें पांघरूण घालून स्वतःला निजविलें होतें. वेळ थंड असून वारा गार सुटल्यामुळें गाडीबरोबर चालणारा शिपाई या वेळीं पुढील बाजूला गाडीवाल्याच्या शेजारीं जाऊन बसला; नंतर थोड्या वेळानें गाडीवाला व शिपाई दोघेही पेंगूं लागले. बैल रेंगाळतच चालले होते, व विठूकाका बरेच मागें राहिले होते; अशा वेळीं एक मोठी ओरंगळ आली व तींतून बैल जोरानें गाडी घेऊन निघून गेले. यावेळीं स्वतः झोंपेंत लोळून गाडीच्या अगदीं कडेला आल्यामुळें गाडी ओरंगळीला लागतांक्षणीं जोरानें लागलेल्या धक्क्याबरोबर पांघरुणासकट स्वतःचें मुटकुळें रस्त्यावर पडलें. सासूबाईंना गाढ झोंप लागली होती; पण गाडी धांवणीला लागल्याबरोबर शिपाई व गाडीवाला जागे झाले, तरी गाडी धांवण्याच्या आवाजांत मागें कांहीं पडल्याचें त्यांना कळलें नाहीं. तशीच गाडी मैल दीड मैल पुढें निघून गेली. मग मागून अर्ध्या पाऊण तासानें स्वतः विठूकाकांच्या घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकून "विठूकाका!" अशी हांक मारून "मी येथें पडलों आहें" असें सांगितलें. हांक ऐकल्याबरो विठूकाकांनीं स्वतःचा आवाज ओळखून एकदम घोडा उभा केला, आणि खालीं उतरून स्वतःला उचलून पोटाशीं घेतलें व गारठलेलें अंग पांघरुणांत गुंडाळून पोटाशीं घट्ट धरून ते घोड्यावर बसले व सासूबाईंच्या गाडीजवळ येतांच म्हणाले; "गोपिकावहिनी, जाग्या आहां ना? मुलांना पांघरूण नीट आहेना?"

त्यांनीं निजल्यानिजल्याच "हो, सर्व नीट आहे," म्हणून सांगितलें.

त्याबरोबर विठूकाकांनीं पुन्हा विचारलें "तुम्हीं अजून झोंपेंतच आहां. दोन्हीं मुलें तुमच्याजवळच आहेतना? नीट पहा."

इतकें म्हटल्यावर त्या चपापून जाग्या झाल्या व गाडीमध्यें चोहोंकडे चाचपूं लागल्या, तों वन्संशिवाय दुसरें कोणी नाहीं; हें लक्षांत आल्यावर त्या अतिशय भिऊन रडूं लागल्या. तेव्हां विठूकाकांनीं स्वतःला पांघरुणांतून काढून सासूबाईंकडे दिलें व म्हटलें "आज परमेश्वरानें केवढी खैर केली बरें!"

ही गोष्ट विठूकाकांच्या तोंडून मला कळली. अजूनही ही गोष्ट सांगते-वेळीं ते गहिंवरून येत असत.

याप्रमाणें आंबेगांवास आल्यावर कांहीं दिवस तेथें राहून, मग सासूबाई उभयतां मुलें घेऊन कोल्हापुरास मामंजींकडे आल्या. **स्वतः**चें तीन वर्षांपासून तेरा वर्षांपर्यंत बहुतेक लहानपण कोल्हापुरासच गेलें. वयाच्या सहाव्या-सातव्या वर्षीं **स्वतः**ला पांडोबातात्या दिवेकर यांच्या मराठी शाळेंत घातलें. या वेळच्या **स्वतः**च्या स्वभावाची व अभ्यासाची सर्व माहिती ताईसासू-बाईच्या वेळोवेळच्या बोलण्यांत आलेली, त्यांच्याच शब्दांत देत आहें. त्यावरून लहानपणींच्या **स्वतः**चें स्वभाववळण कसें होतें याची माहिती सहज होईल. ताईसासूबाई एकादे वेळीं रागावल्या म्हणजे स्वतःच्या लहानपणींच्या या गोष्टी सांगतः—

"आम्ही कोल्हापुरीं सरकारी कोठींत रहात असतांना कीर्तने माडीवर व आम्ही खालीं रहात असूं. दोन्ही घरांत खटला मोठा. आमच्या घरांत मोठीं माणसें जास्त, मुलें कमी व कीर्तन्यांच्या घरीं तर मुलगे व मुली पुष्कळ. त्यामुळें आमच्या दोन्हीं बिऱ्हाडांतील माणसांनीं एवढा मोठा कोठीचा वाडा, पण अगदीं गजबजलेला असे. कीर्तने कऱ्हाडे व आम्ही कोंकणस्थ, हें कोणाला विचारल्यावांचून कळावयाचें नाहीं. दोन्हीं घरचीं आम्ही सर्व लहानमोठीं माणसें व मुलें एका घरांतील व नात्यानें सख्खीं असल्यासारखीं वागत होतों. आमच्या भाऊसाहेबांच्या व आबासाहेब कीर्तन्यांच्यामध्यें भेदाभेद मुळींच नव्हता. तोच ठसा इतर सर्व लहानमोठ्या माणसांच्या वागणुकींत दिसे. आमच्या दोन्ही बिऱ्हाडांपैकीं कोणाच्या घरीं कांहीं असलें, कीं, सगळीं माणसें तिकडे जावयाचीं. दुसरी चूल पेटावयाची नाहीं. प्रत्येक सणाला 'आम्ही हा सण करणार,' म्हणून भांडण असावयाचें. मग पुढें अशी तोड काढिली, कीं, कुलधर्म असतील तेवढे वेगळे करावे. बाकीचे सण निंमे निंमे वांटून दोन्ही घरांत आळीपाळीनें करावे. त्याप्रमाणें आम्ही करीत असूं. कीर्तन्यांचीं मुलें लहानपणापासून हुशार व तरतरीत; पण आमचा मुलगा फार थंड व धिमा, याला कांहीं समजत नसे. धड निरोपही सांगतां यावयाचा

नाहीं. शाळेंत परीक्षा झाली म्हणजे तीं मुलें ‘ आम्ही पास झालों, आम्हांला परीक्षक असें असें म्हणाले,’ वगैरे कितीतरी घरीं येऊन सांगत; पण याचें कांहीं नाहीं ! आपण होऊन ‘ मी पास झालों,’ असें सुद्धां सांगावयाचा नाहीं. कीर्तन्यांच्या मुलांकडून हा पास झालेला कळलें म्हणजे मी विचारीं ‘अरे माधवा, तूं पास झालास हें आम्हांला नाहीं कुठें सांगितलेंस ! कसली हौसच नाहीं ! तो विनायक पहा. किती हुशार आहे तो.’ तेव्हां हा म्हणावयाचा कीं, ‘त्यांत काय सांगावयाचें आहे ! रोज शाळेंत जाऊन आम्ही अभ्यास करतों तर पास होणारच; त्यांत काय जास्त आहे ?’ असें म्हणून मुकाट्यानें जावयाचा.

“ आईनें तर नित्य काळजी करावी, कीं, या माधवाचें कसें होईल ! हा दहा रुपये मिळवून आपल्या बायकोचें पोट भरण्याइतका शाहाणा होईल का? असें त्या मला नेहमीं म्हणत. तीच दुर्गी पहा ? उलट अतिशय बोलकी, हुशार व तरतरीत असे. ती अजूनहीं तशीच आहे. बापाच्या व भावाच्या लाडानें व हुशार म्हणण्यानें फार कजाग मात्र झालेली आहे. आतां तर त्या अक्कासाहेब झाल्यापासून माधवापेक्षांही शहाण्या झाल्या आहेत. लहानपणापासून ही अशीच आतताई असून ज्या त्या बोलण्यांत आपली छाप वर ठेवावयाची व हा आपला शुद्ध नंदी, एकनादी व सरळ. डावपेंच कांहीं माहीत नाहींत, व ते समजावयाचेही नाहींत. एकदां एका गोष्टीला प्रारंभ केला, कीं, ती आपली न चुकतां नेमानें करावयाचीच, त्याबद्दल पुनः सांगावें लागत नसे. पण त्यांत कोणीं अडथळा केला, कीं, हट्ट धरून रडत बसावयाचा. मग समजूत लवकर व्हावयाची नाहीं. पहिल्यांदा धुळाक्षराच्या शाळेंत घातल्यावर शाळेंतून आला न आला, कीं, घरीं सारा दिवस तेंच आपल्याशीं हळूहळू बडबडे व बोटानें भिंतीवर अक्षरें व उजळणी काढीत रहावयाचा. हाच याचा खेळ व हीच याची करमणूक ! रस्त्यांत उगीच खेळत असला तरी धुळींत उजळणी काढीत बसावयाचा, असा वेडा होता. एकमार्गीपणा तर असा होता, कीं, एकदां जें करावयाचें तें कायम. मुंज

झाली तेव्हां वय लहान होतें व मराठी शाळा सकाळीं उशीरां म्हणजे १० वाजतां सुटे. तेव्हां भूक फार लागे, म्हणून आमच्या माई (स्वतःची आई) दशमी करून ठेवीत व हा आल्यावर त्यावर तूप घालून याला देत. एके दिवशीं नुकतें ताक केलें होतें. लोणी कढविलें नव्हतें, म्हणून माईनीं दशमीवर लोणी घातलें. झालें, गेली याची मर्जी! हा आपला हट्ट धरून बसला कीं, 'रोजच्यासारखें पातळ तूप वाढ!' तूप कढविलें नाहीं, उद्यां घालीन, म्हणन त्यांनीं पुष्कळ सांगितलें, पण नाहीं. तेव्हां माईनीं तुपाच्या तांबलींत चमचाभर पाणी घालून ती चुलींत ऊन केली व तांबली दशमीवर ओतली, त्याबरोबर याची समजूत होऊन हा मुकाट्यानें दशमी खावयास लागला. दुर्गी तेथें जवळच उभी होती, तिच्या हें लक्षांत येऊन ती मोठ्यानें हंसून व टाळया वाजवून त्याला चिडवावयाला लागली, कीं, 'दादा, तुला आईनें तूप म्हणून पाणी वाढलें!' पण यानें तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं. आपली खालीं पाहून दशमी खाल्ली व उठून गेला.

"बहुतकरून दररोज सकाळीं शाळेंतून आल्यावर दशमी खाल्ली, कीं, दुर्गीशीं एक सागरगोट्यांचा (गजग्यांचा) डाव खेळून मग अंघोळीस उठावयाचा व पहिला तांब्या डोक्यावर घेतला, कीं, पुरुषसूक्त म्हणण्यास आरंभ करावयाचा. त्यांत कोणीं मध्यें बोलून तें चुकविलें, कीं, गेलें गाठोडें! विठू भाऊजींनीं याला संध्या करतांना थांबवून कांहीं संध्येंतलेंच विचारलें. त्याचें उत्तर दिल्यावर हा अडून बसला कीं, 'मी पहिल्यापासून पुन्हां संध्या करावयाचा नाहीं. कोठें थांबविलीत ती आणून द्या, मग संध्या पुढें करीन' असा पुष्कळ वेळ हट्ट धरून बसला. संध्याही करीना व उठूनही जाईना. शेवटीं विठूभाऊजींनीं अर्धी संध्या करून 'आतां तूं येथून पुढें कर, येथें तुला मीं थांबविला,' असें म्हटल्यावर यानें एकदांची संध्या संपविली व उठून गेला.

"सणावारीं गोफ, कडीं व आंगठी, मोठ्या मिनतवारीनें आईनें याच्या अंगावर घातलीं तर गोफ घातला म्हणून त्यावरून गळयाला धोतर गुंडाळा-

वयाचें, कडीं बंडीच्या बाहींत मागें सारून ठेवावयाचीं, व आंगठीचा खडा हातांत पुढें वळवून मूठ मिटून ठेवावयाची, असा सदा निरसलेला असे. मी एकदां रागें भरलें, कीं, 'माधव, तुझी आई इतक्या हौसेनें दागिने घालते, ते तूं कां बरें घालूं देत नाहींस ? घातले तर ते वेड्यासारखे झांकून ठेवतोस.' तेव्हां पण हें बाळ काय म्हणालें, कीं, 'आपल्या घरीं रोज माधुकरी येतात, त्यांना कुठेंग असतात दागिने !' असें तर लक्षण आहे! आई तर काळजी करतां करतां मेली विचारी ! आहे कुठें शहाणपण. कांहीं रेषा उमटल्या होत्या म्हणून मिळताहेत चार पैसे झालें, दुसरें काय !

"कोल्हापुरीं असतांना आमच्या घरीं व कीर्तन्यांच्या घरीं कोजागरीला पुष्कळ ब्राह्मण व मित्रमंडळींना बोलावून दूध द्यावयाची वहिवाट होती, व सगळ्या शाळेच्या मुलांना त्या दिवशीं रात्रीं दोन वाजेपर्यंत जागून सोंगट्या खेळण्यास परवानगी असे, त्याप्रमाणें दोन्हीं घरचीं सगळीं मुलें जमून सोंगट्या खेळत. माई वारल्याच्या आदल्याच वर्षी माधवाला नुकतें दहावें वर्ष चाललें असेल. कोजागरी आली, तेव्हां कीर्तन्यांची मंडळी कशालाशी राजुरीस गेली होती, म्हणून या वेळीं मुलें कोणीच घरांत नव्हतीं. दुर्गी होती पण ती आठ नऊ वाजतां निजली. मग खेळण्यास कोणीच नव्हतें, तरी रात्रीं भाऊसाहेबांचें जेवण झाल्यावर माधव मजजवळ सोंगट्या मागूं लागला. मीं म्हटलें 'दुर्गी-सुद्धां निजली. आणि मग तूं सोंगट्या कोणाशींरे खेळणार ?' तो म्हणाला 'मी आपला कोणाशींही खेळेन. तूं दे म्हणजे झालें.' मीं सोंगट्या दिल्या. त्या घेऊन ओसरीवर गेला, आणि एका खांबाच्या पुढें बसून सोंगट्यांचा डाव मांडला. आणि एक हात आपला व एक हात खांबाचा असें म्हणून खेळण्यास सुरुवात केली व दोन्ही वेळां खांबाकडून आपल्यावर बिनतोडी घेतल्या. तेव्हां मीं चिडवून म्हटलें 'अरेरे, एका माणसाची फजिती झाली! लांकडाच्या खांबानेंसुद्धां तुझ्यावर बिनतोडी द्यावी ना !' तेव्हां तो न चिडतां धिमेपणानें म्हणाला 'मग त्यांत काय ? जें खरें तें खरेंच ! खांबाच्या हाताला डाव पडला म्हणून त्याची तोडी आधीं झाली. मला पडला नाहीं,

म्हणून माझी झाली नाहीं. त्यांत कसली फजिती!' हा आपला खांबाचा हात म्हणून उजव्या हातानें खेळत होता. त्या हाताला खेळण्याची संवय असल्यामुळें डाव चांगला पडे; पण डाव्या हातानें खेळण्याची संवय नसल्यामुळें नीट खेळतांच येत नव्हतें, मग डाव हवा तसा कसा पडणार? दुसरा कोणी मुलगा असता तर खांबाकडून बिनतोड घेता का? पण याचा लहानपणापासून सरळ स्वभाव, जें करावयाचें त्यांत प्रतारणा ठाऊकच नाहीं.

"एकदां माईनीं याला बर्फी दिली व याच्या दुसऱ्या हातांत थोडासा तुकडा देऊन त्या म्हणाल्या, कीं, 'हा तूं खा, व तो त्या मुलाला दे.' लहान तुकडा यानें आपल्या तोंडांत घालून मोठी वडी मोलकरणीच्या मुलाला दिली. मुलाच्या हातांत मोठी वडी पाहून माईनीं विचारलें, कीं, 'अरे, याला लहान तुकडा द्यावयाचा तो मोठी वडी दिलीस आणि तूं लहान घेतलीस!' माधव म्हणाला, 'तूं या हातांतील त्याला दे म्हणालीस, म्हणून तो दिला.' तेव्हां त्या हातांतील म्हणण्यांत आपली चूक झाल्यानें हें असें झालें असें माईच्या लक्षांत आलें."

## भाग दुसरा.

## मुंबईस विद्याभ्यास व आरंभींची नोकरी.

स्वतःच्या वयाला अकरावें वर्ष होतें, त्या वेळीं आमच्या वन्संना नुकतें नववें वर्ष लागलें होतें. या वर्षीं वन्संचें लग्न झालें. त्यांना आजऱ्यास फडनिसांच्या घरीं दिल्या होत्या. पुढें एक वर्षानें स्वतःच्या वयाला अकरावें वर्ष संपून बारावें वर्ष लागतांच आमच्या सासूबाई आठव्या खेपेस बाळंत होऊन लागलीच वारल्या. मग पुढें स्वतःला व कीर्तन्यांच्या मुलांना कोल्हापूर येथील इंग्रजी शाळेंत घातलें. त्या वेळीं कृष्णाजी चाफाजी हे इंग्रजी शिक्षक होते.

याच सुमारास मामंजींचें दुसरें लग्न झालें, स्वतःस तेरावें वर्ष लागतांच मोरोपंत दांडेकर नांवाच्या वाईंतील एका कुटुंबवत्सल सद्गृहस्थांची मुलगी सखूबाई इच्याशीं सन १८५४ मध्यें स्वतःचा विवाह केला.

याच दांडेकरांची वडील मुलगी तात्यासाहेब घोरपडे इचलकरंजीकर यांना दिली होती. श्री० यशोदाबाई ऊर्फ वहिनीसाहेब घोरपडे अजमासें १९०३ सालीं वारल्या. यांची दुसरी मुलगी कोल्हापूरचे जोशीराव यांचेकडे दिली होती. तिसरी मुलगी आजरेकर फडणीस यांचेकडे दिली होती, व चवंथी सखूबाई आमचेकडे दिली होती. स्वतःचा विवाह झाल्यावर कीर्तने चौघे बंधु व स्वतः मिळून ही सर्व मंडळी मुंबईस शिकण्यास गेली.

कोल्हापूरच्या शाळेंत दोन वर्षें म्हणजे १८५६ सालापर्यंत अभ्यास झाल्यावर ' आतां आम्हांला पुढील अभ्यासाकरितां मुंबईस पाठवा, ' असें म्हणून दररोज आबासाहेब कीर्तने यांचेमागें स्वतः अगदीं तगादा लावला. आमचे मामंजी स्वतःला कधींसुद्धां कडकपणानें वागवीत नसत, किंवा रागें भरत नसत. तथापि त्यांच्यापुढें आपण जातीनें जाऊन कांहीं गोष्ट विचारावयाची किंवा मागावयाची नाहीं, अशी लहानपणापासून शेवटपर्यंत स्वतःची वहिवाट असे. होतांहोईतों सर्व गोष्टी निरोपानिरोपी दुसऱ्याजवळून करावयाच्या. एखादे वेळीं समक्ष बोलण्याचा प्रसंग आलाच तर अगदीं थोड्या शब्दांत मर्यादेनें बोलावयाचें. जेवण्याच्या वेळेशिवाय इतर केव्हांहि मामंजींच्या समोर स्वतःला बसणें माहीत नव्हतें. कधीं समक्ष बोलण्याचें काम पडलेंच, तर उभें राहून तेवढ्यापुरतें बोलावयाचें व लागलीच आपल्या कामाला जावयाचें. हीच तऱ्हा लहानपणीं असल्यामुळें, मुंबईस शिकावयास जाण्याचें स्वतःच्या मनांत जरी इतकें भरलें होतें, तरी या भिडस्त स्वभावामुळेंच मामंजींच्या समोर आपण येऊन कधींच बोलण्यास धीर झाला नाहीं, म्हणून प्रत्येक दिवशीं आपण लवकर निजून उठल्यावर आबासाहेब कीर्तने यांच्या खोलीच्या दाराशीं जाऊन उभें रहावयाचें, व ते उठून बाहेर येण्याबरोबर त्यांना म्हणावयाचें, कीं, 'आबा-

साहेब आम्हांला मुंबईला केव्हां पाठविणार ? भाऊसाहेबांना सांगून आम्हां सगळ्याजणांना मुंबईला शिकावयाला पाठवा.' याप्रमाणें दोन-तीन महिने अगदीं नेमानें स्वतः आबासाहेबांना म्हणून त्यांची पाठ पुरविली. मग त्यांनीं व मामंजींनीं विचार करून, विनायकराव, बळवंतराव, निळकंठराव, त्रिंबकराव व स्वतः अशा पांचजणांस एक गडी व ब्राह्मण बरोबर देऊन १८५६ सालांत मुंबईस अभ्यासाकरितां पाठविलें.

तेथें गेल्यावर तीनच वर्षांनीं म्हणजे १८५९सालीं मुंबई युनिव्हर्सिटीची मॅट्रिक्युलेशन परीक्षा दिली, व त्यापूर्वी एलफिन्स्टन् इन्स्टिटयूटमध्यें प्रथम दहा, मग पंधरा व नंतर वीस रुपयांची स्कालरशिप मिळूं लागली होती. मॅट्रिक्युलेशन परीक्षेंत पास झाल्यावर पहिलीं तीन वर्षें ज्यूनिअर व पुढील तीन वर्षें सीनिअर युनिव्हर्सिटीनें केलीं होतीं, व त्यावेळीं स्वतःला पहिल्यानें साठ रुपये व मागून एकशेंवीस दरमहा फेलोशिप मिळत असे. मॅट्रिक्युलेशन परीक्षेपासून स्वतःचा नंबर पुढील सर्व परीक्षेंत पहिला असे. १८६१ सालीं स्वतःची लिटलगोची परीक्षा होऊन १८६२ सालांत बी.ए.ची परीक्षा पास झाली व त्याच सालीं इतिहास व अर्थशास्त्र या विषयांची ऑनर्सची परीक्षा होऊन सोन्याचें पदक व दोनशें रुपयांचीं पुस्तकें बक्षीस मिळालीं; आणि १८६४ सालांत एम्. ए.ची डिग्री मिळाली. याच वेळीं म्हणजे १८६२ सालीं मुंबईस इंदुप्रकाश पत्र निघालें, व त्याचे चालकांनीं इंग्रजी बाजूच्या एडिटराचें काम स्वतःवर सोंपविलें; व त्याप्रमाणें अभ्यासक्रम संभाळून हें कामही उत्तम रीतीनें चालविलें. पहिल्याच वर्षी ' पानिपतच्या लढाईचा शतसांवत्सरिक दिवस ' या विषयावर एक अग्रलेख लिहिला. या लेखांत दिसून येणारी ऐतिहासिक दृष्टि व देशप्रीति यामुळें सर्व जगाचें लक्ष्य या पत्राकडे लागलें.

हा परीक्षांचा अभ्यास चालू असतां त्याच कॉलेजांत वर्ग शिकविण्याचें काम असे. कोणत्याही कामांत कसर व्हावयाची नाहीं, असें असल्यामुळें शिकविण्याच्या विषयासंबंधानें फार वाचावयाचें असे. या सर्व गोष्टींचा

परिणाम डोळयांवर होऊन १८६४ सालीं **स्वतः**चे डोळे बिघडून अगदीं दिसेनासें झालें, व ते पुढें सहा महिनेपर्यंत हिरव्या पट्ट्यांनीं बांधलेले होते. डॉक्टर भाऊ दाजी यांनीं डोळे उघडून मुळींच पहावयाचें नाहीं, अशी **स्वतः**ला निक्षून ताकीद दिली होती. दररोज सकाळीं कोणींतरी मित्रानें **स्वतः**ला हातांत धरून भाऊ दाजींच्या घरीं न्यावयाचें व तेथें गेल्यावर डॉक्टर आपल्या हातानें डोळे सोडून, धुऊन व औषध घालून पुनः पट्टा बांधीत.

याप्रमाणें सहा महिनेपर्यंत स्वतः डोळयांचा इतका त्रास सोसला पण अभ्यासक्रम सोडला नाहीं. डोळे दुखत असतां कांहीं सहाध्यायी मित्रमंडळींनीं पाळीपाळीनें वाचावें व **स्वतः** ऐकावें, असा क्रम चालू होता. हा डोळयांचा दुखरेपणा, कमीजास्त प्रमाणानें अखेरपर्यंत होताच. पुढें **स्वतः**च्या एल्‌एल्‌. बी.च्या परीक्षा ऑनर्ससुद्धां पास होऊन त्यांतही नंबर पहिला आला. यापूर्वीं एल्फिन्स्टन कॉलेजांत इंग्लिश शिकविण्याचें जें काम केलें, त्याबद्दल त्या वेळच कॉलेजचे प्रिन्सिपाल मि० चॅटफील्ड, इतर प्रोफेसर व विद्यार्थी यांनीं मिळून एक तीनशें रुपयांचें सोन्याचें घड्याळ दिलें आहे.

१८६६ सालीं पुण्यास शाळाखात्यांतील ॲक्टिंग मराठी ट्रान्सलेटरच्या जागीं **स्वतः**ची दोनशें रुपयांवर नेमणूक झाली. पुढें अक्कलकोटास कांहीं दिवस कारभाऱ्याचें व कोल्हापुरास न्यायाधीशाचें काम करून पुन्हां १८६८ ते १८७१ पर्यंत मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत चारशें रुपये दरमहावर इंग्लिश प्रोफेसराच्या जागीं काम केलें. ह्या कामावर असतांना हायकोर्टांत टर्म भरून ॲडव्होकेटची परीक्षा दिली व त्यांतही उत्तम विजय मिळविला. मध्यंतरीं कोल्हापुरास न्यायाधीशाच्या जागीं **स्वतः**ची नेमणूक झाली, तेव्हां आमचे मामंजी खाजगी कारभाऱ्याच्या जागेवर होते. **स्वतः**ची बदली कोल्हापुरास झाली, तरी **स्वतः**च्या लहानपणापासूनच्या भिडस्त व मर्यादेच्या वागणुकींत कांहीं अंतर पडलें नाहीं. विद्यार्थीस्थितीप्रमाणेंच या वेळीं कधीं कोणावर न रागावतां, व कोणाशीं

विशेष न बोलतां, होईल तितकीं मुकाट्यानें आपलीं कामें करावयाचीं, व करवून घ्यावयाचीं, असा क्रम असे.

कोल्हापुरीं मामंजींची वस्ती पुष्कळ वर्षें असल्यानें, चांगले चांगले पुष्कळ लोक यांचे मित्र असत. शिवाय, विशेष घरोब्याच्या परक्या माणसांची भीड पडण्याचाही पुष्कळ संभव असे. तथापि **स्वतः**ची कामकाजांत सर्व तऱ्हेनें निस्पृहता व चोखपणा असल्यानें, कोणाचीही भीड चालावयाची नाहीं, हें मामंजींना माहीत होतें व त्यामुळें कोणी कसेंही मनुष्य कामासंबंधीं कांहीं विचारण्यास आलें,तर त्याबद्दल आपला शब्द खर्चीं घालण्याचें मामंजी साफ नाकारीत. तथापि **स्वतः** कोल्हापुरीं जाऊन न्यायाधीशाचें काम पाहूं लागल्यास महिना सवामहिना झाल्यावर, एके दिवशीं कोर्टापुढें एक खटला आला. त्यांतील प्रतिवादी मोठ्या कुळांतील घरंदाज असून मामंजींच्या विशेष परिचयाचे होते. त्यांनीं घरीं येऊन मामंजींना अशी भीड घातली कीं, "माझ्याकरितां आपण दोन शब्द **माधवरावांच्याजवळ** खर्चीं घालावेच. आपल्याला हें आवडणार नाहीं, हें मी समजतों; पण आपल्याला संकट वाटेल असें मी बोलण्यास सांगतच नाहीं. माझ्याविषयीं शब्द टाकावयाचा म्हणजे इतकाच, कीं, फुरसतीच्या वेळीं माझे सर्व कागद एक वेळ वाचून पहावेत, व स्वस्थपणानें माझी सर्व हकीकत ऐकून घ्यावी, ह्याशिवाय माझें दुसरें कांहीं म्हणणें नाहीं. एकदां हें सर्व ऐकलें म्हणजे मग रास्त दिसेल तो निकाल द्यावा, एवढे माझ्यासाठीं आपण शब्द बोलावे."

अशी अतिशय गळ घातल्यामुळेंच मामंजींनीं कबूल केलें; आणि **स्वतः** बसावयाचें होतें त्या माडीवर मामंजी त्या गृहस्थांना घेऊन गेले. मामंजींना पाहिल्याबरोबर **स्वतः** उठून उभें राहून ते दोघेखालीं बसल्यावर **स्वतः** बसणें झालें. मामंजी म्हणाले " हे कांहीं सांगण्यास आले आहेत, यांचें म्हणणें ऐकून घ्या."

**स्वतः** कांहींच उत्तर दिलें नाहीं. हें पाहून ते गृहस्थ बोलूं लागले, आणि म्हणाले, "मीं आज कांहीं कागदपत्र आणले नाहींत. फुरसत असेल तर आणवितों."

तेव्हां सांगितलें "आज मला लिहिण्याचें काम बरेंच आहे, फुरसतीचा वेळ असेल तो मी आपल्याला कळवीन."

हें ऐकल्यावर ते गृहस्थ म्हणाले "बरें तर, मला वेळ कळल्याबरोबर मी पुन्हा येईन. आतां जातों." असें म्हणून त्यांनीं नमस्कार केला व ते उठून गेले.

मग मामंजी खालीं जाण्यास उठले, तेव्हां स्वतःही उठून त्यांना हळूच मर्यादेनें पण स्पष्ट शब्दांनीं सांगितलें, कीं, "मी येथें कामावर आलों आहें. सर्व कोल्हापूर आपलें आहे, व जो तो येऊन आपल्या कामाबद्दल भीड घालील. असा प्रकार न झाला तर बरें. नाहीं तर आपल्यास त्रास होईल, म्हणून मला येथून दुसरीकडे बदली करून घ्यावी लागेल. कोणत्याही पक्षकाराचें काम घरीं पहावयाचें नाहीं किंवा त्याचें बोलणें खासगी रीतीनें ऐकावयाचें नाहीं असा माझा नियम आहे; तो आपण चालवावा."

याप्रमाणें बोलणें झाल्यावर पुढें तीनचार महिने कोल्हापुरासच काम केलें, पण अशी पुन्हां वेळ आली नाहीं.

पुढें पुण्यास येईपर्यंत मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत प्रोफेसरचें काम केलें. १८७१ च्या नवंबरमध्यें पुण्यास आठशें रुपये दरमहावर सदर अमीनच्या (फर्स्टक्लास सबजज्ज) जागेवर कायमची नेमणूक झाली. इ.स. १८७३ सालीं स्वतःचें पहिलें कुटुंब वारलें. ह्या, पुण्यास आल्यापासून कांहीं महिने जीर्णज्वरानें आजारीच असत. गणेशशास्त्री साकुर्डीकर यांचीं औषधें व काढा सुरू होता. तरीही त्यांचें दुखणें दिवसेंदिवस न हटतां, जें पहिल्यांदा पांचसात महिने साधें असें वाटत होतें, त्याचें डॉक्टर व वैद्य यांनीं क्षय असें नांव ठेविलें. या दुखण्यांत स्वतःला अतिशय दगदग व जागरणें पडलीं. कोर्टाचें काम संभाळून दिवसा व रात्रभर वेळच्यावेळीं आपल्या हातानें औषधें देणें, जागरणें करणें किती कठीण आहे, हें ज्याला त्याबद्दलचा अनुभव असेल त्यालाच कळेल. सौ० रमाबाईचा स्वभाव अतिशय गरीब व मनमिळाऊ असल्यामुळें, स्वतःचें त्यांच्यावर अत्यंत प्रेम होतें.

त्यामुळें त्यांच्या आजारांत होईल तितकें काम आपण करावयाचें असा स्वतःचा निश्चय असे. पुष्कळ औषधोपचार केले पण त्याचा कांहींएक उपयोग न होतां, कार्तिक शुद्ध ६, शके १७९५ म्हणजे सन १८७३ सालीं त्या इहलोक सोडून गेल्या. त्या गेल्यावर एक वर्षभर स्वतःला अतिशय दुःख झालें. त्यांच्याकरितां डोळयाला पाणी आल्याशिवाय एक दिवसही गेला नाहीं. रात्रीं जेवण झाल्यापासून झोंप लागेपर्यंत तुकारामाच्या अभंगांचें वाचन चालत असे. अभंग करुणापर प्रेमळ आला, कीं, तोच तो दोनचार वेळ म्हणावयास सांगावयाचें, व गहिंवरावयाचें, असें चाले. पण माझें लग्न झाल्यावर माझ्या शिकण्याकडे संध्याकाळचा तास दीड तास जात असे. माझ्या लग्नाची व पुढील हकीकत मी सविस्तर लिहीत आहें; पण त्यापूर्वीं माझ्या माहेरच्या घराण्याची थोडीशी हकीकत दिली, तर कांहीं गैर दिसणार नाहीं, असें वाटून ती मी अगदीं संक्षेपानें येथें देत आहें.

माझें माहेरचें घराणें म्हणजे सातारा जिल्ह्यापैकीं खानापूर तालुक्यांत मौजे देवराष्ट्रें येथें राहणारे कुर्लेकर हे होय. कुर्लेकर हे मुळचे रत्नागिरी जिल्ह्यांतील नेवरें गांवचे राहाणारे असून देशांत आल्यावर प्रथम औंधाजवळ राजाचें कुर्लें या गांवीं येऊन राहिले व त्या गांवावरून यांचें कुर्लेकर असें नांव पडलें. यांचे मूळ पुरुष बाळंभट चिपोळकर नांवाचे होते. त्यांना दोन मुलगे होते. कुर्ल्यास राहूं लागून कांहीं दिवस झाल्यावर या दोघां मुलांनीं शिपायाचे गुणांपैकीं घोड्यावर बसण्याचा बराच अभ्यास केला. या दोघांही भावांचा स्वभाव धाडशी असल्यामुळें त्यांना एकजागीं बसून चैन पडेना. कोठें तरी चांगल्या दरबारीं जाऊन पराक्रम करावा, व आपल्या चांगल्या गुणांनीं उदयास यावें, असें त्यांच्या मनानें घेतल्यावर ते दोघेही पडत्या फळाची आज्ञा घेतल्यासारखे वडिलांची आज्ञा घेऊन पुण्यास निघून गेले. तेथें आपल्या अंगच्या गुणानें प्रथम त्यांनीं आपली पागेंत भरती करून घेतली, व पुढें ते एका मोठ्या पागेचे अधिकारी झाले.

सन १७६०-६१ चे सुमारास ही पागा देवराष्ट्रें गांवींच राहूं देण्याचा ठराव होऊन तो सबंद गांव त्यांनीं पागेकडे मिळविला. पूर्वीं देवराष्ट्रें या गांवीं पंतप्रतिनिधि यांचें ठाणें होतें; पण त्यांच्यावर पेशव्यांची नाराजी झाल्यामुळें पेशव्यांनीं त्यांचें ठाणें उठवून लावलें, व तो गांव पागेकडे लावून दिला, आणि माधवराव बल्लाळ यांनीं कुर्लेकर बंधुद्वयापैकीं वडील बंधूंच्या नांवें सनद करून दिली. पुढें ही पागा पटवर्धनपथकांत सामील झाली. म्हैसूर व कर्नाटक या प्रांतांत स्वारींत जाण्याचे प्रसंग अनेक वेळ येऊन या बंधुद्वयापैकीं वडील बंधु बाजीपंत हे कित्तूरच्या हल्ल्यांत कामास आले, व बंधु माणकोपंतही शिरोळ घुमटाचे मोर्च्यांत गोळी लागून पडले. त्या दोघांनीं निरनिराळ्या ठिकाणीं आपल्या गुणानें व पराक्रमानें इनामें संपादन केलेलीं अद्यापि कुर्लेकर मंडळी उपभोगीत आहेत. यांनीं गुजराथेंत गायकवाडी झाल्यानंतर असाम्या व इनामें मिळविलीं होतीं; पण हे दोघे निवर्तल्यावर तिकडल्या उत्पन्नासंबंधानें खटपट करण्यास कोणी राहिलें नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणें वडील बंधु बाजीपंत कित्तूरच्या हल्ल्यांत कामास आले. त्यावेळीं त्यांचें कुटुंब गोपिकाबाई या गरोदर होत्या. त्या बाळंत होऊन मुलगा झाला. त्याचें नांव गणपतरावभाऊ असें ठेविलें. पुढें या मुलाचें नांव पेशव्यांचे दरबारीं दाखल होऊन, पूर्वीं बाजीपंतांनीं संपादन केलेलीं इनामें, असाम्या व पागा आतां यापुढें गणपतरावभाऊ यांच्या नांवें चालविण्याविषयीं हुकूम झाला.

हे गणपतरावभाऊ माझे सख्खे पणजे होत. हे मोठे बाणेदार शिपाई होते. हे शंकरउपासक व दृढनिश्चयी होते. तथापि वृत्ति फार भाविक असे. हे मोठे मातृभक्त होते. पूर्ववयांत एके वेळीं आपल्या मातोश्रीला ते रागामध्यें कांहीं दुरुत्तर बोलले. याबद्दल घटकाभरानें त्यांना फार पश्चात्ताप होऊन आमच्या गांवीं एक सागरेश्वर नांवाचें जागृत शिवालय आहे तेथें जाऊन आपल्या जिभेचा शेंडा कापून सांबाच्या पिंडीवर वाहिला, व " मातोश्रीला दुर्वचन बोलविण्यापेक्षां मला मुकें केलें असतेंस तर बरें झाल

असतें ! ” असें म्हणून त्यांनीं सांबापुढें साष्टांग नमस्कार घातला. हें कृत्य जवळ असलेल्या म्हाताऱ्या गुरवानें पहातांच चटकन् पुढें येऊन त्यानें सांबाच्या पिंडीवरील जिभेचा तुकडा उचलून घेतला व तो अंगाऱ्यांत बुडवून गणपतरावभाऊंच्या जिभेला चिकटवून दिला व “पुन्हां असें करीत जाऊं नका. तूं जवळ असतांना असें कसें होऊं दिलेंस असा तुमच्या मातोश्रींचा अभिश्राप आला असताना ?” असें तो म्हणाला. नुसता अंगाऱ्यांत बुडवून चिकटविलेला तुकडा चांगला जडून बसला, असें सांगतात ! असो. यांचा व चिंतामणराव आप्पासाहेब पटवर्धन यांचा ऋणानुबंध फार असल्यामुळें पटवर्धनांनीं आपली बहीण यांना दिली होती. गणपतरावभाऊंना माणिकरावआबा नांवाचे एकुलते एक पुत्र होते. हेच माझे आजोबा होत. आबांना माझ्या वडिलांसुद्धां चार पुत्र व दोन कन्या झाल्या. आबांनीं म्हणण्यासारखा कांहीं पराक्रम केला नाहीं. होतें तेंच इनाम व उत्पन्न संभाळून ते आपला सर्व काळ देवीच्या पूजनअर्चनांतच घालवीत असत. संसारांतील सर्व कामें आमच्या आजीबाईच दक्षतेनें पहात असत.

चौघां पुत्रांपैकीं माझे वडील माधवराव अण्णासाहेब यांचेवरच त्यांचे वडील व मातोश्री यांची मर्जी फार असे. कारण ते स्वभावानें जरी तापट असत तरी आपल्या घराण्याच्या लौकिकाला व सरदारी बाण्याला शोभेल अशी इभ्रतीची व गंभीरपणाची त्यांची वागणूक असे, व आपल्या घराण्याचा त्यांना मोठा अभिमान असे. ते मनाचे अतिशय उदार व धार्मिक वृत्तीचे असत. त्यांचा भरवंसा सर्वस्वी देवावर असे. आनंदाच्या किंवा दुःखाच्या वेळीं त्यांच्या मनाची उचंबळ किंवा डळमळ कधीं झाली नाहीं. ते स्थिर मनानें व निश्चयानें देवावर भारिभार टाकून, तो ठेवील त्या स्थितींत शांतपणानें रहावें, अशा समजुतीनें चालत; तथापि ते मोठे निश्चयी व दीर्घप्रयत्नी होते. कितीहि त्रास झाला तरी निराश होऊन हातचें काम सोडीत नसत. त्यांना ज्ञानेश्वरी व अमृतानुभव वाचण्याचा अतिशय नाद असे. आपल्या मित्रमंडळीबरोबर अद्वैतमताबद्दल ते वारंवार

विचार व चर्चा करीत असत. ते फार मानी, धोरणी व मोठे मुत्सद्दी असत. माझ्यासुद्धां त्यांना आम्ही सात मुलें ( चौघे मुलगे व तीन मुली ) होतों. आमच्या आईला एकंदर वीस अपत्यें झालीं, पण त्यांपैकीं आम्ही सातजणेंच कायतीं वांचलों.

माझी आई मिरज येथील राघोपंतभाऊ करमरकर प्रसिद्ध राजवैद्य यांची कन्या होय. हिलाही पांच बहिणी व तीन भाऊ होते. आमच्या आईचा स्वभाव अतिशय मायाळू, सोशिक व शिस्त असे. ती नेहमीं कांहींना कांहीं कामांत असावयाची. रिकामें बसणें तिला कधीं आवडलें नाहीं. घरांतल्या कामांतून मोकळीक झाली, कीं, औषधें, गोळ्या, वगैरे कांहींना कांहीं करण्यांत ती गुंतलेली असावयाची. आमच्या आईला वैद्यक्रिया फार उत्तम येत असे. किती किती वर्षांचे जुने रोग ती हटकून बरे करी. यामुळें आमच्या गांवच्या आसपासच्या दहाबारा खेड्यांतील लोक मोठ्या श्रद्धेनें हिच्याकडे औषध घेण्यास येत. सर्व रोग्यांना आपल्या खर्चानें व आपल्या हातानें ती औषधें तयार करून देत असे. रात्रंदिवस वेळीं अवेळीं केव्हांही रोगी आले तरी ती कधीं कंटाळली नाहीं. तिनें लागलीच उठून औषधपाणी द्यावयाचें, अतिशय गरीब असेल तर त्याला चारआठ दिवस देवडीवर ठेवून घेऊन दोन्ही वेळ आपल्या हातानें पथ्याचें घालावयाचें व औषधें द्यावयाचीं. वायूनें बेफाम झालेल्या व वेड लागलेल्या रोग्यांना ती डागीतही असे. या सर्व कामांत माझ्या वडिलांची तिला संमति व मदत असे; कारण, त्यांना हें परोपकाराचें काम आवडे म्हणून. "याबद्दल होणारा खर्च खुशाल कर, हा खरा धर्म आहे," असें ते तिला प्रोत्साहन देत. माझे वडील स्वभावानें अतिशय तापट व करारी होते. त्यांच्यापुढें ब्र काढण्याची घरांतील कोणत्याही माणसाची छाती नव्हती. आईनें पूर्ववयांत बराच जाच सोसला, पण आपल्या मर्यादेच्या वागणुकीनें व शांत आणि सोशिक स्वभावानें तिनें त्यांची मर्जी सदोदित प्रसन्न ठेविली होती. तिची समजूत अशी असे कीं, बायकांचा देव व गुरु सर्व कांहीं पति आहे. म्हणून तिनें गुरुमंत्रही माझ्या वडिलांकडून घेतला होता, व त्याचा ती मोठ्या

निष्ठेनें जप करी. इ० स० १८७६-७७ सालच्या दुष्काळानें माझ्या वडि लांची फार ओढ झाली होती, त्यामुळें येवढ्या मोठ्या परिवाराचा संसार चालविणें दोनचार वर्षें फार कठिण गेलें. त्या वेळेस तिनें मोठ्या धैर्यानें दिवस काढले. कोणत्याही तऱ्हेची अडचण प्रत्यक्ष आम्हां मुलांना कळूं न देतां किंवा दैन्याबद्दल आमच्या वडिलांच्याजवळ कधीं गाऱ्हाणें न करतां, शांतपणानें व धीरानें तिनें आलेले दिवस काढले, ते आम्हां सर्व भावंडांना अजून स्मरत आहेत. ती आम्हां मुलांशीं फार मोकळया मनानें अगदीं प्रेमळ मैत्रिणीसारखी वागे. दररोज संध्याकाळीं पुराण आटोपल्यावर आम्हां सर्व मुलांना बोलावून मोकळया अंगणांत बसे व पुराणांतील देवादिकांच्या कथा व कहाण्या सांगे. हें पाहून आमच्या आत्याबाई थट्टेनें म्हणत " आमच्या उमावहिनीला वाटतें कीं, आपलीं मुलें फारच शहाणीं आहेत. आपण सांगितलेल्या पुराणांतल्या गोष्टी त्यांना सगळया समजतात. येवढाल्या कथा त्यांना काय सांगत बसतेस ! मोठ्या माणसांच्यासुद्धां त्या लक्षांत रहावयाला कठिण पडतात." तेव्हां ती म्हणे " मला त्या कुत्र्यामांजरांच्या गोष्टी येत नाहींत, मी काय करूं ? तुम्ही सांगा पाहिजे तर, पण मला वाटतें कीं, चांगलें बीं आपलें पेरीत असावें. जशी जमीन मिळेल तसें तें मूळ धरील. यामुळें निदान आपल्या तोंडानें तरी रोज देवादिकांच्या कथांचा उच्चार होऊन आपल्याला पुण्य लागेल तेवढेंच. दुसरें काय आम्हांला घडावयाचें आहे. "

पण चमत्कार हा, कीं, त्या वेळीं आम्हां भावंडांचीं वयें अनुक्रमें चार, सहा, आठ, दहा अशा वर्षांचीं होतीं तरी पण तिनें सांगितलेल्या एकूण एक गोष्टी; नुकत्या ऐकल्यासारख्या आम्हांला आठवतात. नवीन वाचलेल्या व ऐकलेल्या गोष्टींचा विसर पडतो, पण आईनें सांगितलेल्या या सर्व गोष्टी अगदीं कोरल्यासारख्या स्मरणांत राहिल्या आहेत.

# भाग तिसरा

## माझें लग्न.



माझें लग्न सन १८७३ सालाच्या डिसेंबरांत मार्गशीर्ष शुद्ध ११, शके १७९५ दिवशीं गोरजमुहूर्तावर लागलें. लग्नासंबंधीं वेदोक्तविधि आटपून सुमारें साडेदहा वाजतां आमची वरात घरीं आली असें म्हटल्यापेक्षां आम्ही दोघेंही आपल्या घरीं पायीं चालत बरोबर आलों, इतकें खरें. लग्न झाल्यावर घरीं येते वेळीं स्वतः माझ्या माहेरीं जेवण वगैरे कांहीं केलें नाहीं व घरीं आल्यावरसुद्धां कोणाशीं कांहीं न बोलतां व कांहीं न खातां एकदम आपल्या खोलींत जाऊन आंतून कडी घालून घेतली. ह्या दिवशीं मनाला असह्य ताप झाला होता. एक तर बरोबरीच्या प्रियपत्नीचा वियोग होऊन नुकता एक महिना झाला होता. तें दुःख अगदीं ताजें होतें. तशांत, पुनः लग्न मुळींच न करण्याचें मनांत असतांना केवळ मामंजींच्या दुराग्रहानें व हट्टानें लग्न करावें लागलें व तें तरी दोन व्रतांकरितां, म्हणजे एक वडिलांचा शब्द मोडावयाचा नाहीं, आणि त्यांच्या कुटुंबसुखामध्यें आपण विघातक व्हावयाचें नाहीं. म्हणूनच बरेच दिवस स्वीकारलेल्या व योग्य वाटलेल्या मताला (पुनर्विवाहपक्षाला), जुन्या जिवलग मित्रांना, आपल्या स्वाभिमानाला व त्यामुळें मिळणाऱ्या सुखाला आणि धन्यवादाला झुगारून देऊन, वर लिहिलेलीं दोन व्रतें पाळून, त्याबद्दल जगांकडून आलेले उपहासाचे शब्द व दोषारोप सदैव सोसण्याचें पतकरलें. याकरितां ही रात्र असह्य संकटाची वाटली यांत शंका नाहीं, व तें वाटणें अगदीं बरोबर होतें. कारण, अजूनही कांहीं लोकांकडून, स्वतःच्या सर्व आयुष्यक्रमामध्यें गौण व कमीपणाचा जर कांहीं भाग असेल तर तो हाच आहे असा दोषारोप करण्यांत येतो व ही गोष्ट मोठ्या आवेशानें उच्चारली जाते, पण यासंबंधानें मला तर उलट असें वाटतें, कीं सर्व चरित्रामध्यें खऱ्या स्वार्थत्यागाचा व मनाच्या मोठेपणाचा जो कांहीं भाग असेल त्यामध्यें अत्यंत उदात्त व महत्त्वाचा भाग हाच आहे.

यासंबंधानें कोणी कितीही आपापल्या दृष्टीप्रमाणें नांवें ठेविलीं तरी मला तर याबद्दल अत्यंत आदर वाटतो व खऱ्या भक्तीनें एकंदर चरित्राकडे अवलोकन करणारांपैकीं कोणासही असेंच वाटेल.

लग्नाच्या पूर्वीं सुमारें १५ दिवस मुंबईच्या मित्रमंडळीकडून वरचेवर पत्रें येत होतीं. "ही वेळ आहे. ह्या वेळीं आपण लहान मुलीशीं लग्न करणार नाहीं, पुनर्विवाह करणार, असें वडिलांना निक्षून सांगावें," वगैरे वगैरे मजकुराचीं तीं असत. प्रथम प्रथम हीं पत्रें टपालांतून स्वतःच्या हातीं जात; पण अशीं पत्रें मंबईहून येतात असें वर्तमान मामंजींच्या कानीं पडल्यापासून ते टपालाविषयीं फार जपूं लागले. शिपायानें टपाल आणिल्यावर तें पहिल्यानें आपणाकडे मागावून घेऊन त्यांपैकीं मुंबईहून आलेलीं पत्रें व तारा ठेवून घेऊन बाकीचें टपाल वर पाठवीत. मामंजींचा दरारा घरांतील सर्वच माणसांवर असल्यामुळें ही गोष्ट जवळ कोणींच सांगितली नाहीं.

पहिलें कुटुंब वारल्याबरोबर मामंजी कोल्हापुराहून पुण्यास आले, व तेव्हांपासून मुली पाहण्यास लागले. पुनर्विवाहाच्या पक्षाकडे स्वतःचें मत असल्यामुळें आतां स्वतः लग्न करून घेणार नाहीं, पुनर्विवाहच होईल, असा मामंजींना धाक वाटला व मुंबईच्या मित्रमंडळींची प्रत्यक्ष भेट होऊन भीड पडण्यापूर्वींच लग्न उरकून टाकण्याचा मामंजींनीं विचार केला, व त्याप्रमाणें रोज मुली पाहण्याचा सपाटा चालविला.

या वेळीं माझे वडीलही स्थळें पाहण्यास पुण्यास आले होते, ते मामंजींना येऊन भेटले. त्यांचा व मामंजींचा पूर्वींचा परिचय होता. मामंजीना भेटून ते म्हणाले "माझी मुलगी लग्नाची आहे. पण आपणाला माहीतच आहे कीं, आमच्या मुलींना लग्न ठरल्याखेरीज नुसत्या पहाण्यासाठीं पाठविण्याची चाल नाहीं; करितां माझी अशी विनंति आहे कीं, आपला कोणी मनुष्य आमच्या गांवीं मुलगी पाहण्यास पाठवा. त्यांना मुलगी पसंत पडली तर तिला तेथून हालवूं. लग्नाकरितां म्हणून बाहेर नेलेली मुलगी लग्न झाल्यावांचून तशीच परत आली तर आमच्या घराण्याचा कमीपणा होणार आहे. तेव्हां प्रथम आपल्याला मुलगी पसंत पडल्याशिवाय ती मला आणतां येत नाहीं."

मामंजींनीं आमचे आश्रित वेदमूर्ति रा० बाळंभटजी वाटवे यांना माझ्या वडिलांबरोबर पाठविलें. बाळंभटजी हे आपल्या वयाच्या दहाबारा वर्षांपासून म्हणजे लहानपणापासून आमच्या घरांत रहात असत. हे चांगले विद्वान् असून कर्मनिष्ठ होते. तसेंच यांचें आचरण शुद्ध असून घरांतील सर्व माणसांना ते आप्तासारखे वाटत, व खुद्द मामंजींचा त्यांच्यावर सर्व रीतीनें विश्वास असे. ते व माझे वडील माझ्या माहेरीं आल्यावर त्यांनीं मला पाहिली. रीतीप्रमाणें विचारावयाच्या त्या गोष्टी विचारल्या, व संध्याकाळपर्यंत बाकीच्या गृहस्थितीचें बारीक रीतीनें निरीक्षण करण्याकरितांच कीं काय कोण जाणें थांबून रात्रीं निजते वेळीं माझ्या वडिलांना त्यांनीं सांगितलें, कीं, "मुलगी पसंत आहे. उद्यांच्या उद्यांच आपण तिला घेऊन पुढें जाऊं या. मग मुहूर्त ठरल्यावर तार करून आपण आपली मंडळी लग्नाकरितां बोलवा."

याप्रमाणें बोलणें झाल्यावर मी व माझे वडील व बाळंभटजी टपालाच्या टांग्यांतून पुण्यास आलों. मध्यंतरीं लग्न न करण्याबद्दल स्वतःचें मामंजींशीं पुष्कळ बोलणें असें झालें कीं, " मला लग्न करावयाचें नाहीं. मी आतां कांहीं लहान नाहीं. मला ३२ वें वर्ष आहे. तेव्हां मला विचारानें रहाण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण, दुर्गा माझ्याहून वयानें लहान असून, वयाच्या एकविसाव्या वर्षापासून अनाथ झाली आहे. आपलें प्रेम मजपेक्षां तिच्यावर कोणत्याही रीतीनें कमी नाहीं. असें असतांना, तिच्याबद्दल कांहीं विचार होत नाहीं. मग मलाच लग्न करण्याचा आग्रह कां असावा ? तिनें व्रतस्थ रहावें हें चांगलें, असें आपल्याला वाटत असेल तर तें आम्हां दोघांनाही सारखेंच लागू आहे. कदाचित् मी तसाच राहिल्यास पुनर्विवाह करीन अशी आपणांस भीति वाटत असेल तर मी तो करणार नाहीं, असं आपल्याला वचन देतों. त्याबद्दल आपल्याला काळजी नको."

अशा पुष्कळ प्रकारांनीं विनविलें, तरी मामंजी आपलें बोलणें सोडीनात. जास्तच रागावले. तेव्हां सांगितलें, कीं, "आपण जरी माझें ऐकत नाहीं

तरी मला आपलें म्हणणें ऐकलेंच पाहिजे. आणखी सहा महिने आपण मला मोकळें राहूं द्यावें. म्हणजे तोंपर्यंत मी विलायतेस जाऊन येईन.”

हें म्हणणेंसुद्धां मामंजी कबूल करीनात. तेव्हां असा निरोप पाठविला, कीं “आपण माझें कांहींच चालूं देत नाहीं, व मला लग्न करावयास लावणारच तर एवढें तरी ऐका, जिच्याशीं लग्न करावयाचें ती मुलगी गांवांतील नको, परगांवची असावी. घराणें कुलीन व नांवाजलेलें असावें. तसेंच त्यांचे इतर संबंध चांगल्या माणसांशीं आहेत याबद्दल खात्री करून घेऊन मग ठरवावें. गांवांतील मुलगी मला मुळींच नको. रूपाकडे पाहून व वयानें मोठी आहे म्हणून एखाद्या साधारण घराण्यांतील मुलगी मला नको आहे. रूपरंगापेक्षां कुलीनतेवर जास्त लक्ष ठेविलें तर तो संबंध अधिक सुखाचा तरी होईल.” याप्रमाणें बोलणें झाल्यावर पुढें दोनतीन दिवसांत आम्ही पुण्यास येऊन पोहोंचलों.

आम्ही जेथें उतरलों होतों तेथें मामंजींनीं येऊन मला समक्ष पाहिलें व पसंत करून एकादशीचा मुहूर्तही ठरविला. पण मामंजींनीं माझ्या वडिलांना असें बजावून सांगितलें, कीं, “आज संध्याकाळीं तुम्ही आमच्या घरीं मुद्दाम या, व स्वतःचें बोलणें काय असेल तें ऐकून घ्या. अनुकूल असेल तर नीटच आहे; पण उलट बोलणें झालें तर मात्र मुलगी येथेंच देण्याचा माझा निश्चय झाला आहे असें स्पष्ट सांगा.” माझ्या वडिलांना तें सांगणें मान्य झालें, आणि संध्याकाळीं आमच्या घरीं येऊन ते वर भेटावयास गेले.

माझ्या वडिलांचा चेहरा घराण्याच्या लौकिकाला व कुलीनतेला शोभेल असा पोक्त, इभ्रतदार व निश्चयी दिसत असे. त्यांना पाहिल्याबरोबर स्वतः उठून जागा घेतली व कोण, काय वगैरे तांत्रिक चौकशी केली. तेव्हां माझ्या वडिलांनीं आपण अमुक गांवचे जहागिरदार आहों वगैरे आपली हकीकत थोडक्यांत सांगून मग सांगितलें “ माझी मुलगी लग्नाची आहे; तिला देण्याच्या विचारानें आलों आहें.”

तेव्हां स्वतः म्हटलें “आपण मला काय पाहून मुलगी देण्याचा विचार केला आहे? प्रथम आपण जुन्या घराण्यांतील जहागिरदार आहांत व मी

सुधारक असून पुनर्विवाहाच्या पक्षाचा आहें. तसेंच, मी आपला शरीरानें धट्टाकट्टा दिसलों तरी डोळ्यांनीं व कानांनीं अधु आहें. शिवाय, मला विलायतेंतून जाऊन यावयाचें आहे. तेथून परत आल्यावर मी प्रायश्चित्त घेणार नाहीं. तेव्हां आपण ह्या सर्व गोष्टींचा विचार करून काय तें ठरवावें."

माझ्या वडिलांनीं उत्तर दिलें "भाऊसाहेबांचा व माझा जुना परिचय आहे. त्यांनीं मला सर्व सांगितलें आहे व माझा आपल्याला मुलगी देण्याचा निश्चय झाला आहे."

हें ऐकल्यावर बराच वेळ थांबून उत्तर दिलें "आपला निश्चय झालाच असेल तर माझें एक म्हणणें असें आहे, कीं, आज लग्न न करितां फक्त वाङ्निश्चय करून एक वर्ष तसेंच रहावें, व मग लग्न करावें."

पण माझ्या वडिलांनीं " तसें करूं नये, माझ्या घराण्याकडे लक्ष द्यावें, " वगैरे बोलून आग्रह केला.

तेव्हां **स्वतः** सांगितलें, कीं, "आतां या कामांत भाऊसाहेबांचा विचार घ्यावा व तें दोघांनीं ऐकावें." हें ऐकून माझे वडील निघून गेले.

**स्वतः**स मात्र असें वाटलें, कीं, इतक्या सर्व गोष्टी जर मी भाऊसाहेबांच्या ऐकिल्या आहेत, तर नुसतें वर्ष सहा महिने लग्न लांबणीवर टाकावयाचें, एवढी माझी गोष्ट ते ऐकणार नाहींत, असें नाहीं. असें मनांत आणून **स्वतः** मामंजींकडे जाऊन त्यांना माझे वडील आण्णासाहेब कुर्लेकर आले होते व अमुक अमुक बोलणें झालें, वगैरे सर्व सांगितलें. मग मामंजी म्हणाले, "शवटीं काय झालें तें कळूं दे." तेव्हां **स्वतः** सांगितलें, कीं, "शेवटीं काय व्हावयाचें तें आपल्यावर ठेविलें आहे. सगळ्या गोष्टी आपणच त्यांच्या तरी कशा ऐकाव्या ? त्यांनीं आपलें म्हणणें थोडें तरी कबूल करावयास नको काय ? मीं त्यांना सांगितलें कीं, आपल्या सर्व गोष्टी कबूल आहेत मी लग्न करीन, पण आज करणार नाहीं. वर्ष सहा महिन्यांची तरी मध्यें अवधि असावी." वगैरे वगैरे आपल्यातर्फेचें बोलणें **स्वतः** हळूहळू पुष्कळ बोलून त्यांचें मन वळावें असा प्रयत्न केला.

मामंजींनीं हें सर्व ऐकल्यावर तास दीडतास ते स्वस्थ आपल्या मनाशीं विचार करीत राहिले, उत्तर कांहीं दिलें नाहीं. स्वतःचें मात्र हळूहळू बोलणें चालूच होतें, पण त्यांचें लक्ष इकडे नसावें. सुमारें दोन तासांनीं मामंजींनीं बोलण्यास आरंभ केला व तेथें उभे असलेल्या मंडळींना सांगितलें, कीं, "तुम्ही सर्व बाहेर जा, एकदोन घटका इकडे येऊं नका." त्याप्रमाणें सर्व माणसें भराभरा बाहेर गेलीं. वन्सं मात्र काय बोलणें चाललें होतें तें आडून ऐकत होत्या. मामंजी स्वतःस म्हणाले "इतका वेळ झालेलें बोलणें ऐकून त्यावर मीं बराच विचार केला; पण यावेळीं तुमचें म्हणणें ऐकावें असें मला वाटत नाहीं. मी तुमच्याशीं कधींही अविश्वास धरला नाहीं, व आतांही धरीत नाहीं; पण ही वेळ अशी आहे कीं, विचारी मनुष्यानें विचारानें केलेला निश्चयसुद्धां डळमळण्यासारखा मोह संभवतालीं आहे, हें तुमच्या लक्षांत येत नाहीं का? तुमच्या म्हणण्याप्रमाणें वर्ष सहा महिने मोकळें राहूं दिलें तर मी आपल्या उतारवयांतील खऱ्या सुखाला व शांतीला मुकेन अशी मला भीति वाटत आहे. याचें कारण मी आतां सांगतों, कीं गेल्या १५ दिवसांत मुंबईच्या मित्रमंडळींकडून पत्रें व तारा आलेल्या आहेत, त्या सर्व वाचून पाहून मजजवळ ठेविल्या आहेत. त्या सगळयांचा विचार केल्यावरून तुमचें म्हणणें कबूल करूं नये, असें मला वाटतें; आधींच नवीन मताकडे ओढा, त्यांत मित्रमंडळीची भर; त्यांतल्या त्यांत वयाची अनुकूलता. इतकेंही असून संसारांत मुलगे व मुली असल्या तर थोडासा पाय मागें ओढतो, पण तुम्हांला तोही पाश नाहीं. अशी सर्व बाजूंनीं स्वतंत्रता असल्यामुळें राहुजीं नवीन बाजूचा अभिमान उचल करील व मोड पाडील, ही मला भीति आहे. पण माझें वय आतां झालें आहे. कुटुंबांतील बायकामुलांचा भार व कर्तेपणा तुमच्या कडेच येत आहे व त्याला तुम्ही योग्यच आहांत. तें असो. पण हें जर सर्व खरें आहे, तर तुमच्या म्हणण्याप्रमाणें वर्ष सहा महिनेसुद्धां मोकळें राहूं दिल्यानें मला माझ्या कुटुंबसौख्याला व समाधानाला अंतरावें लागेल. ह्या दोन्ही बाजू मीं मांडिल्या आहेत. तुम्ही विचारी आहां. जें योग्य दिसेल

तें करावें. मी माझा मात्र एक निर्धार सांगून ठेवितों, कीं, आतां लग्न केलें नाहीं तर ती मुलगी मला परत पाठवितां येणार नाहीं. कारण, त्यांत अण्णासाहेबांच्या घराण्याचा कमीपणा होईल व माझाही अपमान होईल; पण तसें करणें भाग पडलें तर आजच तुमचा व माझा संबंध सुटला म्हणून कायमचा मीही करवीरास निघून जाईन. मग यदृच्छेनें पुढें जशा गोष्टी घडावयाच्या असतील तशा घडतील." असें म्हणून एक मोठा सुस्कारा टाकून मामंजी उठून हातपाय धुऊन संध्येस गेले व स्वतः माडीवर जाणें झालें. ही लग्नापूर्वीची हकीकत वन्संच्या सहज उद्गारांवरून मला कळून आली.

यानंतर पूर्वी मामंजींनीं ठरविल्याप्रमाणें मार्गशीर्ष शुद्ध ११, शके १७९५ ( डिसेंबर सन १८७३ ) रोजीं, गोरज मुहूर्तावर आमचें लग्न झालें. लग्नानंतरचे लौकिक विधि किंवा उपचार बिलकूल करून घेतले नाहींत. फक्त वेदोक्त विधि व होमहवनादिक सर्व केलें. लग्न लागलें त्या दिवशींही कोर्टाची रजा घेतली नव्हती. लग्नाच्या वेळेपूर्वी कोर्टातून येईपर्यंत मामंजींना धाक होता, कीं, कोणी मुंबईकर मित्र येऊन ह्या वेळेस संधि साधून मुहूर्त टाळण्याकरितां कोठें बाहेर फिरावयास जातील कीं काय कोण जाणें. पण स्वतःबद्दल त्यांना इतकी पक्की खात्री होती कीं, आपल्या मनाविरुद्ध कितीही असलें तरी मला एकदां होय म्हटलेली गोष्ट स्वतःकडून करण्यास कधीं अंतर पडणार नाहीं. त्या त्यांच्या खात्रीप्रमाणें कोर्टाचें काम झाल्याबरोबर फिरावयास किंवा लायब्ररींत वगैरे न जातां एकदम घरीं येणें झालें. याप्रमाणें लग्न झाल्यावर माझे वडील मला एकटीला पुण्यास सासरीं ठेवून आपण आपल्या गांवीं परत गेले.

ह्या वेळेस हें सांगितलें पाहिजे, कीं, मला दाखवावयास म्हणून पुण्यास आणिलें, त्या वेळेस माझे वडीलच कायते बरोबर होते. तिथिनिश्चय झाल्यावर माझी आई, भाऊ, भावजया, बहिणी, चुलते, चुलत्या वगैरे घरचीं माणसें तार करून बोलवावयाचा बेत होता; परंतु मामंजींनीं मुहूर्त फार जवळचा धरल्यामुळें तसा अवधि मिळाला नाहीं. शिवाय, वेदोक्तविधी-

खेरीज दुसरा कोणताही उपचार करून घेणार नाहीं असें स्वतः निक्षून सांगितलें असल्यामुळें मुद्दाम बायकांमुळें आणून मग त्यांचा विरस करणें माझ्या वडिलांस पसंत वाटलें नाहीं. असो.

ते गेले त्या दिवशीं संध्याकाळीं सुमारें ६॥ वाजतां कोर्टांतून घरीं आल्यावर मला गच्चीवर बोलवून नेऊन विचारिलें "गेले कां तुझे वडील!"

मीं "होय," म्हणून सांगितलें.

पुनः विचारिलें "तुझें माझ्याशीं लग्न करून दिलें आहे. पण मी कोण, माझें नांव काय वगैरे तुला माहिती आहे काय?"

मी "होय," म्हणून मानेनें सांगितलें.

"मग सांग पाहूं, माझें नांव काय तें?" अशी आज्ञा होतांच मीं सर्व नांव जसें लोक म्हणत होते तसेंच सांगितलें. (लाजेचा भाग जसा समजावा तितका समजत नव्हता. कांहीं का असेना,) पण तें ऐकून एक प्रकारचें समाधान झाल्यासारखें दिसलें असें मला पक्कें आठवतें. नंतर माझ्या माहेरची सर्व हकीकत विचारिली, व मींही ती मला माहीत होती तशी सर्व सांगितली. लिहिण्यावाचण्याची चौकशी केली, पण मला कांहीं येत नव्हतें. म्हणून त्याच रात्रीं एक पाटी व पेन्सील आणवून श्रीगणेशाचा पहिला सात अक्षरी धडा घालून दिला. हा वेळपर्यंत मला पाटीची अगर अक्षरांची ओळख नसल्यामुळें तेवढीं सात अक्षरें न पाहतां काढण्यास व ओळखण्यास जवळ जवळ दोन तास लागले, तेव्हां तीं कोठें पक्कीं झालीं. दुसरे दिवसापासून दररोज रात्रीं दोन तास मला शिकविण्याकडे घालावयाचा क्रम ठेविला व मूळाक्षरें, बाराखड्या वगैरे शिकवून सुमारें १५ वे दिवशीं माझ्याकडून पहिल्या पुस्तकाचा पहिला धडा वाचविला; व त्या दिवशीं पुष्कळ बरें वाटलेंसें दिसलें. येथें सहज आठवलेली एक गोष्ट सांगतें:—

माझ्या माहेरचीं माणसें म्हणजे जुने मराठमोळा ठेवणारे जहागिरदार. त्यांच्या घरीं माहेरवासिणी व आठ वर्षांवरच्या मुलींनीं वडिलांचे समोर ओटीवरसुद्धां यावयाचें नाहीं; मग खेळणें अगर गाणीं वगैरे म्हणणें

कसलें ? लिहिण्याचें तर नांव नाहीं ? माझी एक वडील आत्या; जिचें सासर ब्रह्मवर्तास होतें. ती मात्र व्यंकटेशस्तोत्र वगैरे वाचावयास शिकली होती. तिला पुढें दुर्दैवानें वैधव्य आल्यापासून आमच्या वडील चुलत्यांनीं ठरविलें कीं, आमच्या घरांत बायकांनीं लिहिणेंवाचणें शिकणें धारजिणेंच नाहीं. झालें. असें ऐकल्यावर नुसता लिहिण्यावाचण्याचा विचारही मनांत आणला तरी पाप लागेल कीं काय, अशी घरांतील सर्व बायकांची समजूत होण्यास काय उशीर! याप्रमाणें सर्व बायकांची समजूत असल्या-मुळें आम्हां मुलींना लिहिण्यावाचण्याचा गंधही नसणें स्वाभाविकच आहे. माझ्या दोघीही बहिणींचीं लग्नें ५ वे व ७ वर्षीं झालीं. मी मात्र लग्नाला ११ वर्षांची झालें होतें. माझ्या बहिणी सासरीं गेल्यावर मला खेळण्यास कोणी नसे. मैत्रिणी असत त्या रोज येत नसत. कारण माझ्या वडिलांचा स्वभाव फार कडक असे. त्यांना आपल्या मुलींनीं कोठें खेळावयास जाणें आवडत नसे; व बाहेरच्या मुलींनीं सुद्धां मोठमोठ्यानें बोललेलें, ओरडलेलें व दांडगाई केलेली आवडत नसे. त्यामुळें वडील मळयांत वगैरे गेले अस-तील त्या दिवशीं मात्र सर्वजणी यावयाच्या. यामुळें एखादे दिवशीं करमलें नाहीं म्हणजे माझ्याहून वडील भाऊ असे; त्याच्या पाठीमागें पाठीमागें मी असून त्याला गोष्टी वगैरे वाचतांना पाहून मला फार कौतुक वाटे, व त्याला हें कसें येतें त्याचेंही नवल वाटे. माझ्या वडिलांना नेहमीं दरबारी कामासाठीं व भाऊबंदकीच्या वादांकरितां बाहेरगांवीं जावें लागे. तसेंच, ते गेल्यावर त्यांचीं पत्रें येत; तीं माझा भाऊ आईला वाचून दाखवी; पण माझें तिकडे लक्ष नसे. एके दिवशीं माझे वडील बाहेरगांवीं जाण्यास निघाले. ते पर-सांत एकटे आहेत असें पाहून मी त्यांचे जवळ गेलें. आम्हां भावंडांपैकीं कोणी मुलें त्यांच्याजवळ कधीं जावयाचीं नाहींत. कारण, मी जन्मलें त्याच्या आधीं एक वर्षपर्यंत आमची आजी जिवंत होती. म्हणून तिच्या-देखत ते कोणत्याच मुलाशीं बोलत नसत; मग घेणें कोठलें ! आजी निवर्त-ल्यावर मी झालें; त्यामुळें ते मला जेवावयास व निजावयास पुढें घेऊं लागले,

व लाड करूं लागले. त्यांनीं मला जवळ घेऊन विचारलें, कीं “ तुम्ही कां आलांत ! कांहीं पाहिजे वाटतें ! ”

मीं म्हटलें “ हो, तुम्ही पुण्यास जात आहां तर मला मोत्यांच्या बाहुल्या अन् एक साडी आणा. विसराल नाहीं तर; आणा बरें ! ” इतकें म्हणून मी धूम पळून गेलें.

त्यांनीं बाहुल्या आणल्यावांचून कोणाला कळवावयाचें नाहीं; असा माझा बेत होता. त्याप्रमाणें कोणीं ऐकलें नाहीं अशी माझी खात्री झाल्यावर मला बरें वाटलें. पुढें दुपारीं अण्णासाहेब पुण्यास गेले. “त्यांना कोणीं काय काय आणावयास सांगितलें रे ? ” म्हणून आमच्या आत्यानें विचारलें. कोणीं कांहीं कोणीं कांहीं सांगितलें; पण मी कांहींच बोललें नाहीं; व खेळाच्या निमित्तानें उठून गेलें. पुढें सातआठ दिवसांनीं पुण्याहून त्यांचें पत्र आलें. त्यांत शेवटीं मला आशीर्वाद लिहून ‘ तुझी साडी व बाहुल्या खचित आणतों आं. विसरणार नाहीं; ’ असें लिहिलें होतें. तें वाचून दाजीनें मला विचारलें “कायग चोरटे, परवां आत्याबाईनीं विचारलें तेव्हां पळून गेलीस, पण तूं आण्णासाहेबांना काय आणावयास सांगितलेंस तें मला कळलें ! ”

मीं म्हटलें “ कद्धीं नाहीं कळणार ? तूं काय देव आहेस ! एक माझ्या गणपतीला ( मी रोज पूजा करीत असें ती मूर्ति ) मात्र ठाऊक आहे; पण तो माझा आहे. कोणाला सांगणार नाहीं ! ”

दाजी मोठ्या ऐटीनें म्हणाला “ अग जा, तुझा गणपती, त्याला काय ठाऊक आहे ? मलाच ठाऊक आहे, तूं मोत्यांच्या बाहुल्या व साडी नाहीं मागितलीस ? ”

हें ऐकल्यावरोबर मी अगदीं चकित होऊन गेलें; व तें याला कसें समजलें याबद्दल मला फार आश्चर्य वाटलें. थोड्या वेळानें दाजी आपल्या अभ्यासाच्या खोलींत गेलेला पाहून मी तेथें गेलें व अगदीं आर्जवानें म्हटलें “ दाजी, हें तुला कसें समजलें सांग. ”

तो म्हणाला “अग, त्यांचें आज पत्र आलें. त्यांत त्यांनीं लिहिलें आहे.”

मला या शब्दाचा कांहींच बोध होईना. मीं म्हटलें " पत्र आलें असेल पण मीं सांगितलेलें तुला कसें समजलें ! "

तो म्हणे " अग, त्यांनीं लिहिलें आहे. "

मीं म्हटलें " असें काय, लिहिलें असेल, पण तें तुला कसें समजलें !"

त्याला समजेल अशा शब्दांनीं मला विचारण्यास समजेना, व माझा विचारण्याचा भावार्थ त्याच्या लक्ष्यांत येईना. त्यामुळें माझ्या पुनः पुनः विचारण्यानें तो त्रासला, तरी मीं आपला नाद सोडला नाहीं. तेव्हां तो अधिक त्रासून त्यानें अशी एक थप्पड दिली, कीं, त्या दिवसापासून मीं पुनः विचारिलें नाहीं, पण माझें समाधान झालें नाहीं. पोरपणामुळें पुढें ती गोष्ट मी लवकरच विसरलें.

मला वाचतां येऊं लागलें, व तिसऱ्या बुकांतील बोलणाऱ्या ढलप्याची गोष्ट मीं वाचल्याबरोबर मला त्या पूर्वींच्या दिवसांची एकदम आठवण झाली व फार आनंद झाला. पुष्कळ दिवसांचें गूढ उकललें, असें वाटलें. असो.

मग पुढें इयत्तेप्रमाणें क्रमवार अभ्यास सुरू केला. व्याकरण, गणित, मोडी व बालबोध लिहिणें, वाचणें असें सुरू झालें. रोज रात्रीं नेमानें दोन तास वेळ देण्यास स्वतःला होईना म्हणून हा अभ्यास दिवसाच करून घेण्याकरितां पुढें दोनतीन महिन्यांनीं फीमेल ट्रेनिंग कॉलेजांतील एक मास्तरीण ठेविली. मग झालें, अभ्यासाचा आनंदच. तिला भितें कोण? ती आली म्हणजे पाटी व पुस्तकें शोधण्यास अर्धा तास घालवावयाचा. ती तरी लहान वयाचीच होती. तिचा दाब कितपत रहावयाचा? तिच्या शाळें-तील गोष्टी मीं विचारावयाच्या; एकदां बोलूं लागलों, कीं, तास तेव्हांच निघून जाई. कदाचित् ती " वाचा आधीं, मग बोलूं," असें निक्षून म्हणालीच; तर वाचावयास आरंभ करावयाचा. एकदोन पानें होतात न होतात तोंच तास भरे व ती जाई. मग झाला अभ्यास. पाटी, पेन्सिल, पुस्तक यांची व माझी दुसरे दिवशीं मास्तरीण येईपर्यंत दृष्टभेटसुद्धां नाहीं.

या क्रमाला सुमारें सहा महिने गेले. तोंपर्यंत मध्यंतरीं तीन महिन्यांची रजा घेऊन अलाहाबाद, काशी, कलकत्ता व मद्रास वगैरे प्रांत पाहण्यास रा० नारायण महादेव परमानंद, रा० बाळ मंगेश वागळे व रा. शंकर पांडुरंग पंडित व दुसऱ्या कांहीं मित्रमंडळीबरोबर स्वतः जाणें झालें होतें. मी पुण्यासच होतें. परत घरीं येणें झाल्यावर एक दिवस स्वतः माझा अभ्यास विचारला व वाचून घेतलें. पण काय? पूर्वी स्वतः शिकविलें होतें तेवढेंच. अधिक कांहींच झालें नाहीं. हें पाहून दुसरे दिवशीं मास्तरणीला “ मी तुमच्यावर इचें शिकणें सोंपवून गेलों, पण तुम्हीं घ्यावी तशी मेहनत घेतलेली दिसत नाहीं, ” असें म्हटलें मात्र, तोंच ती रागानें म्हणाली कीं, “ मुलगी काय खेडवळ, सांगितलेलें समजत नाहीं, किती मेहनत घेतली, तरी लक्षांत घेत नाहीं; तिचें सगळें लक्ष खेळांत असतें. खेड्यांतील मुलींना शिक्षणाचें वळण कोठून लागणार? आपण स्वतः शिकवून पहा म्हणजे समजेल. हिला जर नुसतें लिहितां वाचतां आलें तर मी माझें नांव बदलून ठेवीन. मी आतां उद्यांपासून येणार नाहीं. अशा मुलीला शिकवून यश येण्याची आशाच नको! ” असें म्हणून ती तडक निघून गेली व स्वतः कांहींएक न बोलतां एक पुस्तक हातांत घेऊन शांतपणें वाचण्यास आरंभ केला.

काय असेल असो, पण मला मात्र पहिल्यानेंच ह्या वेळीं वाईट वाटलें व रडूं आलें; पण कोणाला दिसूं नये म्हणून चटकन् डोळे पुसून मी खालीं निघून गेलें. त्या दिवसापासून माझा हूडपणा कमी झाला असावा असें मला वाटतें. मग लवकरच फीमेल ट्रेनिंग कॉलेजांतील सगुणाबाई देव नांवाच्या एक मास्तरीणबाई शिकविण्यास ठेविल्या. ह्या स्वभावानें शांत व सुशील होत्या. त्यांच्याजवळ १८७५ साल अखेरपावेतों माझा अभ्यास ५ व्या इयत्तेपर्यंत बरा झाला.

सन १८७५ मार्चमध्यें चि० बाबाभाऊजी यांची मुंज झाली. याच सालीं विष्णुशास्त्री पंडित यांचा पुनर्विवाह झाला, व ते महाबळेश्वरीं

जाण्याकरितां पुण्यास आले होते. कचेरीची गडबड फार असल्यामुळें त्यांना रात्रींच मेजवानीस बोलाविलें होतें. दुपारीं जेवते वेळीं स्वतः वन्संना सांगितलें, कीं, " आज रात्रीं विष्णुशास्त्री पंडित व कांहीं मंडळी जेवावयास बोलाविली आहे, बेत चांगला ठेवा. "

कचेरी असेल त्या दिवशीं स्वतःचें व मामंजींचें जेवण दुपारीं एकदम होत नसे; कारण, मामंजी ११ वाजण्याचे पुढें अंघोळीला उठत. संध्या, ब्रह्मयज्ञ, जप, स्तोत्रपाठ वगैरे होईपर्यंत सहज १२ वाजत. त्यामुळें १०॥ वाजतां स्वतःची व मुलांची पंगत होई. ह्यावेळीं मामंजी, सासूबाई वगैरे मंडळी बाबाभाऊजींच्या मुंजीकरितां आलेली अजूनही पुण्यासच होती. अर्थात्, पहिल्या पंक्तीच्या वेळेस वन्संच्याजवळ स्वतः सांगितलें, तें दुसरी पगंत बसली तेव्हां सहज गोष्टींवरून मामंजींना कळलें. आज संध्याकाळीं विष्णुशास्त्री पंडित यांना आपल्या घरीं मेजवानी आहे, ही बातमी ऐकून मामंजींना राग आला, पण ह्या वेळीं ते कांहीं बोलले नाहींत. चारपांच वाजतां देवाला जाते वेळीं सासूबाईंना हांक मारून त्यांनीं सांगितलें, कीं " आज तुम्हीं पंक्तींत वाढावयाला जाऊं नका. ती मुलगीच वाढील, तुम्ही जेऊन घ्या. "

आमच्या घरीं ब्राह्मण अगर बाईचें वाढणें कोणालाच आवडत नसल्यामुळें आम्हीं घरच्या बायकांनींच दोन्ही वेळ वाढावयास घेतलें पाहिजे, अशी चाल होती. " मला यावयाला रात्र होईल; तुम्ही जेऊन घ्या; माझी वाट पाहूं नका. " असें सांगून तिनीसांजपासून मामंजी एकदां बाहेर गेले; ते अकरा वाजेपर्यंत घरीं आले नाहींत. इकडे पाहुणेमंडळी जेवून जिकडली तिकडे गेली. मामंजी अकरा वाजतां घरीं आले; आणि बाळंभटजींना हांक मारून म्हणाले "आम्हांला उद्यांच्या उद्यां करवीरास जावयाचें आहे. भल्या पहांटेस उठून गाड्या ठरवून आणा. " असें सांगून कांहीं जेवण व फराळ न करतां तसेंच निजावयास गेले.

ही सर्व हकीकत वन्संकडून स्वतःस कळल्यावर, मामंजींचा स्वभाव करारी असल्यामुळें, त्यांचा कोल्हापुरीं जाण्याचा बेत ऐकून वाईट वाटलें व आपला

हेतु नसतांना क्षुल्लक गोष्ट इतक्या निकरावर आली त्यामुळें स्वतःला रात्रभर चैन पडलें नाहीं. सकाळीं उठल्याबरोबर प्रातर्विधि उरकण्याचे पूर्वींच मामंजी ओसरीवर बसले होते तेथें जाऊन एका खांबाशीं मुकस्यानें उभें राहणें झालें. मामंजींनीं पाहिलें; पण आपलें तिकडे जसें काय लक्षच नाहीं, असें दाखवून ते कांहींच बोलले नाहींत. आम्ही घरांतील मंडळी मात्र देवघरच्या जाळींतून दारा आडून पुढें काय होतें तें पहात उभी राहिलों; कारण, मामंजींचा कोल्हापुरीं जाण्याचा बेत ऐकून धाक वाटला; सुमारें एक तास तसाच निघून गेला; दोघांपैकीं कोणी कोणाशीं बोललें नाहीं व दृष्टादृष्टही होऊं दिली नाहीं. कारण, प्रत्येकाला असें वाटत असावें, कीं, दुसऱ्यानें आधीं बोलावें. मग शेवटीं मामंजींनीं वर पाहून नांव घेऊन खालीं बसावयास सांगितलें. ते नेहमीं पांच अक्षरी नांवानें " माधवराव " अशी हांक मारीत असत. बराच वेळ झाल्यावर पुनः मामंजींनीं बसावयास सांगितलें. तेव्हां उत्तर दिलें, कीं, " आपण करवीरास जाण्याचा बेत रहित केला असें म्हटलें म्हणजे मी खालीं बसेन. आपण सर्वजण करवीरास जात असाल तर माझें तरी येथें काय आहे? मीही आपल्याबरोबर येतों. कालच्या गोष्टीबद्दल इतका राग येईल असें मला वाटलें नाहीं; तसें असतें तर ही भानगडच केली नसती, " वगैरे पुष्कळ शब्दांनीं त्यांची समजूत पडावी व मन शांत व्हावें म्हणून खटपट केली; पण मामंजींनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. नऊ वाजून गेले तरी प्रातर्विधीसुद्धां उरकला नव्हता व त्या दिवशीं कचेरीलाही सुट्टी नव्हती. तरी मामंजी कांहीं बोलत नाहींत. पण बाळंभटजी पुढें येऊन मामंजींना म्हणाले, कीं, "आपल्या सांगण्याप्रमाणें गाड्या ठरविल्या आहेत आतां येतील."

हें ऐकून व आपण इतका वेळ विनवणी करीत असून भाऊसाहेब कांहींच उत्तर देत नाहींत, असें पाहून स्वतःला फार वाईट वाटलें व पुनः बाळंभटजीकडे पाहून म्हटलें, कीं, "शेवटीं जाण्याचा बेत ठरला ना, मला येथें ठेवून सर्व मंडळी जाणार! माझी आई गेली त्याच दिवशीं मी पोरका झालों आहें." असें म्हटल्यावर तेथें उभें राहवलें नाहीं. एकदम माडीवर जाणें झालें.

कांहीं वेळ गेल्यावर बाळंभटजीला वर बोलावून नेऊन त्यांच्या हातीं मामंजींना असा निरोप पाठविला, कीं, "आपण कोल्हापुरास जाण्याचा बेत रहित करीत नसाल तर मीही राजीनामा लिहिणार आहे." हा निरोप बाळंभटजींनीं मामंजीजवळ सांगितल्यावर; आधींच स्वतःचें माडीवर जाणें झाल्यापासून मामंजींच्या मनाला कसेंसेंच वाटत होतें; त्यांत हा निरोप ऐकून फारच वाईट वाटलें व त्यांनीं एकदम सांगितलें, कीं, "मी कोल्हा-पुरास जात नाहीं; बेत रहित केला आहे; तर आतां स्नानास उठावें. कोर्टाची वेळ झाली असें वर जाऊन सांगा." हा निरोप ऐकून स्वतःच्या मनाला इतका वेळ वाईट वाटत होतें तें थोडें कमी होऊन हुशारी वाटली; व नित्य-क्रमाला आरंभ झाला. पुनः स्वतः तशी वेळ कधींही येऊं दिली नाहीं.

याच वर्षी आम्हीं हल्लीं रहात असलेलें घर खरेदी केल्यावर १८७५ च्या जून महिन्यांत मामंजी सर्व मुलांमाणसांसह करवीरास गेले. पुण्यास घर खरेदी घेतलें याबद्दल मामंजींना फारच आनंद झाला. कारण मामंजींच्या सर्व कारकीर्दींत हा वेळपावेतों त्यांचा पगार रु. २५० होता, तरी खर्चीक स्वभाव असल्यामुळें त्यांनीं आपल्या ऐपतीबाहेर खर्च इतका ठेविला होता, कीं, त्यांना कित्येक हजार रुपये कर्ज झालें होतें. अशी स्थिति असल्या-मुळें त्यांना आपल्या कमाईतून स्थावर मिळकत खरेदी घेण्यास मुळींच झालें नाहीं. मामंजींना कर्ज झालें तर तें कोणत्याही प्रकारें सुखोपभोगाकरितां किंवा चैनीकरितां नसून केवळ त्यांचा स्वभाव फार उदार व दयाळू असल्या-मुळें व त्यांच्या तीन सख्या भावांच्या व दुसऱ्या चुलत भावांच्या परिवाराचा (लग्नें, मुंजी व शिक्षण वगैरेचा) सर्व भार त्यांच्यावरच असे त्यामुळें हें कर्ज झालें. कुटुंबांतील कोणत्याही माणसाला खर्चवेंचाचें संकट आलें म्हणजे ते मामंजींजवळ विनंति करीत व मामंजींजवळ वेळेवर हाताशीं पैसे नसले तरी ते कर्ज काढून त्याची गरज भागवीत, पण नाहीं म्हणत नसत. ह्या त्यांच्या उदारपणामुळेंच त्यांना कर्ज करावें लागलें, दुसरें कारण नाहीं; पण त्यांच्या पुण्याईनें त्यांच्या पोटीं जन्म घेऊन स्वतः सर्व कर्ज फेडलें व

शेवटपर्यंत पुत्रधर्म उत्तम प्रकारें पाळला. मामंजींनीं पेन्शन घेतल्यावर तेवढ्या पैशांत त्यांचा खर्च भागेना म्हणून त्यांना पुण्याहून १५० रुपये दरमहा प्रमाणें खर्चाकरितां पाठविण्यांत येत असत. आजपर्यंत जी गोष्ट करतां आली नाहीं, ती आज आपल्या माणसानें ( पुत्रानें ) केली. म्हणजे पुणें व कोल्हापूर येथील दोन्हीं संसारांचा खर्च चालवून व भाऊबंदांचा परामर्श घेऊन शिवाय आज स्थावर मिळकत घेण्याची संधि परमेश्वराचे कृपेनें आली, याबद्दल मामंजींना फार आनंद झाला व तो होणें अगदीं साहाजिक होतें. खरेदीपत्र करण्याच्या आधीं मामंजींनीं मसुदा तयार करून वर पाहण्यास पाठविला. स्वतः तो हातांत घेऊन वाचून पाहून पेन्सिलीनें त्यावर लिहिलें, कीं, " माझें नांव लिहिलें आहे त्या ठिकाणीं आपलें नांव असावें, अशी माझी इच्छा आहे. दुसरें त्यांत कांहीं बदल करण्यासारखें नाहीं." हा कागद खालीं आल्यावर मामंजींनीं वाचून पाहिला व ते गप्प बसले. " उद्यां खरेदीखत नोंदवूं ", असें आलेल्या रजिष्टराला सांगून ते आपल्या उद्योगाला लागले. मग रात्रीं जेवण झाल्यावर मामंजींनीं माडीवर येऊन स्वतःला एकीकडे बोलावून सांगितलें, कीं, " आमच्या एवढ्या मोठ्या घराण्यांत आजपर्यंत भांडण अगर विभक्तपणा झाला नाहीं याचें कारण पुरुष सर्व मनाचे खंबीर तर खरेच, पण दुसरें आपल्या घराण्यांत स्थावर मिळकत अलीकडे कोणीं संपादन केली नाहीं. आतां आपणास श्रीजगदंबेच्या कृपेनें घर घेण्याची संधि आली आहे. त्याचें खरेदीखत माझ्या नांवानें न करतां तुमच्या नांवानें व्हावें. कारण, या मुलांचा संबंध थोडा निराळा असून शिवाय ते अज्ञान आहेत म्हणून खरेदीखत तुमच्याच नांवानें व्हावें म्हणजे कांहीं भानगड रहाणार नाहीं."

हें सर्व ऐकून घेऊन स्वतः सांगितलें, कीं, " मी या बाजूनें सर्व विचार केला आहे. या पहिल्या स्थावर मिळकतीचें खरेदीखत आपल्या नांवानें होण्यांत मला जास्त भूषण व समाधान वाटतें. म्हणून आपण नाहीं म्हणूं नये." इतकें बोलणें झाल्यावर मामंजी खालीं निघून गेले व दुसरे दिवशीं स्वतःच्या इच्छेप्रमाणें मामंजींनीं खरेदीखत करून घेतलें.

यानंतर मागें लिहिल्याप्रमाणें मामंजी करवीरीं गेल्यावर कांहीं महिन्यांनीं त्यांच्या पाठीला एक करट झालें. त्यांना मधुमेहाचा आजार असल्यानें वष दोन वर्षांनीं अशीं मोठीं करटें उठून ते महिना दोन महिने आजारी असत, व तें अगदीं जिवावरचें दुखणें जाई. तसेंच ह्याही वेळीं पाठीवर करट उठून करवीर येथील अनुभविक सिव्हिलसर्जन व मामंजींना नेहमीं औषध देणारे डॉ० सिंक्लेयर यांचे औषधोपचार सुरू झाले.

पहिला पंधरवडा झाला तरी दुखण्याला कल पडत नाहीं असें पुण्यास पत्र आलें. तेव्हां आपण एक महिन्याची रजा घेऊन भाऊसाहेबांच्याजवळ जाऊन रहावें, व औषधोपचार आपल्या हातानें करावे, असा निश्चय करून एक महिन्याची रजा घेतली व कोल्हापुरीं जाऊन स्वतः जागरण व औषधो-पचार केले; पण मामंजींच्या दुखण्याचें पाऊल पुढेंच पडत आहे असें दिसून आलें. याबद्दल डॉ० सिंक्लेयरचा विचार घेतला. त्यांनींही थोडीशी निराशा दाखविली, व दुखणें लांबणीचें आहे करितां आणखी एक महिन्याची रजा वाढवावी, असें सांगितलें. कारण, पाठीच्या दुसऱ्या भागावर एक करट उठलें व तेंही चरत जाऊं लागलें. डॉ० सिंक्लेयर रोज येऊन जखम धुऊन बांधीत. औषध व पथ्यापाण्याची व्यवस्था स्वतः आपल्या देखरेखीखालीं ठेविली होती; पण गुण वाटेना. असें करितां करितां दुसराही रजेचा महिना संपून गेला. आतां स्वतः पुण्यास येऊन कामावर हजर होऊन रजेचा अर्ज केल्यावांचून रजा मंजूर व्हावयाची नाहीं, असें माहीत होतें; पण मामंजींचें दुखणें दिवसेंदिवस जास्त होऊं लागल्यानें मामंजींना सोडून स्वतःस पुण्याला जाण्याला धीर होईना. शिवाय, रजा वाढविण्यास स्वतःस गेलें पाहिजे हें मामंजींनीं ऐकल्यापासून ते लहान मुलासारखे रडत, व "मला सोडून जाऊं नको," असें म्हणत. ह्याप्रमाणें रजा भरण्याला फक्त दोनतीन दिवसांचा अवकाश राहिला. या वेळीं आगगाडी नसल्यामुळें टपालाच्या टांग्यांतून पुण्यास येण्यास ३६ तास लागत. तेव्हां उद्यां तरी निघालें पाहिजे, असें वाटून डॉ० सिंक्लेयर ह्यांस बोलावून आणवून त्यांना ही सर्व अडचण

स्वतः सांगितली, व म्हटलें कीं, "मीं जवळून हलूं नये अशी भाऊसाहेबांची इच्छा आहे. ते मला जाऊं देत नाहींत व मला तर गेल्यावांचून रजा मिळणार नाहीं. पण आपली खात्री असेल, तर आपण त्यांना धीर द्या व समजूत घाला, म्हणजे ते मला जाऊं देतील."

ह्यावर डॉक्टर म्हणाले "मग काय हरकत आहे. आठचार दिवस जाऊन येण्यास कांहीं हरकत नाहीं. यांचें दुखणें बरें होण्याची आशा कमी, पण लांबणीचें आहे व त्यांना दुखण्याच्या मानानें ताकद्‌ही बरी आहे. करितां पुण्यास जाऊन एक महिन्याची रजा वाढवून परत यावें." असें म्हणून ते मामंजींच्या खोलींत गेले व त्यांना धीर देऊन म्हणाले "आपली प्रकृति इतकी काळजी करण्यासारखी नाहीं. आपण मि० रानडे यांना जाण्यास परवानगी द्यावी. चार दिवसांत ते परत येतील. तोंपर्यंत मी रोज दोन वेळ, जरूर वाटल्यास तीन वेळसुद्धां येऊन पाहून जाईन. आपण काळजी करूं नये." वगैरे सांगितल्यावर मामंजींनीं स्वतःस पुण्यास जाण्यास अनुमोदन दिलें.

दुसरे दिवशीं अगदीं जाण्याची तयारी झाल्यावर जवळ बोलावून व हात धरून पुष्कळ गहिंवरून अश्रु गाळीत मामंजी म्हणाले, " माधवराव, डॉ० साहेबांनीं धीर दिला आहे, पण माझा भरंवसा मला वाटत नाहीं. परत लौकर आलांत तर बरेंच आहे, नाहीं तर भेट होणार नाहीं इतकेंच. बाकी दुसऱ्या कोणत्याही प्रकारची मला काळजी नाहीं. ती सर्व व्यवस्था तुम्ही नीट कराल अशी मला खात्री आहे; पण सर्वस्वी आजपर्यंत माझ्या शिरावर असलेला बोजा आतां तुमच्या शिरावर आला आहे, हें लक्षांत आलेंना ?"

हें ऐकल्याबरोबर चटकन् सांगितलें " आपण कोणतीही काळजी करूं नका. मी पुत्रधर्म सोडणार नाहीं."

हें [illegible]न मामंजींना जास्तच हुंदका आला. त्यांनीं जवळ घेऊन पाठीवरून [illegible]रवून पुण्याला जाण्याची परवानगी दिली. मग त्यांना नमस्कार करून व घरांतील माणसांची परवानगी घेऊन व विचारून टांग्यांत बसतेवेळीं वन्सं व मोरूमामा (सासूबाईंचे बंधू) यांना एकीकडे बोलावून बजावून सांगि-

तलें, कीं, "भाऊसाहेबांचें दुखणें जास्त आहे, हें सर्वांना दिसतच आहे; पण मला माईची काळजी विशेष वाटते. त्यांचीं मुलें लहान आहेत. त्यांना फार जपा. कपिलतीर्थाकडील मागील दाराला कुलूप लावा, व माई-वर जास्त लक्ष्य ठेवा." वगैरे सांगितल्यावर टांगा चालू झाला.

पुण्यास आल्यावर रजा मंजूर होण्यास सहा दिवस लागले. तोंपर्यंत मामं-जींच्या प्रकृतीचें मान डॉक्टरांनीं रोजच्या रोज तारेनें कळवीत जावें, असें ठरलें होतें. त्याप्रमाणें ते कळवीत असत. रजा मंजूर झाल्यावर जी तार आली. तींत प्रकृति थोडीशी जास्त आहे, असें लिहिलें होतें. त्याच दुपारीं कोल्हापुरास जाण्याची तयारी झाली व टांग्यांत सामान ठेविलें—इतक्यांत दुसरी तार आली तींत मामंजी* वारल्याची दुःखकारक बातमी वाचून अति-शय दुःख वाटलें, आणि कोल्हापुरास जाण्याचा बेत रहित झाला. पुढें एक-दोन दिवसांनीं केरोपंत नाना छत्रे, कृष्णाशास्त्री चिपळूणकर वगैरे समाचारास आले. त्यांनीं विचारलें, कीं, "या वेळेस कोल्हापुरास जावयाचें तें येथें राहणें कां केलें?" तेव्हां सांगितलें, कीं, "तेथें ताई, दुर्गा आक्का, बाळंभटजी, मोरूमामा व त्यांची आई आहेत. ती मंडळी सर्व व्यवस्था करील.आतां पुढें होणारा प्रकार मला बिलकूल पाहवणार नाहीं व सहन होणार नाहीं आणि तो टाळतां येणें शक्य नाहीं. म्हणून मुळींच न गेलेलें बरें. नुसतें समाचा-रास जाण्यापेक्षां तेथील खटलें मोडून सर्व मंडळीस येथेंच आणण्याचा माझा विचार झाला आहे. म्हणजे दुहेरी काळजी करण्यास नको."

या गोष्टीला पंधरावीस दिवस लोटल्यावर कोल्हापूरचें खटलें मोडून, व मामंजींच्या देण्यापैकीं दोन हजार रुपये कर्ज मुद्दाम राखून ठेविलें होतें त्याचा व्याजासुद्धां सर्व हिशोब निघेल ती बाकी देऊन टाकावी व कागद फाडून घ्यावा असें पत्र लिहून सोबत एक हुंडीही पाठविली होती. मामंजींचा स्वभाव खर्चीक असल्याचें मागें लिहिलेंच आहे. त्यांचें कर्ज कित्येक वेळां पैसे पाठवून फेडून टाकिलें, तरी कोणा भाऊबंदाची मागणी आली, कीं, पुनः ते त्यांना

* मामंजी ता. २० फेब्रुवारी १८७७, माघ वद्य ६ ला वारले.

कर्ज काढून पैसे देत. असें एकदोन वेळ झालेलें पाहून स्वतः अशी तोड काढली, कीं, किरकोळ देणें होतें तें व मोठ्या रकमा होत्या त्यांपैकीं बहुतेक देऊन टाकून मामंजींचा विशेष परिचित एक सावकार होता त्याचें मात्र २००० रुपये देणें मुद्दाम राखून ठेविलें होतें. त्याचा परिणामही बरा झाला. त्यांचें पहिलें देणें असल्यामुळें मामंजींनीं नवें कर्ज त्याच्यापासून घेतलें नाहीं. असो.

याप्रमाणें पत्र व हुंडी गेल्यावर पत्रांत लिहिल्याप्रमाणें बाळंभट वाटवे व मोरूमामा यांनीं तेथील देण्याघेण्याची सर्व व्यवस्था करून व खटलें मोडून तेथील मुलेंमाणसें व तेथें असलेलीं नोकरमाणसें यांसह ते पुण्यास आले. सासूबाई पुण्यास आल्या दिवसापासून स्वतः असा क्रम ठेवला, कीं, संध्याकाळच्या जेवणापूर्वीं एक तास सासूबाईच्या खोलींत बसून त्यांची व मुलांची पूसतपास करावयाची. त्यांना अतिशय दुःख झालें असल्यामुळें त्यांचें थोडेसें समाधान होईल अशा तऱ्हेच्या कांहींतरी त्यांच्याशीं गोष्टी बोलून मग जेवावयास उठावयाचें, असा नित्य नेम शेवटपर्यंत सारखा ठेविला होता. हा नियम फक्त परगांवीं गेल्यावांचून कधींही टळत नसे. याप्रमाणें उभयतां मुलगे ( म्हणजे आबा, बाबा ) सासूबाईच्या बरोबर पुण्याला आल्यापासून त्या दोघांच्या व माझ्या अभ्यासाकडे जास्त लक्ष व वेळ देण्यास सुरुवात केली.

माझ्या व दोन मुलांच्या ( भावांच्या ) वयांत अनुक्रमें सुमारें एक दोन वर्षांचें अंतर असल्यानें व स्वतःची आमच्यावर पूर्ण नजर असल्यामुळें आम्ही तिघेंही सख्या भावंडांप्रमाणें आनंदानें, प्रेमानें व एकोप्यानें वागत होतों, घरांतील वडील माणसें कोणी कितीही बोललीं तरी आमची जूट मोडत नसे. ह्यावेळीं माझा अभ्यास मराठी ५ इयत्ता होऊन मी लिहिणें-वाचणें व हिशेब शिकत होतें व उभयतां भाऊजींनां हायस्कुलांत घातलें होतें. त्यांची इंग्रजी पहिली इयत्ता होऊन या वेळेस ते दुसरींत बसले होते. त्यांचें पाहून मलाही इंग्रजी शिकावें अशी भारी हौस वाटूं लागली व त्याबद्दल एके दिवशीं मीं जवळ हळूच गोष्ट काढिली. मीं होऊन इंग्रजी

शिकविण्याबद्दल गोष्ट काढलेली पाहून स्वतांस बरेंच नवल पण समाधान वाटलें, आणि सांगितलें, कीं, "मी तुला इंग्रजी खरोखर शिकविणार आहें. हें माझ्याही मनांत कितीएक दिवस आहे; पण तुझें मराठी संपेल तेव्हांना?"

ह्या वेळीं येथें एक गोष्ट सांगितली पाहिजे कीं, आमच्या घरीं पुरुषांना बायकांनीं लिहिणेंवाचणें शिकावें अशी आवड असल्यामुळें वन्संना व सासूबाईंना मामंजींनीं स्वत: लिहिणेंवाचणें व जमाखर्च मांडणें हें कामापुरतें शिकविलें होतें. याबद्दल त्या दोघींना भूषण व अभिमान वाटे. आमच्या घरांतील पुरुषांना बायकांनीं शिकावें हें आवडतें आणि वन्सं व सासूबाई यांनां हें माहीत होतें, एवढेंच नव्हे, तर त्यांना याबद्दल अनुभवही होता. असें असून माझ्या शिकण्याच्या वेळीं त्यांची सहानुभूति तर नव्हतीच, पण उलट त्या अतिशय रागावत व तिरस्कारा करीत. जसें कांहीं याही ताईसासूबाईसारख्या अगदीं जुन्या मताच्या व लिहिण्याचा गंधही नाहीं अशाच होत्या! या वेळीं आमच्या घरांत साधारण जवळच्या दूरच्या नात्याच्या आठनऊ जणी बायका होत्या. पण त्यांत माझ्या बरोबरीची एकही नव्हती. त्यामुळें त्यांचा एक वेगळा पुढाच बनून राहिला होता, रोज रात्रीं मी माडीवर गेल्याबरोबर वाचनास आरंभ व्हावयाचा.यावेळीं दक्षिणाप्राईज कमिटीचीं पुस्तकें व मराठी दुसरें सर्व वाचनाचें काम मजकडेस आल्यामुळें पुस्तक गद्यात्मक असेल तर कांहीं नाहीं, सहज वाचून जाई; पण पद्यात्मक असलें म्हणजे तें वाचण्यास संकोच वाटे. कारण पदें, आर्या, श्लोक वगैरे जें कांहीं असेल तें गळयावर मोठ्यानें वाचावें लागे. तसें वाचलें नाहीं, संकोचानें हळू हळू वाचलें, तर राग येई व मोठ्यानें वाचावें तर वर सांगितलेल्या बायकांपैकीं कोणींना कोणीतरी जिन्याशीं अगर दाराशीं उभ्या असावयाच्याच! ह्या दुसरे दिवशीं, रात्रीं वाचलेली चाल अगर कडवीं लक्षांत ठेवून, तसेच हेल काढून वडील बायकांच्या देखत मला वेडावून दाखवावयाच्या, चिडवावयाच्या व लाजवावयाच्या.कोणी कांहीं बोललें तरी मी कोणाला उत्तर देत नसें. काय कोण बोलेल तें खरें असो अथवा खोटें असो, तें फक्त ऐकून घ्यावयाचें व निमूटपणें सहन करावयाचें. केव्हां केव्हां तर या बायका पोक्तपणाचा व

मायेचा आव आणून व माझ्याजवळ बसून मला म्हणत " या लिहिण्या-वाचण्याबद्दल तुम्ही किती बरें या वडील बायकांचें बोलून घेतां ? आम्हांलाही वाईट वाटतें, पण उपाय काय ? अहो पुरुषांना आवडलें, तरी एखाद्या वेळीं वाचावें; पण यांत घरांतील वडील माणसांचा अपमान होत नाहीं का ? पुरुषांना या गोष्टी काय समजतात ? आपल्याला सगळा वेळ बायकांतच काढावयाचा असतो. पुरुषांशीं संबंध कितीसा असणार ? एक वेळ नाहीं दहा वेळ सांगतील. आपण ऐकलेंच नाहीं म्हणजे झालें. कंटाळून आपणच सोडून देतील. आपल्या हातांत नाहीं कीं काय ? " वगैरे वगैरे शब्दांनीं सवड सांपडेल तेव्हां तेव्हां बोध करीत. त्यांना या गोष्टी करण्याला वडील माणसांचें आंतून पाठबळ असे, हें मला माहीत असल्यामुळें त्यांना अनुकूल किंवा प्रतिकूल उत्तर मीं कधींच दिलें नाहीं. मला करावयाचें तें मी मुकाट्यानें करीं.

असे कांहीं महिने लोटल्यावर माझा मराठी अभ्यास संपून इंग्रजी शिकविण्यास स्वतः सुरुवात केली. त्यामुळें पहिल्यासारखें नुसतें रात्रीं व पहांटे जवळ बसून केलेला अभ्यास पुरा पडत नसे. शब्द पाठ करण्याकरितां दिवसाही एक दीड तास वेळ द्यावा लागे, तरी अभ्यासास खालीं बसण्यास सोय नव्हती म्हणून वरच बसावें लागे. ह्यामुळें आमच्या वडील बायकांच्या अंगाचा अगदीं तिळपापड होऊन त्यांचा राग अतोनात वाढला, व एक दिवस त्यांनीं साफ सांगितलें, कीं, " तूं माडीवर काय हवें तें कर, पण आमची अमर्यादा केलेली आम्हांला अगदीं खपावयाची नाहीं ! "

असें बोलण्यास त्यांना एक कारण मिळालें होतें, दुपारचें जेवण झाल्यावर सगळ्या बायका मागल्या सोप्यांत बसल्या होत्या. मी माजघरांतील केर काढीत होतें. अर्धामुर्धा केर काढून झाल्यावर केरांत इंग्रजी वर्तमानपत्राचा एक कपटा सांपडला. आधींच माझा [illegible] गा, त्यामुळें कोणत्याही गोष्टीला आरंभ केला नाहीं तोंच ती [illegible] झाली असें वाटून त्याबद्दल उतावीळपणानें मी हातांतील केरसुणी खालीं ठेवून तो कपटा वाचीत उभी राहिलें. पहिल्या बुकाला आरंभ होऊन कोठें पंधरा दिवसही पुरते झाले नव्हते तोंच

मला इंग्रजी वाचावयाला तें काय येणार होतें ? पण नुसतीं अक्षरेंच पहात उभी राहिलें. आपण खालीं आहोंत ही मला आठवणच नाहीं. ह्या वेळीं आजेसासूबाईची ( सासूबाईच्या आईची ) नजर मजकडे गेली व त्यांनीं जवळ असलेल्या बायकांना हळूच खूण केली. त्याबरोबर दोघीतिघींनीं दारांत येऊन मला पाहिली, पण मला याचा पत्ताही नाहीं ! मी आपली तशीच नादांत आहें, हें पाहून वन्संना फारच राग आला व त्या मोठ्यानें ओरडून म्हणाल्या " तुमचें हापीस माडीवर आहे. तेथें तुम्ही वाचा कीं नाचा, आमच्या अपमान केला तर खबरदार ! तीच आमची पहिली वहिनी नव्हती का ? तिला दादांनीं लिहिण्यास, वाचण्यास सर्व कांहीं शिकविलें होतें. ती आमच्या बरोबरीची होती, तरी देखील तिनें आमच्या देखत एक अक्षरही वाचलें नाहीं. तिला इंग्रजी शिकण्याबद्दल त्यांनीं जंग जंग पछाडले, पण त्या माउलीनें तिकडे लक्षच दिलें नाहीं. आतां तीही त्यांची बायको होती. तिला दहा गोष्टी सांगितल्या तर एखादी तरी करावी लागेच; पण असा नाचरेपणा नव्हता !" वगैरे बरेंच बोलल्या.

अशाच तऱ्हेचीं बोलणीं पदोपदीं चालत. त्यामुळें इंग्रजीला कोठून आरंभ केला असें वाटून घटकेघटकेला मी रडकुंडीस येई व केव्हां केव्हां तर अति झालें म्हणजे एकीकडे रडें; पण ही गोष्ट जवळ बिलकूल सांगत नसें. कारण, मी प्रथम सासरीं येतांना माझ्या वडिलांनीं मला जवळ घेऊन उपदेश केला होता, कीं, "हें बघ, तूं आपल्या सासरीं जात आहेस. सख्या सावत्राचें कुटुंब, पदरीं दहा तऱ्हेचीं माणसें आहेत. तूं माझी मुलगी आहेस, आपल्या कुलीन घराण्याला शोभेल असें वाग. तुला कितीही त्रास झाला तरी सोस, पण नोकरांनासुद्धां उलटून बोलूं नको. हें एक व दुसरें तुझ्या मनाला असह्य झालें तरी तूं होऊन कोणाचीच चहाडी नवऱ्याजवळ सांगत जाऊं नकोस. चहाडीनें कुटुंबाचाच नव्हे पण राज्याचाही नाश होतो. ह्याकरितां मी सांगतों हीं दोन व्रतें पाळ म्हणजे तुला कधीं कांहीं कमी पडणार नाहीं. तूं भाग्यवान् आहेस. सोशिकपणा हा तुझा गुण

झाला म्हणजे तूं खऱ्या किंमतीला चढशील व आमच्या कुलांत जन्म घेतल्याचें सार्थक होईल. हें माझें बोलणें लक्षांत ठेव. याच्या उलट वागतेस असें ऐकलें तर मी कधीं फिरून तुला माहेरीं आणणार नाहीं."

माझे वडील अतिशय कडक व दृढ निश्चयाचे असल्यामुळें बोलल्याप्रमाणें करण्यास कधीं चुकावयाचे नाहींत, अशी माझी खात्री असल्यानें माझ्या मनावर त्यांच्या बोलण्याचा चांगला परिणाम घडून, हीं दोन्हीं व्रतें मीं पाळण्याचा निश्चय केला. यामुळें मला फार कठीण गेलें. हें व्रत संभाळण्याकरितां माझें रडणें व सुकलेलें तोंड स्वतःच्या नजरेस येऊं नये म्हणून अतिशय जपावें लागे, तरीसुद्धां लक्षांत येईच. मनुष्याला जाच किंवा त्रास फार झाला, म्हणजे त्याचा उद्गार कोणाजवळ तरी काढल्याशिवाय मन हलकें होत नाहीं, असा अनुभव असतो; पण तसा उद्गार काढण्यास मला संधि नसल्यानें दिवसभराच्या त्रासानें संध्याकाळपर्यंत मन अगदीं फुटणाऱ्या गळ्यासारखें होई; पण चमत्कार हा, कीं, रात्रीं माडीवर गेल्यावर या सर्व गोष्टी मी एका क्षणांत विसरून जाई. जसें काय दिवसभर त्रास झालाच नाहीं. असो.

"आज अमुक वेळेस तूं अशी कां दिसलीस? कोणी कांहीं बोललें काय? रडल्यासारखी दिसत होतीस," वगैरे पुष्कळ तऱ्हेनें विचारिलें तरी, मी लहान भावंडांची किंवा आईची आठवण झाली असें कांहीं तरी सांगें; कारण, एकदां कांहीं तरी थोडें सांगितलें तरी ओघाओघानें काढून घेतलें जाईल, अगर तें माझ्याकडून सहज निघून जाईल, कसेंही झालें तरी यानें माझा नियम मोडेल; शिवाय आमच्या खऱ्या सुखासमाधानाची वेळ असल्या गोष्टींत जितकी जाईल तितकें आमचेंच सुख कमी पडेल, दुसरा फायदा तर कांहीं नाहीं, अशी माझी समजूत होती. तथापि आपल्या घरांतील वडील नायकांचा स्वभाव स्वतःला पक्का माहीत असल्यामुळें खरा प्रकार काय असेल याची कल्पना तेव्हांच होई, व त्या धोरणानेंच माझी समजूत व समाधान करावयाचें असे. फार वेळ न लागतां त्या प्रेमपूर्वक व शांत शब्दांचा मनावर इतका परिणाम होई, कीं, दिवसभर झालेला त्रास मी केव्हांच विसरून

माझ्यासारखी सुखी कोणीच नाहीं, असें वाटून सकाळपर्यंत आनंदांत असें. सकाळीं खालीं जाण्याची वेळ आली म्हणजे पुनः पोटांत धस्स होई, तेव्हां धीर देऊन सांगावयाचें, कीं, "थोडें सोसावयास शिकावें, उत्तर दिलें नाहीं म्हणजे झालें, ती तुला कधीं कांहीं बोलत नाहींना! इतर कोणी कांहीं बोललें तरी रडत जाऊं नकोस." याप्रमाणें धीर दिल्यावर माझा तो सर्व दिवस शांततेंत जाई.

या शिकण्याच्या पायीं मला घरांतील सर्वच बायकांकडून प्रत्यक्षाप्रत्यक्ष पुष्कळच जाच सोसावा लागला; पण मीं अभ्यासक्रम सोडला नाहीं. हें सर्व सोसण्याला माझे दोघे दीर या त्रासाच्या व जाचाच्या वेळीं माझ्याशीं आपले-पणानें व प्रेमानें वागून वडील बायका रागवल्या तर तूं भिऊं नकोस, असें म्हणून मला धीर देत व माझा कैवार घेऊन त्यांच्याशीं बोलत. त्यांत मुख्यतः स्वतःकडून शांत, गंभीर व अतिशय प्रेमानें केलेला उपदेश, या सर्व गोष्टी सोसण्यास मला आधारभूत झाला. असें नसतें तर, या प्रकारच्या जाचांत व त्रासांत माझ्यासारख्या अल्प वयाच्या व अल्प समजुतीच्या मुलीनें टिकाव धरला नसता. अगर घरांत रहावें तसें सौख्य व शांति राहिली नसती. कारण, माझें मन अगदीं त्रासल्यानें सदा उदास राही. बाहेरून कितीही समाधान दाखविलें व त्रासाबद्दल उच्चारही केला नाहीं तरी खऱ्या प्रेमाच्या माणसांना एकमेकांचीं मनें जितकीं सहज व चांगलीं ओळखतां येतात, तितकीं दुसऱ्या कोणालाही व कोणत्याही उपायांनीं ओळखतां येणें शक्य नाहीं. त्याला अनुसरून स्वतःचें मनही बरेंच त्रासल्यासारखें होऊन समाधान कमी झालें होतें, व असेंच आणखी कांहीं दिवस चालतें तर हा आंवरून धरलेला बांध फुटला असता व कांहीं तरी त्रास उद्भवण्याची भीति होती पण पुण्याई सबळ म्हणून अशा रीतीचा विशेष त्रास न होतां लव-करच आमची बदली नाशिकास झाली. पण या बदलीमुळें स्वतःच्या व पुणेकर मित्रमंडळीच्या मनाची स्थिति काय होती, त्यांना या बदलीपासून बरें वाटलें किंवा वाईट वाटलें वगैरेंची कल्पना किंवा गंध देखील मला

नव्हता. आमची बदली नाशिकास झाली, आतां आम्ही तेथें जाऊं, तेथें मी असें करीन, तसें करीन, वगैरे भावी आनंदाच्या कल्पनेंत व बेत करण्यांत मी एक दोन आठवडे गढून गेलें होतें. मग लवकरच आम्ही दोघें व आबा-भाऊजी नाशिकास गेलों. वडील बायकांपैकीं कोणालाही मुद्दाम बरोबर घेतलें नाहीं. त्यामुळें स्वतःच्या हेतूप्रमाणें माझ्या अभ्यासास सुरुवात झाली. स्वतःलाही जास्त शिकविण्याचा उत्साह वाटूं लागला, व आम्हां दोघांचेही दिवस आनंदांत जाऊं लागले. पण नाशिकास जाण्याचे पूर्वी पुण्यांतील थोडीशी हकीगत सांगतें.

सन १८७४-७५ सालांत सार्वजनिक चळवळीच्या कांहीं विशेष गोष्टी पुण्यांत घडल्यापासून व त्यांत मल्हारराव गायकवाडांच्या विषप्रयोगाच्या खटल्यांत 'खटला चालविण्यास संस्थान मंजूर करीत नाहीं तथापि एक लाखपर्यंत खर्च पुरविण्यास पुणें तयार आहे. महाराजांनीं शेवटपर्यंत खटला चालवावा,' अशा अर्थाची पुणेंकरांची बडोद्यास तार गेल्यापासून पुणेंकरांवर सरकारची करडी नजर होती. या वेळीं सर रिचर्ड टेंपल यांची कारकीर्द होती. या सर्व चळवळीच्या मुळाशीं कोण आहे म्हणून कांहीं वरिष्ठ कामगारांकडून फार बारकाईनें शोध चालू होता. कोणत्याही रीतीनें स्पष्ट शोध न लागल्यामुळें कांहीं मंडळींकडे सरकार संशयदृष्टीनें पाहूं लागलें, आणि पुण्यांतील ही सर्व चळवळ मिटविण्यास कांहीं विवाक्षित मंडळींची पुण्यांतून उचलबांगडी करावी असें धोरण धरून स्वतःची पुण्यांतून बदली करण्याकरितां 'तीन अगर पांच वर्षें एकच सबजज्ज एका एका जागीं यापुढें राहूं नये,' असा मुंबई इलाख्याकरितां नवा कायदा लागू करून त्याअन्वयें आमची बदली नाशिकास केली.

ही बदली होण्याच्या आधीं चार महिने पुण्यास कोणी एक परका गृहस्थ मुशाफरीबाण्यानें येऊन राहिला होता. त्याचा उद्देश पुण्यांतील पुष्कळ लहानमोठ्या विद्वान्, जुन्या व नव्या अनेक लोकांशीं परिचय करून त्यांचा स्नेह संपादन करावयाचा होता, येवढेंच बाह्यात्कारी दिसे. पण आंतून

त्याचें काय गौडबंगाल असेल तें त्याचें त्यालाच माहीत! त्यानें जेथें बिऱ्हाड घेतलें होतें, त्या खोलींत पानसुपारीचें तबक, विड्या, चिरूट, सोंगट्या, गंजीफा, बुद्धिबळें, बिझिक व सतार हीं नेहमीं तयार असत. आमची पुणेंकर मंडळी या गोष्टीची थोडी अधिक भोक्ती खरी. त्यांना एखादी अशी संधि मिळाली, कीं, ते तेथें मधमाशीसारखे चिकटलेच. याला अनुसरून कित्येक मंडळीचा सकाळसंध्याकाळ या गृहस्थाच्या घरीं बसण्याचा अड्डाच पडला. कोणत्याना कोणत्या खेळांत ही मंडळी गढून गेलेली असावयाची. या मंडळीमध्यें सीताराम हरि चिपळूणकर हे विशेष नादीं लागले होते. ते या वेळीं सार्वजनिक सभेचे सेक्रेटरी होते, व सभेच्या त्रैमासिकाचा मजकूर लिहून घेण्यास रोज आमच्या घरीं यावयाचे. हे अलीकडे वेळेवर येईनासे झाले; उशीरां यावयाचे. बाकी नेहमीं काम करणारे मोठे ताठर असत, कधीं कंटाळावयाचे नाहींत; पण अलीकडे जरा आळस करूं लागले असें पाहून व रागावून सीतारामपंतांना स्वतः विचारलें, कीं, "आताशें तुम्ही आहांत तरी कसल्या ढंगांत ?"

तेव्हां त्यांनीं या गृहस्थाची हकीकत तांत्रिक सांगितली. पण स्वतःचें समाधान झालें नाहीं. त्याचा छडा लावावयाचा उद्योग स्वतः चालविला, व "मला कळविल्याशिवाय त्या मनुष्याशीं सार्वजनिक सभेबद्दल किंवा दुसरे कशाबद्दलही बोलत जाऊं नका, उगीच त्रास करून घ्याल. तो मनुष्य हेर असावा असा माझा अजमास आहे व तोच खरा ठरेल," असें स्वतः म्हटलें.

एके दिवशीं कांहीं मंडळी आमच्या घरीं आली असतां ते या नवीन गृहस्थाबद्दल बोलूं लागले, कीं, "तूर्त गांवांत आलेले गृहस्थ फारच हौशी, आनंदी, मनमिळाऊ व विद्वान् आहेत."

तेव्हां स्वतः विचारलें "त्यांचें नांव गांव काय? ते कोठील राहणारे आहेत? हल्लीं काय धंदा करतात? व किती शिकलेले आहेत? हें तुम्हांला माहीत आहे काय?"

हें ऐकून मंडळी म्हणाली "ते अगदीं भिडस्त आहेत. नांव, गांव, धंदा व कोठपर्यंत शिकलेले आहेत हें ते कांहींच सांगत नाहींत. कोणीं विचारलें

तर ते नुसते हंसतात व म्हणतात कीं, 'मी यःकश्चित् माणूस. माझें नांव, गांव व धंदा तुम्हांला काय करावयाचें आहे;' असें म्हणून हंसण्यावारीच नेतात; पण कांहींच सांगत नाहींत. ते विनयशील असल्यामुळें आपली प्रौढी सांगणें त्यांना बहुधा आवडत नसेल. बाकी चांगल्या घराण्यांतील व फार विद्वान् असावे, असे दिसतात."

हें सर्व ऐकून घेतल्यावर स्वतः म्हटलें "तुमच्या अजमासाप्रमाणें ते गृहस्थ चांगले व विद्वान् असतील; पण मी सांगतों तेवढी माहिती मला आधीं मिळवून द्या, मग दुसरें काम करा; मग हे कोण आहेत तें तुम्हांला कळेल. उद्यां सकाळीं उठल्याबरोबर यांच्या टपालाचा शोध लावा. पत्रावरील छाप कोणत्या गांवाचा असतो व हे पाठवितात तीं पत्रें कोणत्या गांवाला जावयाचीं असतात, वगैरे सर्व बारकाईनें पाहून एकदोन दिवसांत मलां येऊन कळवा."

मंडळी 'होय' म्हणून उठून गेली व तिसरे दिवशीं सकाळीं सीतारामपंत चिपळूणकर येऊन म्हणाले "परवां व काल मीं टपालाचा सगळा शोध लावला. त्या गृहस्थाचें टपाल शिपायाबरोबर येत नाहीं. ते पहांटे उठून फिरावयास म्हणून बाहेर जातात, ते प्रथम एक रस्त्यानें निघून वांकडीं तिकडीं वळणें घेऊन शेवटीं जनरल पोष्ट ऑफिसमध्यें जाऊन टपाल आपल्याजवळ घेतात व पाठविण्याकरितां तयार केलेलें टपाल बरोबर नेऊन आपल्या हातानें पेटींत टाकतात. काल त्यांच्या मागोमाग पुष्कळ अंतरावर मी होतों, त्यामुळें येतांना वाटेंत मला हें फोडलेल्या पत्राचें कव्हर सांपडलें. त्याजवर सिमल्याचा छाप आहे. एकंदर गोष्टींवरून आपण घेतलेल्या संशयाला जागा पुष्कळ आहे, असें आम्हांलाही आतां वाटूं लागलें आहे. शिवाय, पोष्ट ऑफिसांतील माझ्या एका मित्रानें मला आतांच सांगितलें, कीं, या गृहस्थांचा पत्रव्यवहार कलकत्ता व सिमला येथील गव्हर्मेंट सेक्रेटरीशीं असावा असें दिसतें. कारण, त्यांच्या नांवावर यांचीं बरींच पत्रें जातात."

इतकें झाल्यावर ही कुजबुज बहुतेक आमच्या सर्व मंडळींत करून संध्याकाळापेक्षां सकाळीं व सकाळहूनही दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं या गृहस्थांच्या घरीं जमणारी पुणेंकरांची संख्या अगदीं कमी होऊं लागली. ह्या एकदम पडलेल्या अंतरामुळें आपलें खरें स्वरूप पुणेंकरांना कळलें असावें असें अनुमान त्या गृहस्थानें करून आपलें भांडवल फुटूं नये म्हणूनच या परक्या मुशाफर वाण्याच्या गृहस्थानें तिसरे दिवशीं रात्रीं कोणाला न कळत गाशा गुंडाळून पोबारा केला.

## भाग चवथा.

# दयानंदसरस्वती यांचें पुण्यास आगमन.



लाहोराहून स्वामीजी पुण्यास आल्यापासून त्यांचीं बुधवारांत बेलबागेसमोर भिडे यांच्या दिवाणखान्यांत दररोज व्याख्यानें होत असत. स्वतः संध्याकाळचे दोन अडीच तास हीं व्याख्यानें ऐकण्यांत व तेथील व्यवस्था करण्यांत जात असत. व्याख्यानें संपल्यावर दयानंदजी स्वस्थानीं जाण्याचे पूर्वी सन्मान करण्याकरितां त्यांची मिरवणूक काढावी, असा एक दिवस आमच्या घरीं मंडळी जमून विचार ठरला व हें दोनतीन दिवस आधीं प्रसिद्धही झालें. तें कळल्यावर विरुद्ध पक्षांत बरीच चळवळ उडाली. या वेळीं विरुद्धपक्ष म्हणजे रामदीक्षित आपटे हे शास्त्र्यांपैकीं मुख्य असून त्यांच्याबरोबर इतर गांवगुंड पुष्कळ होते, व याच संधीचा फायदा घेऊन आजपर्यंत धर्म म्हणजे काय ह्याबद्दलचा नुसता विचारही ज्यांच्या मनाला शिवला नाहीं अशी कांहीं मंडळी या वेळीं विरुद्धपक्षांत मिळून दयानंदजीची व त्यांच्या पक्षाची मानहानि व विटंबना कोणत्या रीतीनें होईल, ह्याबद्दल खल करूं लागली. शेवटीं त्यांच्या बुद्धीप्रमाणें अशी एक शकुनीमामासारखी युक्ति सुचली, कीं, ती युक्ति एकदम सर्वांना पसंत होऊन ती दुसरे दिवशीं अमलांत आणावयाची, असा सर्वांचा निश्चय झाला. अशा

उत्तम रीतीनें दयानंदजींची फजिती करण्याची युक्ति सुचल्यानें या मंडळीच्या पोटांत हर्षानें गुदगुल्या होऊं लागल्या असाव्या. उद्यां उजाडतें केव्हां व आम्ही ही युक्ति अमलांत आणतों केव्हां असें त्यांना होऊन गेलें. इकडे दुसऱ्या पक्षाची मंडळी आमच्या घरीं जमून त्यांनीं दुसऱ्या दिवशींच्या मिरवणुकीचा कार्यक्रम ठरविला.

दुसरे दिवशीं सकाळीं सहा वाजण्याचे पूर्वींच बरोबर बँड व पांच पंचवीस गांवगुंड मंडळीच्या थाटासह उत्तम तऱ्हेनें शृंगारलेली गर्दभानंदाचार्यांची स्वारी काळ्या हौदाकडून शहरांत संचारास निघाली. जिकडे तिकडे हंशा व मजा सुरू झाली. सुमारें साडेसहा किंवा सात वाजतां ही बातमी आमच्या घरीं येऊन पोहोंचली. प्रत्यक्ष पाहून आलेल्या मंडळींनीं या समारंभाचें उत्तम रीतीनें वर्णन केलें. तें ऐकून या सर्व मंडळींनाही खूप हंसूं आलें. पण विरुद्धपक्षांत कांहीं विशेष चळवळ आहे, तेव्हां दयानंदांना धक्का न लागेल असा अधिक बंदोबस्त आपल्याला ठेविला पाहिजे असा विचार निघून पोलिसांची एक पार्टी मागवावी असें गंगारामभाऊ म्हसके यांनीं सुचविलें. या सूचनेला संमति मिळतांच त्यांनीं पोलीस सुपरिंटेंडंटांना पत्र लिहिलें. इकडे गर्दभानंदांची मिरवणूक जी सकाळीं सहापासून निघाली होती, ती संध्याकाळीं सहा वाजेपर्यंत आळोआळीला व रस्तोरस्त्याला चालली होती. मिरवणुकीच्या बरोबर असणारी मंडळी "श्रीरामानंदस्वामीकी जय!" असें मोठ्यानें म्हणून दर चारदोन पावलाला जयजयकार करीत होते. हा संचार ह्या गर्दभानंदांना कितपत मानला असेल कोण जाणे! दुसरे दिवशीं त्यांनीं आसन घातलें कीं, समाधींत बसून निजधामाला गेले, तें कळलें नाहीं!

अशा रीतीनें संध्याकाळीं चार वाजले, साडेचार झाले, सर्व मंडळी भिड्यांच्या वाड्यांत नित्याप्रमाणें व्याख्यानाला जमली. स्वामी दयानंदजी हे उत्तम रसाळ वक्ते होते. त्यांची वाणी गंभीर असे. तशीच भाषणपद्धति मोठी मार्मिक व केव्हां केव्हां अलंकारिक असे. त्यामुळें त्यांचें

भाषण ऐकण्यास जमलेली मंडळी तल्लीन होऊन जात. स्वामी दयानंदजी समारोपाचें व्याख्यान म्हणून बोलण्यास उभे राहिले व पंधरावीस मिनिटांतच इतके दिवस आपलें व्याख्यान सर्वांनीं मन लावून ऐकिल्याबद्दल आणि आपल्याशीं स्नेहभावानें वागल्याबद्दल त्यांनीं थोडेसें अलंकारिक व विनोदी भाषण करून जमलेल्या मंडळींचे आभार मानिले व त्यांचा निरोप घेतला. मग पानसुपारी, हार वगैरे स्वामींना अर्पण केल्यावर स्वामींसह सर्व मंडळी खालीं आली. रस्त्यामध्यें हत्ती, पालखी वगैरे व्यवस्था आधींच तयार ठेवली होती. त्या पालखीमध्यें ग्रंथ ठेवून हत्तीवर दयानंदजी यांना बसविलें व मिरवणूक चालू होणार, तोंच वर सांगितलेल्या दुसऱ्या पक्षाच्या मंडळींनीं या समारंभांत घुसून व गर्दी करून अद्वातद्वा बडबडण्यास व ओरडण्यास आरंभ केला. या पक्षाला प्रोत्साहन देणारी कुत्सित व कुटाळ मंडळी सभ्यपणाचें कातडें पांघरून थोड्या अंतरावर ठिकठिकाणीं उभी होती, व आपल्या पक्षाला दंगा करण्याबद्दल प्रोत्साहन देत होती. त्या दिवशीं बराच पाऊस पडला असल्यामुळें रस्त्यांत थोडा चिखल झाला होता. असल्या दंग्याला न जुमानतां किंवा कोणत्याही रीतीनें प्रतिकार करण्याचा प्रयत्न न करितां ही मिरवणूक धिमेपणानें चालू झाली, हें पाहून या गांवगुंड मंडळीला निराशेनें चीड आली. जागोजाग उभे राहिलेल्या प्रतिनिधींच्या चिथावणीची भर पडल्यामुळें ज्याच्या हातांत जें असेल तें त्यानें मिरवणुकींतील मंडळीकडे फेंकण्यास सुरुवात केली. ज्यांच्या हातांत कांहीं नव्हतें, त्यांनीं रस्त्यावर खालीं वांकून चिखलाचे गोळे करून तेच मंडळीच्या पाठीवर भरभरा मारण्यास सुरुवात केली. मिरवणुकींतील आमच्या पक्षाची मंडळी इतकी धिमेपणानें चालली होती, कीं, चिखलाचे गोळे पाठीवर व पायावर रपारप बसत असून कोणीं पाठीमागें वळूनही पाहिलें नाहीं. त्याची परवा न करतां मंडळी शांतपणें चालली होती. पोलीस पार्टी जी होती तिला अशी ताकीद दिली होती, कीं, आम्हीं सुचविल्याशिवाय तुम्हीं यांत पडूं नये; फक्त मिरवणुकीच्या बरोबर शोभेकरतां मात्र असावें. दहा पंधरा

मिनिटें चिखल फेंकून झाल्यावर आदितवारच्या चौकापासून दारूवाल्याच्या पुलापर्यंत मिरवणूक जाईपर्यंत या चिखल फेंकणाऱ्या मंडळींपैकीं कांहींनीं मधून काठ्या व दगड फेंकण्यास सुरुवात केली. त्यामुळें जरी कोणत्याही मुख्य मंडळींना इजा झाली नाहीं, तरी पांचसहा गरीब गरीब माणसांना मात्र चांगला मार लागला आणि जखमाही झाल्या. तें पाहून पोलीस मध्यें पडल्यावर ही गांवगुंड मंडळी फरारी झाली व मग ही मिरवणूक शांतपणें पुढें गेली. जखमी लोकांना औषधोपचाराकरितां इस्पितळांत पाठविलें. पुढें स्वतः घरीं आल्यावर पहिले कपडे सर्व चिखलाच्या गोळ्यांनीं जागोजाग भरलेले असल्यानें ते काढून टाकून दुसरे घातले. कपडे काढल्यावर जवळ असलेल्या घरांतील मंडळींनीं जेव्हां विचारलें, कीं, "बरोबर पोलीस शिपाई असून स्वतःच्या अंगावर चिखल कसा आला ? " तेव्हां हंसून म्हटलें, कीं " कां बरें ! सगळ्यांमध्यें मी जर होतों, तर मला कां लागणार नाहीं ? पक्षाभिमानाचीं कामें म्हणजे अशींच असतात. दुसऱ्या पक्षांतील माणूस लहान असो कीं मोठा असो, त्याची परवा त्यांना कां वाटावी ? अशा वेळीं मानापमानाचा विचार आमच्या मनांत तरी कां यावा ? या गोष्टी अशाच चालावयाच्या. "

## भाग पांचवा.

# नाशिकास बदली.

मागें सांगितल्याप्रमाणें आमची बदली नाशिकास झाली व आम्ही नाशिकास गेलों तेव्हां घरचीं आम्ही तिघें व ब्राह्मण, गडी व कोचमन इतकीं मनुष्यें गेलों होतों. नोकरांपैकीं किंवा आप्तांपैकीं बाईमाणूस कोणीच घेतलें नव्हतें. नाशिकास स्वयंपाकाच्या बाया पुष्कळ मिळतात, त्यांतली एकादी तेथल्या तेथेंच ठेवूं, असा विचार केला. तेथें गेल्यावर

पडतां, तों, बाई लवकर मिळेना. बाई शोधण्यांत महिना दीड महिना गेला. तोंपर्यंत संवय नसल्यामुळें संसारसंबंधीं प्रत्येक काम मला अवघड जाऊं लागलें व त्यामुळें माझ्या मनाचा अगदीं गोंधळ उडे, व सोईचें कामसुद्धां अशा धांदलींत बिघडून जाई. माझी ही स्थिति पाहूनच कीं काय, पदार्थ खारट तिखट कसेही झाले तरी स्वतः नांवें म्हणून ठेवावयाचीं नाहींत व रागवावयाचें नाहीं. स्वयंपाकाची संवय नसल्यामुळें, तो बिघडेल म्हणून भीतीनें जी माझी धांदल उडे त्यांत कधीं कधीं मीठच घालण्यास विसरावयाचें व कधीं कधीं तर विसरून दोन वेळां घालावयाचें, तरीसुद्धां कधीं स्वतः राग किंवा तिरस्कार करावयाचा नाहीं. कसेंही अडाणी माणूस असलें तरी त्याला वागवून घ्यावयाचें हें जसें कांहीं स्वतःचें व्रतच असे. स्वतः जेवण होऊन कोर्टांत गेल्यावर मी जेवायाला बसें, तेव्हां खारट किंवा अळणी जें काय झालें असेल त्याबद्दल मनांतल्या मनांत वाईट वाटे व संध्याकाळचा स्वयंपाक मी अगदीं लक्ष देऊन करीन, विसरणार नाहीं, असा निश्चय करीं. त्याप्रमाणें खरोखरीच बरा स्वैंपाक झाला असला तर मात्र स्वतः विनोदानें म्हणावयाचें, कीं, "कारे आबा, आतां भाजी खातोस, आणि दुपारीं दोन पदार्थ जास्त असूनसुद्धां कां बरें खाल्ले नाहींस ? त्यांत कांहीं बिघडलें होतें कीं काय ?"

त्यावर ते हंसून म्हणत " दुपारीं भाजी काय ? त्यांतली एक तर आळणीच होती. भजीं खारट खारट, एक आमटी व भाजी मात्र बरी होती, तेवढी खाल्ली !"

तेव्हां म्हणावयाचें, कीं " विद्यार्थ्यांचें लक्ष खारट, तिखट, आळणी ह्यांकडे असूं नये; जें काय मिळेल तें मुकाट्यानें खाऊन जावें; मी बघ कधीं काय नांवें ठेवितों कीं काय ? मुकाट्यानें जें काय मिळेल तें खाऊन जातों."

अशा एखाद्या वेळीं मी धीर करून म्हणे, कीं, "मला वेळेलाच कळलें तर आळणी पदार्थांत मीठ तरी घालतां येतें पण मी जेवावयास बसतें तेव्हां काय तें कळतें व भारी लाज वाटते."

तेव्हां म्हणावयाचें,कीं,"त्याला काय उपाय आहे! असल्या गोष्टी सांगत बसण्यापेक्षां ज्याच्या त्यालाच अनुभवानें समजलेल्या बऱ्या; मनुष्य सावध राहून जास्त लक्ष ठेवितें. आज मीं तुझ्याकरितां एक सूपशास्त्राचें पुस्तक आणविलें आहे. तें सर्व वाचून पहा व त्यांत लिहिलेल्या कृतीप्रमाणें रोज एक एक पदार्थ करून पहा म्हणजे झालें. त्याला लागणारे पदार्थ नीट मोजून घेऊन स्वस्थ मनानें करावें. जिन्नस करावयाचा साधला तर बरेंच,नाहीं तर करमणूक होईल. मनुष्यानें पूर्ण लक्ष दिलें तर सर्व कांहीं होईल."

याप्रमाणें पुस्तक हातीं आल्यावर पहिल्या पहिल्यानें दररोज एक पदार्थ करून पाहीं. कांहीं पदार्थ साधत व कांहीं चारदोन वेळ करूनही साधत नसत. असें बरेच दिवस झाल्यावर तो नाद कमी झाला, स्वयंपाकालाही बाई चांगली मिळाली, जेवणाची व्यवस्था बरी झाली, व आतां माझ्या अभ्यासाकडे जास्त वेळ मिळूं लागला. ह्यावेळीं हावर्डचें पहिलें पुस्तक संपून दुसरें घेतलें होतें. आतां स्वतःस रोज दोन दोन अडीच तास माझें वाचन घेण्यास, शब्द व स्पेलिंग विचारण्यास व नवीन धडा देण्यास वेळ मिळत असे; सकाळीं तास दीडतास अभ्यास झाल्यावर व संध्याकाळीं बाहेरून फिरून आल्यावर एक तास जेवण्याच्या पूर्वीं मराठी वर्तमानपत्रांचें वाचन घेऊन मग जेवणास उठावयाचें, व जेवण झाल्यावर दहा साडेदहा वाजेपर्यंत पुण्याहून दक्षिणाप्राइज कमिटीचीं पुस्तकें आलीं असतील त्यांचें वाचन माझ्याकडून घ्यावयाचें असा पाठ ठेविला होता. पुनः पहांटेचे चार साडेचार वाजतां स्वतःची झोंप होई. तेव्हां केका, आर्या, श्लोक, एखादे वेळेस नवनीत किंवा प्रार्थनासंगीत यांतील जें काय म्हणावयास सांगणें होईल तें वाचून दाखवावयाचें. एखादे दिवशीं स्वतःच आपण संस्कृत श्लोक किंवा स्तोत्रें म्हणावयास आरंभ करावयाचा व त्यांतला अर्थ सांगावयाचा व श्लोक पाठ करावयास द्यावयाचे. पुनः केव्हां केव्हां पाठ करावयास दिलेले श्लोक म्हणून घ्यावयाचे, व पूर्वीं सांगितलेले अर्थ कितपत लक्षांत आहेत तें पहावयाचें यप्रमाणें उजाडेपर्यंत चाले. तेथपासून दहा

वाजेपर्यंत साहित्य, भाजीपाला, चटणी, कोशिंबिरी, व ताक वगैरे केल्यावर पहिलें वाढप वाढून घेऊन बरोबरच बोलत चालत जेवित असूं. मागलें वाढप बाई वाढी. जेवण झाल्यावर स्वतःचें कचेरींत जाणें झालें म्हणजे मी कोर्टांत पाठविण्याचें फराळाचें करीं. रोज वेगळे चारपांच पदार्थ करावे लागत. तोंपर्यंत दोन तास त्यांत सहज जात. पावणेदोन वाजतां फराळाचा डबा भरून ब्राह्मणाबरोबर कोर्टांत पाठविल्यावर मी आपल्या अभ्यासाला बसें. साडेचार वाजेपर्यंत संध्याकाळीं वाचून दाखविण्याकरितां धडा तयार करीं व शब्दही अगदीं तोंडपाठ करून ठेवीं: कारण, प्रथम शब्दाचें स्पेलिंग व अर्थ चांगले पाठ झाले आहेत, असें पाहून मग धडा वाचून घ्यावयाचा असे; नाहीं तर राग येई. तो राग म्हणजे इतर लोकांसारखा ओरडणें आरडणें, अगर तोंडांतून दुरुत्तर काढणें अशा तऱ्हेचा नसून उलट मुग्ध व उदासीन बसावयाचें. फार तर एखादा सुस्कारा टाकावयाचा. ही स्थिति फार वेळ राही. एखादें भडभडें माणूस रागावलें तर रागाच्या भरांत आरडून ओरडून दोन शिव्या देऊन मोकळेंच. चारदोन मिनिटांत पुनः हंसण्या-बोलण्याची तयारी. जसा काय राग आलाच नव्हता. पण स्वतःचें तसें नव्हतें. बारीकसारीक क्षुल्लक गोष्टींकरितां कधीं राग यावयाचाच नाहीं, व अशा एखाद्या गोष्टीकरितां आला तर तो किती तरी वेळ टिके. त्यामुळें मला फार भय वाटे व वाईट वाटून चैन पडत नसे, म्हणून होतां होईतों तसा प्रसंग न येऊं देण्याविषयीं मी फार जपें.

याप्रमाणें इंग्रजी दुसरें बुक संपून त्याचा सेकंड पार्ट संपल्यावर इसापनीति व तिच्याबरोबर भाषा सुलभ, व वाक्यें लहान लहान, म्हणून बायबलचें न्यू टेस्टॅमेंट वाचावयास घेतलें. माझी घरांतील कामाची व अभ्यासाची व्यवस्था नीट चालू झाल्यावर मला सांगितलें, कीं, "आतां दररोज होणारा कच्चा खर्च तूं आपल्या हातानें करून मांडून ठेवीत जा."

नाशिकास आल्यापासून हा वेळ दोन महिने, आमच्याबरोबर आलेला विनायक ब्राह्मण ह्याच्याकडे कच्चा खर्च रोजचा करणें व लिहून ठेवणें हें

काम सोंपविलें होतें व तो त्याप्रमाणें नीट करीत असे. जमेची मोठी रक्कम माझ्याजवळच असे; पण जवळ विचारून खर्चाकरितां वेळोवेळीं लागणारी रक्कम त्यांतून दिली जाई. आतां खर्च मीं माझ्या हातांत घेतल्यावर झालेला खर्च रोजच्या रोज लिहून ठेवीत असें. पण नेहमीं बेरीज किंवा वजाबाकी चुकल्यानें शिलकेचा मेळ मिळावयाचा नाहीं व तो मिळण्यासाठीं तासचे तास मी त्यांत घालवीं. असें झालें म्हणजे त्या दिवसाचा नेमून दिलेला अभ्यास अर्थातच व्हावा तसा होत नसे. त्यामुळें ह्या सर्व गोष्टींचा बोभाटा होई. पांचसहा वेळ असें झाल्यावर स्वतः एके दिवशीं असा नियम केला कीं, दररोज जमाखर्चाची वही पाहून मग निजावयाचें. त्याप्रमाणें पांच-सहा दिवस झाल्यावर एके दिवशीं माझी चूक कोठें होते ती लक्षांत आल्या-बरोबर माझी समजूत पडेल असें नीट दाखवून पुन्हां अशी चूक न कर-ण्याबद्दल बजावून सांगितलें. आणखी एकदोन वेळ चांचणी घेतल्यावर मग दररोज कीर्दवही पाहणें सोडून महिना अखेर एकदां पाहण्याची पद्धत ठेविली. आमच्या घरांत जेवणारीं आठ माणसें होतीं; तेव्हां दरमहा भोजन-खर्च काय होतो त्याचा अदमास मागील दोन महिन्यांच्या बोटखतावरून ठरविला, व एका पहिल्या तारखेला मला सांगितलें, कीं, "तूं या महिन्या-ला नुसत्या भोजनखर्चाकरितां शंभर रुपये घे व एक महिनाभर पुरीव."

मला अजमास नव्हता, त्यामुळें वाटलें, कीं, शंभर रुपये एवढी मोठी रक्कम फक्त भोजनखर्चाकडे संपेल कीं काय? तेव्हां सांगितलें, कीं, "बरें झालें. याहून कमी रक्कम लागली तर जी काय उरेल ती आम्ही परत घेणार नाहीं; तुझ्या शिवणकामाकडे बक्षीस देऊं!"

हें ऐकून मला मनामध्यें फार आनंद वाटला. मग मीं पुनः म्हटलें "यांत नोकरांचा पगार, वर्गण्या वगैरे यावयाच्या नाहींतना?"

तेव्हां सांगितलें, कीं, "जेवणाच्या खर्चाशिवाय दुसरा खर्च यावयाचा नाहीं. त्याबद्दल तूं दुसरी रक्कम काढून घे. मात्र आम्हांला आतांसारखे जेवणाचे व फराळाचे पदार्थ सर्व नीट मिळाले पाहिजेत, त्यांत कमी होतां

कामा नये; पण कोणतेही जिन्नस आणावयाचे ते रोखीनें आणावेत, उधार ठेवावयाचे नाहींत."

इतकें बजाविलें तरी मला कांहींच वाटलें नाहीं. उलट रक्कम इतकी कशी संपेल असेंच वाटलें. त्या महिन्याच्या वीस तारखा बिनबोभाट गेल्या पण पुढें २१ वे तारखेपासून अगदीं बेतापुर्ता पगार असणाऱ्या कुटुंबांची महिना अखेर जशी ओढाताण होते व त्यामुळें धांदल उडते, तशीच माझी अवस्था झाली. पंचवीस तारखेपर्यंत मीं वेगळी काढून घेतलेली पुंजी बहुतेक झिरपून गेल्यानें मला अगदीं विरमल्यासारखें होऊन इतकी काळजी वाटूं लागली, कीं, ती झांकून ठेवतां येईना. नुसती काळजी करून रोजचा लागणारा खर्च थोडाच थांबणार आहे ! तो तर चाललाच पाहिजे, व जास्त रकमेची परवानगी घेतल्यावांचून चालावयाचें नाहीं, व तसें विचारणें तर जिवावर आलें. त्यामुळें मी अधिक काळजींत पडलें.

असे एकदोन दिवस गेल्यावर मला विचारलें "आतांशा तूं अशी उत्साहरहित व हिरमुसल्यासारखी कां असतेस? तुला कांहीं होत आहे कीं काय?"

हें ऐकून मी जास्तच विरमलें; कारण, ही गोष्ट लक्षांत येऊं नये म्हणून मी फार जपत असें. खालीं मान घालून मीं म्हटलें "छे, मला कांहीं होत नाहीं."

पुढें खर्चाचें संपलें आहे, आणखी थोडें काढून घेऊं का, असें विचारण्याचें तितक्यांतलें तितक्यांत एक हजार वेळ मनांत आलें; पण माझा मानी स्वभाव तें करूं देईना. असा मनाचा जास्त गोंधळ झाल्यानें मला एकदम रडूं आलें, तें आंवरेना. माझी स्थिति आधींच लक्षांत आली असावी, म्हणून आतां माझ्या बोलण्याची वाट न पाहतां पुष्कळ समजूत केली, व "खर्चाचें संपलें आहे," इतके अर्धवट शब्द माझ्या तोंडांतून निघतात तोंच म्हटलें, "तूं लागेल तें खर्चास काढून घे. त्यांत इतकें वाईट वाटण्याचें कारण काय ? सगळे पैसे तुझ्यापाशीं आहेतना ? मग इतकी काळजी कशाला पाहिजे ? काय कमी असेल तें मोकळ्या मनानें सांगावें, असें आंतल्या आंत कुढत राहूं नये. थोड्या खर्चांतच केलें पाहिजे इतकी आपली

स्थिति नाहीं, व काळजी करण्याचेंही कारण नाहीं. पण काटकसर व टापटीप शिकल्यानें मनुष्याचें धोरण व चौकसपणा वाढतो व घरांतील सर्व गोष्टी व्यवस्थेनें चालतात, हेंच तुला शिकविण्याचा उद्देश आहे. या माझ्या उद्देशाकडे थोडें लक्ष पुरविलें असतेंस तर सांगितलेल्या मक्त्याचा असा भार वाटून घेण्यासारखी काळजी करावी लागली नसती. आतां लागतील तितके पैसे तूं काढून घेत जा, पण खर्च मात्र वेळेवर नीट टिपून ठेव, " असें सांगून या महिन्यांत जितका खर्च झाला तितकी रक्कम खर्चाकरितां काढून घेण्याची आज्ञा केली.

ह्या वेळेस पगार ८०० रुपये मिळत असे. पगाराची सर्व रक्कम व घरांतील सर्व शिल्लक माझ्याजवळच असे. कारण, स्वतः एक पैसाहि जवळ बाळगावयाचा नाहीं, असा नियम होता. किल्ली तर मला वाटतें कसल्याही कुलपाची व कोणत्याही प्रसंगीं हातीं धरली नाहीं, मग जानव्याला लावणें कसचें ? पण सर्व रक्कम मजपाशीं होती, तरी महिन्याच्या खर्चाकरितां नेमून दिलेल्या रकमेशिवाय स्वतःची परवानगी घेतल्यावांचून मी पांच रुपयांपेक्षां जास्त खर्च करीत नसें. जास्त करावयाचा झाल्यास जवळ विचारलें तर लागलेंच होय म्हणावयाचें, कधीं नाहीं म्हटलें नाहीं; पण विचारल्याशिवाय अधिक खर्च केला तर खपत नसे, अशी पद्धत होती; आणि त्याप्रमाणें चालण्यांत मीं कधींही हेळसांड किंवा कसूर केली नाहीं. त्यामुळें आम्हां उभयतांस राग किंवा असंतोष उत्पन्न होण्याचा प्रसंग येत नसे.

आमच्या पूर्वींचे सबजज्ज रा० ब० विष्णु मोरेश्वर भिडे यांनीं आपली नाशिक येथील बाग विकावयास काढली. ती बाग आम्हीं विकत घेतली. ही एक आमच्या कामांत व करमणुकींत भरच पडली. रोज सकाळसंध्याकाळ बागेंत जाऊन गडीमाणसांस कामें नेमून द्यावयाचीं, व त्यांनीं केलेल्या कामांची चौकशी करावयाची, असा नेम ठेविला होता. सकाळीं मी एकटीच बागेंत पायीं जात असें. पण स्वतःसंध्याकाळीं कोर्टांतून घरीं आल्यावर आम्हीं दोघें व भाऊजी टांग्यांतून बागेकडे फिरावयास जात असूं. तेथें तास दोन

तास मोकळया हवेवर हिंडून फिरून आनंदानें गोष्टी बोलून व सकाळपासून गडीमाणसांनीं काय काय कामें केलीं त्याची विचारपूस स्वतः करून मग परत यावयाचें. घरीं आल्यावर मागें सांगितल्याप्रमाणें माझा इंग्रजी धडा वाचून घेऊन नव्या धड्याचे शब्द सांगण्यांत एक तास तेव्हांच निघून जाई. मग जेवण झाल्यावर सुमारें दहा साडेदहा वाजेपावेतों मराठी वाचन माझ्या-कडून वाचून घेतल्यावर आम्हीं झोपीं जावयाचें. पुढें पहांटेस चार वाजतां उठल्यावर, सकाळच्या वेळेला मी एकटीच शिपाई बरोबर घेऊन बागेंत जात असें, म्हणून एक तास वाचन घेऊन पांच वाजले म्हणजे "तुझी बागेंत जाण्याची वेळ झाली, तूं जा," असें सांगणें होई. मग मी आमच्या तैनातीस असलेल्या म्हाताऱ्या नायकाला बरोबर घेऊन जाई. नंतर स्वतः भाऊजींना उठवून त्यांचा अभ्यास घ्यावयाचा, व सहा वाजतां त्यांना खर्डे लिहावयास बसवून स्वतः आपल्या नित्यक्रमाला आरंभ करावयाचा. मी बागेंत जातांना जो सखाराम नांवाचा नाईक बरोबर घेत असें. त्याला वारकरी पंथांतल्या साधुसंतांच्या पुष्कळ गोष्टी माहीत असत, व अभंगही पुष्कळ पाठ असत. पहिल्या पहिल्यानें वाटेनें चालतांना तो आपल्याशींच गुणगुणत असे. मीं बोलविल्यावांचून आपण होऊन तो कधीं बोलत नसे. मी विचारीं तेवढ्याचें उत्तर देई; पण तोंडानें कांहीं तरी हळू हळू म्हणत असे. याला कांहीं अभंग पाठ येत असावेत, पण मर्यादेमुळें तो मोठ्यानें म्हणत नाहीं, असें माझ्या मनांत येऊन मीं त्याला म्हटलें "सखाराम, तुझा अभंग म्हणण्याचा नित्य पाठ असेल तर तूं मोठ्यानें म्हणत जा. मला ऐकूं येईल असें म्हटलेंस तरी चालेल. मला अभंग आवडतात."

यावर तो नम्रपणानें रामराम करून म्हणाला "बरें आहे बाईसाहेब. पुष्कळांना यांत बेअदबी वाटते व आम्हां म्हाताऱ्यांची बडबड आवडत नाहीं, म्हणून मी भीत होतों."

याप्रमाणें बागेंत जातवेळीं पहांट असल्यामुळें करमणुकीची गरज वाटे तेव्हां तो एखादा अभंग म्हणे, व आपल्या समजुतीप्रमाणें त्याचा अर्थही

सांगे. मी नुसतें हूं हूं मात्र म्हणें. पण मला त्याचें हंसूं येई. कारण, या लोकांबद्दल अशा कांहीं नकला आहेत, त्यांत मूळ अर्थाला अगदीं विपर्यास आणणारीं वाक्यें अगर कडवीं जशीं त्यांच्या पाठांत असतील तशींच तीं अक्षरशः घेऊन त्यांचेंच निरूपण करण्याचा ते प्रयत्न करतात. जसें ' हिरण्यकश्यपूच्या पोटीं प्रल्हाद बाळ जन्मलें, ' या पाठाच्या ठिकाणीं ' हरिण कासवाचे पोटीं परळांत बाळ जन्मलें, ' असें म्हणतात, व त्याचें निरूपणही असें करतात, कीं, 'देवाचे अवतार आपण दहाच ऐकले आहेत; पण भक्तांकरितां देवाला अनेक अवतार घ्यावे लागतात. याला प्रमाण हेंच, कीं, देवाला हरिणाच्या, कासवाच्या पोटीं जन्म घेऊन शेवटीं परळांतही जन्म घ्यावा लागला ! यावरूनच पहा, कीं, भक्तवत्सल देवाला किती बरें अवतार घ्यावे लागतात ? ' वगैरे-मोठ्या भाविकपणें सांगतात. हा अर्थ किंवा हें वाक्य येथें जुळत नाहीं, ही कल्पना त्यांना शिवतसुद्धां नाहीं, व दुसऱ्या कोणीं अशी शंका काढली, तर ती त्यांना सहन होत नाहीं. यांत त्यांचा दोष नसून त्यांच्या अंधपरंपराभक्तीचा जोर आहे, व ही मंडळी या परंपरेला भोळ्या व भाविकपणानें चिकटून राहतात, जास्त विचार करीत नाहींत, इतकेंच. त्यांपैकींच कांहीं कांहीं गोष्टी आमच्या या नायकाच्या असत. केव्हां केव्हां तो एखाद्या भगवद्भक्ताच्या गोष्टी सांगतांना अगदीं गहिंवरून येई; पण त्याचा अर्थ सांगतांना वर सांगितल्याप्रमाणें कांहीं तरी अर्थविपर्यास करी. तरीही त्याची गोष्ट मी लक्ष लावून ऐकें. कारण, त्याच्यासारख्या भाविक म्हाताऱ्याला दुखविणें मला बरें वाटत नसे. मी घरीं आल्यावर जेवतांना जवळ सांगें, तेव्हां खूप हंसूं येई.

याप्रमाणें रोज सकाळीं बागेंत चालत गेल्यानें मला व्यायामच्या व्यायाम होऊन ताज्या भाज्या व फुलें मिळत असत. थंडीच्या दिवसांत दररोज चारपांचशें गुलाबाचीं फुलें निघत, आणि वांगीं व दुधे दोनतीन पाट्या निघत. त्यांतील घरखर्चापुरत्या भाज्या, तशीच, गुलाबांत घातलेली सुपारी फार आवडे व ती रोज करावी लागे म्हणून सुपारी तयार करण्यापुरतीं

फुलें ठेवून घेऊन बाकीचा माल गड्यांबरोबर विकावयास पाठवून जे काय पैसे येतील ते त्याच तारखेस बागेच्या खात्यावर जमा करीं. आठचार दिवशीं सर्वच माल घरीं ठेवून घेऊन मित्रांच्या व ओळखीच्या ठिकाणीं थोड्या भाज्या व फुलें पाठवून द्यावीं, असें स्वतःचें म्हणणें असे, त्याप्रमाणें मी करीं. याच सालीं नाशिक येथें प्रार्थनासमाजाची स्थापना स्वतः, देशमुख, केतकर, वाड वगैरे मित्रमंडळींच्या साहाय्यानें केली. रा. ब. गोपाळराव हरि देशमुख हे तेथें जाईंट जज्ज होते. त्यांच्या सहा सुना व दोन लेकी त्या वेळाच्या मानानें बऱ्याच शिकलेल्या होत्या. त्यांचें कुटुंब जुन्या चालीचें होतें, तरी त्यांना उत्तम लिहितां वाचतां येत होतें. पुराण ऐकण्याचा व स्वतः वाचण्याचा त्यांना नाद असे. ह्या बहुतेक सर्व व्रतेंवैकल्यें व नियम-धर्म करीत, त्या निमित्तानें वारंवार गांवांतील बायकांना हळदीकुंकवाला बोलावीत. त्यामुळें माझेंही त्यांच्या घरीं जाणेंयेणें होऊं लागलें म्हणून माझा परिचय जास्त झाला. रा. ब. देशमुख व स्वतः असे दोघेही स्त्री-शिक्षणाचे अभिमानी असल्यामुळें, आपल्या बायकांनीं हळदीकुंकवाच्या निमित्तानें कां होईना, पण गांवांतील बायकांना वारंवार एके ठिकाणीं जमवून सीता, सावित्री यांच्यासारख्या प्राचीन साध्वींचीं चरित्रें त्यांना वाचून दाखवावीं व शिक्षणाकडे त्यांचें मन वळवावें; तसेंच गांवांतील मुलींच्या शाळा पहाव्यात, त्यांना उत्तेजन येण्याकरितां कांहीं अल्पस्वल्प बक्षिसें द्यावींत, वगैरे गोष्टी आवडत असत व त्याबद्दल आमच्या मागें तगादा असे.

ह्या गोष्टीस फार दिवस लोटले नाहींत तोंच तसा एक प्रसंग जुळून आला. मि० कागलन्साहेब ठाण्याचे सेशन जज्ज नाशिकास सेशन चालविण्यासाठीं आले. त्यांचा मुक्काम तेथें सुमारें आठदहा दिवस होता. त्यांच्या-बरोबर त्यांची अल्पवयस्क मेहुणी व पत्नी ह्या होत्या. दोघीही लहान वयाच्या असून मोकळ्या मनाच्या होत्या. हिंदुबायकांची व आपली ओळख व्हावी अशी त्यांना आवड असल्यामुळें त्या दोघी दुसरे दिवशीं आपण होऊन

कडे परत भेटीकरितां गेलों. देशमुखांच्या दोघी लेकीं, मी, मिसेस कागलन् तिची बहीण अशा आम्ही सारख्या वयाच्या असल्यानें वरील दोन भेटींतच आमचा व त्यांचा बराच परिचय झाला. सकाळीं संध्याकाळीं कधीं आमच्या बागेकडे, कधीं सुन्दरनारायणाच्या घाटाकडे, कधीं मुठे यांच्या बागेकडे; अशा रीतीनें आम्ही फिरावयास जात असूं. याच सुमारास कोणी गडबोले नांवाचे डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर तेथें शाळेच्या तपासणीस आले होते. या वेळीं नाशिकास द्वारकानाथ राघोबा तरखडकर हे तेथील हायस्कूलचे हेडमास्तर होते. ह्यांची पत्नी सौ० लक्ष्मीबाई ह्या माझ्यापेक्षां वयानें पुष्कळ मोठ्या होत्या. तरी बरोबरीच्या मैत्रिणीसारख्या हंसूनखेळून मोकळ्या मनानें वागत. लोंकरीचें व साधें शिवणकाम हें त्यांनींच मला शिकविलें. ह्या वेळीं माझी धाकटी चुलत नणंद सखूबाई ठोसर या मुंबईहून नाशिकास माहेरपणाकरितां आल्या होत्या. त्या, नात्यानें नणंद होत्या, पण वागणुकींत सख्या बहिणीसारख्या खऱ्या प्रेमानें वागत, त्यामुळें आम्ही दोघी नणंदा-भावजया व सौ० लक्ष्मीबाई अशा तिघींचें बहिणीबहिणीप्रमाणें प्रेम जमलें. त्यामुळें दररोज एक वेळ एकमेकींनीं भेटल्यावांचून मनाला चैन पडत नसे. त्यांनीं तरी आम्हाकडे यावें, किंवा आम्हीं त्यांच्याकडेस जावें, असा क्रम असे. आम्हांला त्यांच्याकडून सहज बोलण्यांत पुष्कळ गोष्टींची माहिती मिळे. मिसेस कागलन् तेथें आल्यापासून त्याही आमच्याबरोबर असत.

वर सांगितल्याप्रमाणें डेप्युटी इन्स्पेक्टर यांची सर्व शाळांची तपासणी संपल्यावर मुलींच्या शाळेचा बक्षिसमारंभ या वेळीं अनायासानें मिसेस कागलन् या येथें आल्या आहेत तेव्हां त्यांच्याच हातून व्हावा, असा विचार करून ते व रावसाहेब देशमुख हे स्वतःचा याबद्दल विचार घेऊन दिवस ठरविण्यासाठीं आमच्या घरीं आले. त्यांनीं दिवस वगैरे ठरविला. या समारंभास बायका जितक्या जास्त जमतील तितकी शोभा जास्त येणार आहे, तेव्हां काय केलें असतां त्या जमतील, याबद्दल विचार चालून असें ठरलें कीं, कांहीं जुन्या घराण्यांतील व जहागिरदार वगैरेंच्या बायका नुस-

त्या आमंत्रणचिठ्ठीवर खास येणार नाहींत; त्यांना बायकांनीं जाऊन आमंत्रणें केलीं पाहिजेत, म्हणजे त्या येतील. "हें काम आपल्या दोन्ही घरच्या बायका मंडळींनीं पतकरलें म्हणजे गांवांतील वकीलमंडळींच्या व इतर कामगारांच्या बायका येण्याची तजवीज मी करतों," असें डेप्युटी यांनीं सांगितलें, आणि ते निघून गेले. देशमुखांच्या दोघी मुली व मी अशा तिघी जणींनीं यादीवर लिहिलेल्या घरीं जाऊन आमंत्रणें करावींत. असें ठरल्यावर देखमुखही निघून गेले. ठरल्याप्रमाणें एकदोन दिवसांनीं मीं व देशमुखांच्या मुलींनीं घरोघर जाऊन आमंत्रणें केलीं. त्याप्रमाणें समारंभाच्या दिवशीं सुमारें पन्नाससाठ बायका जमल्या. हीच संख्या आम्हांला त्या वेळीं फार मोठी अशी वाटली. कारण बायकापुरुषांनीं नाशिकास एकत्र जमण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. गांवांतील इतर पुरुषमंडळींना आमंत्रणें केलीं नव्हतीं; पण त्यांतल्या त्यांत स्त्रीशिक्षणाचे चहाते व पुढारी असे दहाबारा गृहस्थ मात्र होते.

कार्यक्रम ठरल्याप्रमाणें सर्व मंडळी जमल्यावर मुलींनीं ईशस्तवनपर व स्वागतपर पद्यें म्हटलीं. डेप्युटींनीं मागील सालचा रिपोर्ट वाचून दाखविला मग मिसेस कागलन् यांच्या हातून बक्षिसें वांटून झाल्यावर मिसेस कागलन् यांचे आभार मानावे, व जमलेल्या बायकांना उत्तेजनपर आणि उपदेशपर अशा तऱ्हेचा थोडासा मजकूर स्वतः मला वाचावयास सांगितलें. त्याप्रमाणें मी तो कागद् वाचून दाखवून मिसेस कागलन् व जमलेल्या बायकांचे आभार मानून खालीं बसलें. तोंच डेप्युटी यांनीं हारतुऱ्यांचें तबक माझ्यापुढें आणून ठेविलें. मी त्यांतील एक हार मिसेस कागलन्बाईंना पहिल्यानें घालून मागाहून त्यांच्या आईला व बहिणीला घालून एक हार तसाच तबकांतून वगळून तबक डेप्युटीपुढें सारिलें. "हा हार साहेबांना घालावयाचा," असें डेप्युटी यांनीं मला अगदीं हळूच सुचविलें. मीं लागलेंच साफ नाकारलें, व मला त्यांचा राग आला. रावसाहेब देशमुख हे माझ्याकडेस पहात होते. ते आपल्याशींच हंसले व एकदम उठून त्यांनीं

डेप्युटीच्या हातांतील तबकांतून हार उचलून घेऊन कागलन्साहेबांच्या गळयांत घातला, व तुरा, अत्तर वगैरे दिलें. इकडे देशमुखांच्या दोघी मुली व सुना यांनीं जमलेल्या सर्व बायकांना हळदीकुंकु, विडे, गजरे, अत्तरगुलाब वगैरे दिल्यावर समारंभ आटपला व आम्ही आपापल्या घरीं निघून आलों.

रात्रीं निजते वेळीं मुद्दाम विनोदानें विचारलें "झाली का तुमची सभा नीटपणीं? पण बायकांना इतका पक्षपात कशाला हवा? सभेची खटपट सगळी पुरुषांनींच केली. बायका आयत्या आल्या. त्या तिघींना मात्र तूं हार घातलेस, पण बिचाऱ्या कागलन्साहेबांनाच कां वगळलेंस?"

मीं म्हटलें "मी हिंदु नसतें तर मलाही याचें कांहीं वाटलें नसतें. डेप्युटी हे हिंदु व पोक्त असून त्यांनीं हार घालण्याचें मला सुचविलें, याचाच मला चमत्कार वाटला व रागही आला."

"पण तुझी बाजू देशमुखांनीं संभाळलीना?"

"त्यांची गोष्ट कशाला? त्यांचा थोरपणा कोणीकडे! ते असे कुत्सित परीक्षक नव्हत!"

यावर म्हटलें, कीं, "डेप्युटीवर तूं उगीच रागावली आहेस. त्यांचाही त्यांत कांहीं कुत्सित हेतु नसेल. त्यांनीं सहज सुचविलें असेल. कित्येक वेळां या गोष्टी पहिल्यानें लक्षांत येत नाहींत, बाकी, व्यवहार कमी खरा."

दुसरे दिवशीं लक्ष्मीबाई बसावयास आल्या. त्या म्हणाल्या "कालची आपली सभा चांगली झाली. पण डेप्युटीचा कावेबाजपणा तुमच्या चट्दिशीं ध्यानांत आला म्हणून मला बरें वाटलें. मलाही मोठी काळजीच पडली होती."

यापुढें आम्हां तिघी मैत्रिणींची फाटाफूट झाली. सौ. सखूबन्सं सासरीं गेल्या. आमची बदली अवचित धुळयास झाली व सौ. लक्ष्मीबाई नाशकास राहिल्या. त्यांची व आमची पुनः भेट झाली नाहीं! कारण, पुढें त्या एक वर्षानें वारल्या.

---

## भाग सहावा.

# धुळें, सन १८७९-८०

सन १८७९ च्या मे महिन्यांत सुट्टीनिमित्त आम्ही नाशिकाहून पुण्यास आलों. या वेळेस मे महिन्याची सुट्टी म्हणजे सर्व ग्रॅज्युएट मंडळींना तो दिवाळीपेक्षां सणाचा व उत्साहाचा महिना आहे, असें वाटे. कारण, त्या वेळच्या जुन्या व नव्या मंडळीमध्यें परस्परांबद्दल प्रेम व आदरबुद्धि जास्त वसत असे. त्यांनीं आपलें धुरीणत्व पूर्ण विश्वासानें एकाच हातीं दिलें होतें. त्या खंबीर व सामर्थ्यवान् हातानें, आपणावरील भार व जबाबदारी पूर्ण ओळखून पुण्याची जीर्ण झालेली जुनी नौका कित्येक वर्षें सुयंत्रितपणें चालविली. जशा मुली पुष्कळ दिवसांनीं दुरून माहेरीं बहिणी-भावजयांत आल्या म्हणजे असतील तितके दिवस अतिशय आनंदांत घालवून एकमेकींशीं प्रेमानें पण आदरानें वागतात, व ह्याबद्दल वडील माणसें त्यांचें कौतुक करून लाड पुरवितात, आणि अशा रीतीनें परस्परांना एकमेकींच्या भेटीचा व सहवासाचा मोठा लाभ वाटत असतो, त्यासारखीच पुण्याची स्थिति जवळजवळ सुमारें पंधरा वर्षें सतत होती, म्हणण्यास हरकत नाहीं. मे महिन्याची सुट्टी म्हणजे **स्वतः**ला व ह्या सर्व मंडळींना अपूर्व संधि वाटे. वसंतऋतूच्या आरंभीं जुन्या व नव्या सर्व लतावृक्षांना पालवी फुटते, व नवे अंकूर येतात, त्याप्रमाणें ह्या वसंतऋतूमध्यें मंडळींना नवे सुचलेले विचार एकत्र करून सुव्यवस्थितपणानें जोडून व गुंतवून उत्तम उपयुक्त कामाकडे लावावयाचें कुशल माळ्याचें काम **स्वतः**कडे असे. **स्वतः**कडून तें काम सर्व मंडळींच्या इच्छेनुरूप होई. असो.

वर्षांतील १२ महिन्यांमध्यें हे दोन महिने **स्वतः**ला अविश्रांत काम करावें लागे. सबंध रात्रींत कधीं कधीं तर दोन तासही झोंप नाहीं, अशा कित्येक रात्री जात; तरी ह्याबद्दल कंटाळा नसे. हें काम म्हणजे कोणीं

दिलेली वेठ किंवा ओझें वाटत नसून, उलट अत्यंत आवडीचें काम असें वाटे. त्यामुळें शीण येत नसे व विश्रांतीची गरज वाटत नसे. अशा वेळीं पुण्यास वसंतव्याख्यानमाला व वक्तृत्वोत्तेजक सभा सुरू असत व अशाच दुसऱ्या नैमित्तिक सभा व कमेट्या कांहींना कांहीं रोज उत्पन्न व्हावयाच्याच. हें सर्व संभाळून शिवाय सकाळसंध्याकाळ जुन्या व नव्या मित्रमंडळींची बैठक आमच्याच घरीं असे. ही मंडळी एकदां बसून भवति न भवति सुरू झाली म्हणजे जेवणास वेळेवर उठणें कधींही व्हावयाचें नाहीं! दिवसा बारा किंवा एकही वाजे व रात्रींचे साडे दहा, अकरापर्यंतसुद्धा. जेवणास बसावयास उशीर होई. पुढें झोंपेचेंही असेंच. जेवण झाल्यावर घरांतील वडील मंडळींशीं व आश्रित मंडळींशीं बारा वाजेपर्यंत बोलणें-चालणें होऊन मग निजावयास जाणें होई. दिवस विशेष विचारांत गेला नसला तर झोंप लवकर लागून ती चांगली येई; पण, याच्या उलट कांहीं तरी नव्या विचारांत दिवस गेला असला, तर लोकदृष्ट्या अंथरुणावर निजलेसें व्हावयाचें, पण त्या दिवसभरच्या विशेष विचारांत मन वावरत असल्यामुळें कधीं कधीं सकाळपर्यंत झोंप लागल्याशिवाय रात्र जाई. पण हें जागरण मनाच्या उल्हासाचें असल्यामुळें त्यापासून थकवा किंवा त्रास वाटत नसे.

अशा आनंदानें जाणाऱ्या मे महिन्याच्या सुट्टींत आम्ही नाशिकाहून पुण्यास आलों होतों. ह्या सालीं वासुदेव बळवंत फडके ह्याच्या बंडाच्या व आसपास इतर ठिकाणीं दरवडेखोरांच्या धामधुमीच्या खऱ्याखोट्या बातम्या नित्यशः सकाळसंध्याकाळ मंडळी जमली म्हणजे सहज कळत असत. शिवाय ह्यासंबंधांत कित्येक अब्रूदार गृहस्थांचा परोक्ष व अपरोक्ष रीतीनें छळ होत आहे, अशीही हकीकत स्वतःच्या कानावर येई. अशा वेळीं आम्हां पुणेकरांच्या दुर्दैवानें तारीख १६ मे सन १८७९ रोजीं रात्रीं सुमारें दोन वाजतां पेशव्यांचें स्मारक व शहराचा अलंकार असा एक बुधवारचा व दुसरा विश्रामबागचा वाडा अशा दोन्ही वाड्यांना एकाएकीं आग लागून सकाळला दोन्ही वाडे जळून खाक झाले. ही आग आम्हांला बरीच भोंवली.

ह्या वेळीं मुंबईच्या गॅझेट पत्रानें खोडसाळ लेख लिहून व वाडा जाळणारे रानडे यांच्या नांवाशीं आमच्या नांवाचा बादरायणी संबंध जोडून सरकारचें मन अधिक दूषित केलें. वाडे जळाल्यापासून सुमारें आठ दिवसांनीं "देखत हुकूम, सुट्टी संपण्याची वाट न पहातां, धुळयास जाऊन फ० क्रा० स० जज्जाचा चार्ज घ्यावा," असा हुकूम आल्यानें, सुट्टी संपण्यापूर्वीच आम्हांला धुळयास जाऊन दाखल व्हावें लागलें. पुण्यांतून जाते वेळीं पुण्यांतील व अन्य ठिकाणच्या मित्रमंडळींना फारच वाईट वाटलें, व त्यांनीं अतिशय कळकळीनें सांगितलें, कीं, " ह्या वेळीं धुळयास आपली बदली करण्यांत सरकारचा कांहीं तरी गूढ हेतु खचित आहे, तेव्हां सावधपणानें वागावें. आपले मनाप्रमाणें सर्व जगाचें मन निर्मळ आहे, असें मानून सर्वांवरच विश्वास ठेऊन वागतां कामा नये. नाहीं तर 'धुळयाची हवा उष्ण असल्यामुळें माझ्या डोळयाला मानवणार नाहीं, करितां माझी बदली तेथें करूं नये, असा सरकारास अर्ज करावा."

यावर मंडळींना निक्षून सांगितलें, कीं, " एवढी गोष्ट मात्र अगदीं सांगूं नका! जोंपर्यंत मला नोकरी करावयाची आहे, तोंपर्यंत कोणतीही सबब सांगणें मला आवडत नाहीं. सबब सांगून विनंति करण्याची वेळ आली तर मी राजीनामा देऊन मोकळा होईन. तें मला अधिक पसंत पडेल!"

पुढें आम्ही धुळयाला गेल्यावरसुद्धां वर सांगितलेल्या मित्रमंडळींचीं तशाच मजकुराचीं पत्रें येत असत. ह्या पत्रांत त्यांनीं लिहिल्याप्रमाणें एक तर अनुभव आम्हांला लवकरच आला. तेथें जाऊन सुमारें एक महिना झाल्यावर आमचें रोजचें टपाल नेहमींपेक्षां जरा उशीरां मिळूं लागलें, व तें पुन्हां चिकटविलेलें ( म्हणजे एक वेळ फुटलें जाऊन पुन्हां चिकटविलेलें ) असें येऊं लागलें, व तेंही वेळेवर न मिळतां लोकांपेक्षां उशीरानें मिळूं लागलें, आमचा शिपाई दररोज पोस्टांत टपाल आणण्यास जात असून आमचेंच टपाल उशीरां कां मिळतें, याचा उमज पडेना. आम्ही उलट शिपायास रागें भरावें, कीं, " तूंच उशीरां टपाल आणण्यास जात असशील, नाहीं

तर कोठें तरी गप्पा मारण्यास बसत असतील झालें ! ” तो म्हणे “ नाहीं महाराज ! मी मास्तरांना टपाल लवकर द्या म्हणून म्हणतों, पण सर्व डिलिव्हरी होईपर्यंत मास्तर तिकडे लक्ष्य देत नाहींत व आपलें काम झाल्याशिवाय टपालही देत नाहींत. ”

हें **स्वतः** ऐकून कांहीं तरी लक्ष्यांत येऊन मला म्हटलें “त्या गरीबाला उगाचि कां बोलतेस ? ह्यासंबंधांत कांहीं तरी वेगळेंच असावें, असें मला दिसतें. ”

मला या दुसऱ्या वाक्याचा अर्थ फारसा समजला नाहीं; पण शिपायाला याबद्दल पुनः बोलावयाचें नाहीं, इतकें मात्र मीं लक्ष्यांत ठेविलें.

पुढें सुमारें दोन महिन्यांनीं एके दिवशीं संध्याकाळीं तेथील त्या वेळचे असिस्टंट कलेक्टर आमच्या घरापाशीं आले व “ फिरावयास यावयाचें आहे का ? ” म्हणून **स्वतः**ला विचारिलें.

“ होय ” म्हटल्यावर ते म्हणाले “ मग गाडी जोडण्याची खटपट कशाला ? माझ्याच गाडींतून आपण जाऊं. ”

तेव्हां **स्वतः** त्यांचेबरोबर जाणें झालें. सुमारें दोन तासांनीं घरीं परत आल्यावर मग म्हटलें, कीं, “पहा, मला वाटत होतें तसेंच शेवटीं ठरलें. आपण टपालाबद्दल आपल्या शिपायाला बोलत होतों, पण त्याचा कांहीं त्यांत संबंध नव्हता. वरूनच ती सर्व खटपट झाली होती. आज साहेब बोलतां बोलतां सहज म्हणाले कीं, “गेले कांहीं दिवस मला आपल्याशीं जरा अविश्वासानें वागावें लागलें, याबद्दल मला फार वाईट वाटतें. ”

ह्या दिवशीं बराच वेळ यासंबंधानें आमचें बोलणें झालें.त्यांत सरकारचा त्यावेळीं पुण्याचे लोकांबद्दल अविश्वास व त्या धोरणानें होत असलेले प्रकार, ह्याबद्दलही बऱ्याच गोष्टी सांगितल्या. त्या ऐकिल्यावर मात्र मला पुण्याची मंडळी असें कां लिहीत होती, याचा उमज पडला. याशिवाय दर एकदोन दिवसांनीं वासुदेव बळवंत फडके किंवा हरि रामोशी या सहीच्या, त्यांत बंडाचा किंवा दरवड्याचा उद्यां अमुक ठिकाणीं बेत केला आहे,

अमुक माणसें व हत्यारें मिळविलीं आहेत, वगैरे मजकुराचीं पत्रें मात्र न फुटतां हातांत यावयाचीं. तीं आलीं म्हणजे वाचून पाकिटासुद्धां जशींच्या तशींच फौजदाराकडे पाठवावयाचीं, असा स्वतः क्रम ठेविला. ह्याप्रमाणें प्रथम दोनचार महिनेपावेतों स्वतःच्या मनाला फारच त्रास झाल्यामुळें आणि माझाही दुपारचा वेळ एकटी असल्यामुळें बराचसा खिन्नतेंत व कंटाळवाणा जाऊं लागला.

माझा नाशिकाचा अभ्यास येथेंही सुरू ठेविला होता,पण मैत्रिणी कोणी नव्हत्या. स्वतः कोर्टांतून घरीं आल्यावर व भाऊजी शाळेंतून आल्यावर आम्ही टांग्यांतून जमनागिरीच्या बाजूला किंवा दुसरीकडे कोठें तरी फिरावयास जात असूं. एके दिवशीं विचारलें, कीं, "आपण ह्या गांवांत आलों आहों,तेव्हां येथील कांहीं कांहीं चांगल्या बायकांची ओळख करून घ्यावी, त्यांना हळदीकुंकवाच्या वगैरे निमित्तानें आपल्या घरीं बोलवाव्यात, केव्हां आपण त्यांच्या घरीं जावें, म्हणजे परिचय होऊन इकडील त्यांच्या रीतीरिवाजाची माहिती होते.चांगल्या बायकांच्या सहवासानें आपल्याला समजत नसलेल्या पुष्कळ गोष्टी सहज पाहूनच लक्षांत येतात, आणि जगांत कसें वागलें असतां लोक बरें म्हणतील याचा अनुभव मिळवितां येतो." असें सांगितल्यावर दर शुक्रवारीं व मंगळवारीं दुपारीं हळदीकुंकवाच्या निमित्तानें बायकांना मीं बोलावूं लागलें, व त्याही येऊं लागल्या. याप्रमाणें बरीच ओळख झाल्यावर कांहींजणीं साधें शिवण, गळपट्टे, टोप्या वगैरे करण्यास आमच्या घरीं दुपारीं येऊन बसूं लागल्या. मला शिवणकाम त्यांच्या इतपतच येत होतें. कांहीं असो. पण माझा वेळ अधिक चांगला जाऊं लागला.

आम्ही खोल गल्लींत राहात होतों त्या घराला लागून दुसऱ्या भावाच्या वांटणीचें घर होतें. या दुसऱ्या घरांत माधवराव मोरेश्वर नांवाचे खानदेशी कुटुंबवत्सल गृहस्थ रहात असत. सुना, लेंकी, मुलें, भाऊ, आई, वगैरे बरेंच मोठें कुटुंब होतें. हीं सर्व माणसें रीतीनें फार सालस व मायाळू असत. पुढें त्यांची बदली परगांवीं झाल्यावर त्यांना आपलीं मुलेंमाणसें घेऊन जावें लागलें. त्यांच्या जाण्यानें माझी चांगली सोबत गेल्यामुळें मला

फार हुरहुर लागली, व पुनः दुसरा चांगला शेजार मिळण्याकडे माझें लक्ष लागलें. थोड्याच दिवसांनीं एक बिऱ्हाड आलें. हेंही कुटुंबवत्सल होतें. म्हणजे मुलगे, सुना, कुटुंब, नोकरचाकर वगैरे मिळून बरीच मंडळी होती; पण प्रेम आणि वत्सलता हीं दोन मात्र त्यांच्यापासून फार लांब रहात असत. याबद्दल सर्व हकीकत मला त्यांच्या दोघी सुनांकडून व कुटुंबाकडून कळत असे. मुख्य बाई स्वभावानें मायाळू, पोक्त व धार्मिक असत. हिंदु कुटुंबांत जीं आम्ही सुखाचीं साधनें असें समजतों तीं त्यांना अनुकूल असत. त्यामुळें त्या मोठ्या नशीबवान् आहेत असा माझा समज होता; परंतु त्या फार दुःखी आहेत असें त्यांच्याशीं झालेल्या परिचयावरून माझ्या लवकरच ध्यानांत आलें, व हा शेजार आपल्याला नसावा असें वाटूं लागलें. या बाईला मुलगी नव्हती व त्यांना मुलीची आवड असे, त्यामुळेंच कीं काय त्या माझ्यावर आईसारखें प्रेम करीत, व मलाही त्यांचा ओढा वाटे. या आमच्या दोन्ही बिऱ्हाडांच्या मधोमध दार असल्यामुळें तें आधींच्या बिऱ्हाडापासून उघडेंच असे. त्या दारानेंच हें बिऱ्हाड आल्यापासून सौभाग्यवती काकू व दोघी सुना ह्या दिवसांतून चारपांच वेळां तरी आमच्या घरीं येत असत. सकाळीं येऊन वेणी घालीत. मला कमीजास्त कांहीं पदार्थ करावयाचा असल्यास त्या येऊन उभ्या राहून शिकवीत. दुपारीं पुरुष कचेरींत गेल्यावर उभयतां सुनांसह काकू आमच्या घरीं येत असत.

चारपांच महिन्यांनीं एके दिवशीं काकू आमच्या घरीं येऊन सांगूं लागल्या “ उद्यां आम्हांला पुण्याला जावयाचें आहे. ”

मीं घाबरून विचारलें “ एकाएकीं मध्येंच कां बेत झाला ? ”

त्या म्हणाल्या “आमच्या घरीं कारण लागत नाहीं व बेत लागत नाहीं. मनांत आलें, कीं, पुरे; योजतील तें कारण व बांधतील तें तोरण, अशी आमची स्थिति आहे. आजपर्यंत तुम्हाला लहान मुलगी म्हणून स्पष्ट कांहीं सांगितलें नाहीं; पण तुम्हाला मीं माझी मुलगी म्हटली आहे म्हणून कांहीं सांगून ठेवितें. जरा एकीकडे बसूं या; या मुली आल्या नाहींत तोंपर्यंत

कांहीं बोलण्यास सांपडेल." असें बोलून त्यांनीं मला पुष्कळ गोष्टी सांगितल्या. त्या सांगत असतांना त्यांना एकसारखें रडूं येत होतें.

मला ही सर्व हकीकत ऐकत असतांना आश्चर्यानें व भयानें गोंधळल्यासारखें होऊन रडूं येऊं लागलें. काकूंनीं मला जवळ घेऊन सांगितलें "तुम्ही भिऊं नका. मधलें दार बंद करून पक्कें करून टाका. मीं सांगितलेल्या गोष्टी तुमच्या माणसांना कळल्या तर माझ्याबद्दल काय वाटेल बरें?"

मीं म्हटलें "छे! तुमच्याबद्दल काय वाटावयाचें आहे? तुम्हीं मला आईसारखें कितीतरी मायेनें वागविलेंत व सोबत केलीत व आतांचे उपकार तर आम्ही कधीं विसरणार नाहीं."

इतकें बोलणें झाल्यावर माझे काय विचार चालले होते ते माझे मलाच समजले नाहींत. मन अगदीं बधिर व बोथट झाल्यासारखें झालें होतें. काकू बराच वेळ इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत होत्या, व मीही त्यांच्याशीं बोलत होतें, पण आम्ही कशाबद्दल बोलत होतों, व आम्हांपैकीं कोण काय बोलत होतें हें मला कांहींच समजलें नाहीं. ह्या वेळींही मला जरी कोणी विचारलें असतें तर कांहींच सांगतां आलें नसतें. असो.

स्वत: येण्याची वेळ झालेली पाहून त्या तिघीही बायका उठून गेल्या. मग माझा जीव जरा हायसा झाला व घरीं आल्याबरोबर ही गोष्ट सांगावी, किंवा जेवण झाल्यावर सांगावी, हें आपल्याशीं ठरवूं लागलें. त्या माणसाच्या अधमपणाच्या गोष्टी ऐकल्यापासून माझें मन आधींच भ्याल्यासारखें झाल्यानें उगीच्याउगीच एकाएकीं रडूं येई. स्वत: दमूनभागून घरीं येणें होईल अशा वेळीं ही हकीकत सांगितली तर त्रास होईल व रात्रीचें जेवण जाणार नाहीं, तेव्हां आपण ही रात्रींच सांगावी, असा मीं बेत केला. नेहमींप्रमाणें पांच साडेपांच वाजतां घरीं येणें झालें. मी कपडे काढून घेण्यास पुढें गेलें. कपडे काढून घेत असतांना, कांहींतरी नेहमींसारखें विनोदानें विचारणें झालें असेल, पण माझें लक्ष ठिकाणीं नसल्यामुळें माझ्याकडून उत्तर मिळालें नाहीं. त्यामुळेंच कीं काय कोण जाणें, विचारलें, कीं, "आज असें काय झालें आहे? तुझ्या माहेरचें कांहीं पत्र आलें आहे कीं काय?"

तें ऐकून मीं एकदम म्हटलें “ पत्रबित्र कांहीं नाहीं आलें,” असें म्हणून मी घाईनें “ भाऊजींना फराळास देतें, ” असें म्हणून आंत निघून गेलें.

फराळाचें देत असतांना दुपारची हकीकत फिरावयास जातेवेळींच जवळ सांगावी,रात्रीपर्यंत आपल्याला धीर धरवणार नाहीं,असा मनाशीं बेत केला. मग नित्यासारखें फळें व सुपारी घेऊन दिवाणखान्यांत गेलें. फळें खातांना पुनः पहिल्यासारखें “आज कांहीं नवल विशेष ? ” असें म्हटल्यावर मीं म्हटलें “ आज फिरावयास जातांना गाडींत पुष्कळ गोष्टी सांगणार आहें.”

**स्वत:** पोषाख केला. भाऊजी फराळ करून बाहेर आले. टांगा दाराशीं तयारच होता. टांग्यांत आम्ही तिघेंजण बसून फिरावयास गेलों. गाडींत बसल्यावर पुनः **स्वत:** विचारण्याची वाट न पहातां ( एक वेळ **स्वत:** विचारलेल्या गोष्टीचें उत्तर न मिळाल्यानें फिरून त्याबद्दल विचारावें लागलें तर राग येत असे हें मला माहीत होतें ) मी होऊन सांगण्यास प्रारंभ केलाच; पण सगळ्या गोष्टी भाऊजींच्यादेखत बोलण्यासारख्या नसल्यामुळें मला तांत्रिक सांगाव्या लागल्या. हें लक्षांत आल्यावर गाडी उभी करावयास सांगितलें व “ आपण आज मैलभर चालून येऊं,” असें म्हटल्यावर आम्ही चालूं लागलों. भाऊजीही आमच्याबरोबर चालूं लागले. तेव्हां त्यांना **स्वत:** आपलें खिशांतील घड्याळ काढून देऊन सांगितलें कीं, “ आबा, आतां किती वाजले आहेत तें पहा. घड्याळ नीट खिशांत घाल. या मैलापासून दुसऱ्या मैलापर्यंत पाऊंडावर धांवत जाण्यास किती मिनिटें लागतात तीं तेथें गेल्याबरोबर पाहून ठेव, व आम्ही तेथें आल्यावर मला सांग. ”

**स्वत:**चें सोन्याचें घड्याळ हातांत मिळालेलें पाहून भाऊजींना फार आनंद झाला, व त्यांनीं **स्वत:** सांगितल्याप्रमाणें धांवण्यास प्रारंभ केला. आम्ही हळूहळूच चालूं लागलों व चालत असतांना काकूंनीं सांगितलेली सर्व हकी-कत जशीच्या तशी मीं सांगितली. मला फार वाईट वाटलें. “ आपण आतां हें घर सोडून दुसरीकडे रहाण्यास जाऊं.” असें मात्र मीं पुष्कळ वेळां म्हटलें.

**स्वत:**चा यावेळीं गंभीर चेहरा होऊन नुसता विचार चालला होता. मला कांहींच उत्तर दिलें नाहीं.वाटेनें दोन रस्ते लागले. भाऊजींना ज्या रस्त्यांनीं

जावयास सांगितलें त्या रस्त्यानें आम्ही न जातां बोलण्याच्या भरांत त्या रस्त्याकडे न वळतां दुसऱ्याच रस्त्यानें चालूं लागलों. एक मैल जाऊन दुसरा मैल आला, तरी आबाची गांठ पडत नाहीं. "तो गेला तरी किती लांब?" असें म्हटलें मात्र, तोंच स्वतःची चूक ध्यानांत येऊन म्हटलें, "अरे, आम्हीच चुकलों. त्याला दुसऱ्या रस्त्यानें जावयाला सांगून आम्ही तिकडे जावयाचें तें बोलण्याच्या नादांत इकडे आलों. चल लवकर, तो वाट पहात असेल." असें म्हणून आम्ही झपाट्यानें चालून भाऊजी होते त्या मैलाशीं येऊन पोहोंचलों.

भाऊजी अगदीं भ्यालेल्यासारखे होऊन वाट पहात होते. त्यांना जवळ घेऊन सांगितलें "अरे, बोलण्याच्या नादांत आम्ही चुकून दुसऱ्या रस्त्यानें गेलों म्हणून तुला वाट पहावी लागली. चल आतां आपण परत जाऊं," असें म्हणून आम्ही आणखी एक मैल चालून टांगा गांठल्यावर लवकरच घरीं आलों. तरीही नेहमींपेक्षां पुष्कळ रात्र झाली.

त्या दिवशीं नेहमींसारखें कांहीं वाचन न वाचतां उशीर झाला म्हणून लवकरच जेवण आटपून निजावयास गेलों. पोरपणामुळें भाऊजींना लवकरच झोंप लागली, पण मला झोंप येईना. मनांत दुपारच्याच गोष्टी घोळत होत्या. स्वतःच्या मनाची काय अवस्था झाली असेल ती असो. सुमारें बारा वाजेपर्यंत स्वतः स्तब्ध राहून बारा वाजतां बोलण्यास आरंभ करून "अनीतिमान् माणसापासून नीतिमान् माणसाला कधींच भीति नसते, याबद्दल विनाकारण भिऊं नये व काळजी करूं नये; वाईट गोष्टी जितक्या बोलण्यास सोप्या आहेत तितक्या करण्यास सोप्या नसतात; ह्या लोकांनीं बाहेरून दांडगेपणाचा किंवा उर्मटपणाचा आव घातला तरी आंतून ते भेकड असतात; त्यामुळें नीतिमान् माणसापुढें त्यांच्यानें क्षणभरही धीर धरवत नाहीं, त्या बाईनीं सांगितल्याप्रमाणें मधल्या दाराला कुलूप लावून स्वस्थ मनानें आपल्या घरांत कांहींना कांहीं उद्योगांत असावें; मन रिकामें ठेविलें नाहीं म्हणजे तें नसती काळजी अगर भीति घेऊन बसत नाहीं; येऊन जाऊन पांच किंवा सहा तास तुला एकटीला काढावे लागतात; तेवढा वेळ टाईम-

टेबलाप्रमाणें नेमलेल्या कामांत घालवावा, म्हणजे तो कंटाळवाणा जाणार नाहीं." वगैरे बऱ्याच गोष्टी सांगून माझ्या घाबरलेल्या मनाला धीर दिला.

पुढें स्वतःची बदली मुंबईस झाल्यावर आम्ही मुंबईस लवकरच गेलों व या अधम शेजाऱ्याचा शेजार अनायासें टळला.

## भाग सातवा.

## सन १८८१.



ता. ३ माहे जानेवारी सन १८८१ इ. रोजीं आम्ही मुंबईस आल्यावर प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट मि. डोसाभाई फ्रामजी कडाका यांच्याकडून स्वतः चार्ज घेतला. ही बदली फक्त तीन महिन्यांपुरतीच होती. आम्ही शेतओळींत एक बंगला घेतला, व डॉ. भांडारकरांच्या शेजारीं राहूं लागलों. याच वेळीं भांडारकरांच्या कुटुंबांतील बायकांची व माझी ओळख झाली. त्यांची वडील मुलगी शांताबाई यांचा व माझा स्नेह जमला. त्यायोगानें आमचें एकमेकींकडे वारंवार जाणेंयेणें होऊं लागल्यामुळें त्यांची आई, बहीण व भावजयी यांच्याशीं माझा परिचय झाला. कुटुंबामध्यें मुख्य स्वामिनी असते ती प्रेमळ, धर्मनिष्ठ, निरलस असली म्हणजे संसारांतील सर्वच माणसें सुखी, नीतिमान् व उद्योगी अशीं होतात, व त्यांचे दिवस आनंदांत जाऊन स्वर्गसुख येथेंच आहे असें त्यांना वाटतें, व तें अगदीं खरें आहे. अशीं जीं कांहीं भाग्यवान् कुटुंबें आमच्या पहाण्यांत आलीं त्यांत डॉ. भांडारकर यांचें नांव पहिलें येईल, अशी माझी समजूत आहे. सौ. अन्नपूर्णाबाई भांडारकर यांची वागणूक लेकींशीं व सुनांशीं सारखीच असे. अशी रीत हिंदुकुटुंबांत फारच क्वचित् दृष्टीस पडते. कोठें कांहीं, कोठें कांहीं दृष्टीस पडतें; पण यांच्या घरीं भेदभाव कधीं दिसला नाहीं, त्यामुळें कुटुंबांतील सर्वच माणसें एकोप्यानें व आनंदानें असत. असें जों जों माझ्या लक्षांत येई तों तों त्या बाईबद्दल आदरबुद्धि वाढत जाई व पुढें पुढें तर मला त्या अगदीं आई-

सारख्या वाटूं लागल्या. त्याच भावनेनें मीं त्यांच्याशीं वागें व त्याही माझ्या-वर प्रेम करून वेळोवेळीं शिकवणीच्या गोष्टी सांगत. सौ० शांताबाईचें व माझें एकमेकींवरचें प्रेम त्यांच्या आमरणांत होतें तसेंच शुद्ध व दृढ होतें. आमच्या चोवीस वर्षांच्या स्नेहामध्यें आमचा केव्हांही गैरसमज झालेला नाहीं. एकमेकींना तोंडावर किंवा पाठीमागें केव्हांही नांवें ठेवण्याचा प्रसंग आला नाहीं. त्या अतिशय धार्मिक, सत्यनिष्ठ व उद्योगी असत. त्या सन १९०४ सालीं अज्ञान लेंकरांना, वृद्ध व वत्सल पित्याला, पूज्य पतीला व आम्हां मैत्रिणींना चटका लावून हा अशाश्वत इहलोक सोडून अक्षय्य सुख भोगण्यास परलोकीं गेल्या.

तेथील प्रार्थनासमाजाच्या मुलशाळेंत आर्यमहिलासमाज नांवाची संस्था पंडिता रमाबाई यांनीं स्थापन केली होती. तिच्या सभा दर शनिवारीं भरत असत. सभेला आठदहा बायका व चारसहा पोक्त पुरुष येत असत. कोणी-तरी एखाद्या विषयावर निबंध अगर थोड्या ओळी लिहून आणीत व कधीं कधीं पुस्तकांतील एखादा उतारासुद्धां लिहून आणीत. तरी सभेंत हजर असलेली पोक्त मंडळी म्हणजे डॉ० आत्मारामदादा, भास्करराव भागवत वगैरे आह्मांला उत्तेजन यावें म्हणून "चांगलें लिहिलें आहे, पण आतां यावर कोणी कांहीं बोला," असा आग्रह करीत व कोणालाही बोलण्याचें धैर्य झालें नाहीं तर आपणच चारदोन सोपीं व लहान वाक्यें बोलून दाखवीत व "असें बोलावें," असें सांगत.

याप्रमाणें आमचे मुंबईतील दिवस चांगले गेले व आह्मी पुण्यास आलों. मुंबईस असतां माझा अभ्यास चांगला होता. असो. मुंबईची हकीकत लिहितांना जे सहज विचार मनांत आले ते लिहून गेले.

पुण्यास सन १८८१ सालीं पहिल्याच (प्रिन्सिपाल सदर अमीन) जागी नेमणूक झाली. त्याप्रमाणें पुण्यास येऊन त्या जागेचा स्वतः चार्ज घेतला. पुण्यास येऊन राहिल्यावर कांहीं दिवसांनीं वाटूं लागलें, कीं, या वेळीं नवीन शिकणाऱ्या बायकांकरितां एखादी सभा असावी, त्यांत त्यांनीं नेम-

लेल्या दिवशीं जमावें, त्यांत आपल्यापैकीं कोणी अनुभवी, व पोक्त गृहस्थांनीं या बायकांस समजेल असा सोपा विषय घेऊन सोप्या शब्दांनीं तो समजून सांगावा. हा विचार ठरतांच सन १८८१च्या एप्रिल महिन्यापासून काळ्या बावरांतील अभ्यंकरांच्या वाड्यांत फीमेल ट्रेनिंग कॉलेज असे, त्याच्या एका दिवाणखान्यांत दर शनिवारीं संध्याकाळीं सभा भरूं लागली.

सभेला पहिल्यानें चारपांच वरच्या सुमारें दहाबारा बायका व पांचसहा पुरुष येत असत. पैकीं कै० केरोपंतनाना छत्रे नियमानें येत असत. हे सगळ्यांचे आधीं येऊन बसत. कधींही चुकावयाचे नाहींत. फळ्यावर भूगोल, खगोलसंबंधीं निरनिराळ्या आकृति खडूनें काढून ग्रहण म्हणजे काय व तें कसें लागतें याबद्दलच एके दिवशीं माहिती द्यावयाची, दुसऱ्या वेळीं ग्रह, तारे व नक्षत्रें आकाशांत कोण कोठें असतात, तसेंच कोणत्या नक्षत्रावरून रात्र किती राहिली वगैरे माहिती सोप्या शब्दांनीं आम्हांला समजेल अशी सांगावी व ज्या विषयाबद्दल त्यांनीं माहिती दिली असेल तो विषय कोणाला किती समजला हें पहाण्याकरितां आम्हांपैकीं प्रत्येकीला "आतां मीं सांगितलेलें तुम्हांला जितपत समजलें असेल तितपतच लिहून आणा, नाहीं तर आतांच उठून सांगा," असें सांगावें. विषय जरी आम्हांला समजला असला तरी त्याच वेळीं उठून सांगण्यापेक्षां लिहून आणणें आम्हांला बरें वाटे. कारण, आम्हांपैकीं कोणासही उभें राहून सांगण्यास धीर होत नसे; म्हणून लिहून आणण्याचेंच कबूल करून दुसऱ्या शनिवारीं जिला जितकें लिहितां येई तितकें ती लिहून, आणि असें लिहून आणलेलें पाहून नानांना फार कौतुक वाटे व तें वाचणाऱ्या आम्हां मुलींची प्रशंसा करून ते उत्तेजन देत. कधीं कधीं तर आम्हांला समजावून सांगितलेला विषय न समजल्यामुळें आम्हीं भलतेंच कांहीं लिहून नेत असूं. तेव्हां ते हंसून विनोदानें आमची चूक आमच्या लक्षांत येईल असें बोलत, व त्याच विषयाचें पुनः प्रतिपादन करून साग्र माहिती सांगत. "आणखी पुनः हाच विषय घेऊन त्याच्यावर तुम्हांला मी सांगितलेली माहिती लिहा;" असें सांगत. त्या

सांगण्याचा कंटाळा कधीं कधीं आम्हांला येई; पण लिहिलें नाहीं तर स्वतःला राग येईल म्हणून नानांनीं सांगितलेलें मला लिहावें लागे.

अशा रीतीनें उमेद येण्यासारखें बोलून व कधीं मास्तरासारखें रागें भरूनही दहावीस ओळी लिहिण्याचें व चार शब्द बोलण्याचें काम नाना करून घेत. शिवाय, मला संस्कृत शिकविण्याचें त्यांच्या मनांत असे. त्याबद्दल त्यांनीं चारदोन दिवसांत एकदोनदां बोलूनही दाखविलें. हें स्वतःच्या मनास आलें. तरी घरांतील बायकांच्या जुन्या व नवीन शिक्षणाला विरुद्ध असलेल्या मतामुळें मीं संस्कृत शिकण्याला आरंभ केला असें एकदां कळलें, कीं, शिकावयास कोण येतात याचेंही भान त्यांना न राहून अपमानसूचक एखादे वेळीं तरी त्यांना ऐकूं जाईल असें त्या बोलतील, व नानांचा स्वभाव मानी व तापट असल्यामुळें त्यांना तें सहन होणार नाहीं, तेव्हां तसा प्रसंग न आणणें अधिक बरें, असा स्वतःचा विचार ठरला. पुढें लौकरच वर असलेल्या भीतीचा अनुभव आम्हांला सातआठ महिन्यांनीं आला. ती हकीकत ओघानें येईलच. असो.

आम्ही सभेला ज्या कांहीं दहाबाराजणी जमत होतों, त्यांपैकीं कांहींजणी ट्रेनिंग कॉलेजमध्यें शिकत असलेल्या मास्तरिणी होत्या. अर्थातच त्या पद्धतशीर व अधिक शिकलेल्या होत्या. त्यांच्या खालोखाल अण्णासाहेब भिडे यांच्या मुली शिकलेल्या व हुषार असत. शिवाय, त्या माहेरवासिनी असल्यामुळें त्यांना अधिक मोकळेपणानें वागण्याची सवड होती. बाकीच्या बायका बेताबाताच्याच शिकलेल्या असत. त्यांत एक मी मात्र कमी शिकलेली व शहरांतील रीतीभातींविषयीं बरीच अजाण अशी होतें, तथापि नानांचा लोभ मजवर विशेष होता. ते कांहींही प्रश्न विचारीत असले तर, किंवा कांहीं समजावून सांगत असले तर, मला प्रथम सांगत. माझ्या हातून कांहीं चूक झाली तर स्वतःच्या देखतसुद्धां वेडी मुलगी म्हणून रागावत, व " पुनः अशी चूक करूं नकोस, " असें म्हणत.

सभा म्हणजे काय व तेथें कसें वागावें, याबद्दलची पुष्कळ माहिती मला या सभेमुळें झाली; पण या सभेचा बोभाटा मुळींच नसल्यानें मला आमच्या

घरच्या बायकांकडून कांहींच त्रास झाला नाहीं. इतकेंच नाहीं, तर मी जी बाहेर जातें ती दर शनिवारींच जातें, व ती एखाद्या सभेला जात असेन, अशी कल्पनाही त्यांना आली नसावी. इतर मैत्रिणी ज्या हिला भेटावयास येतात त्यांनाच भेटावयास हीही केव्हां केव्हां जाते, असें त्यांना वाटत असावें. माझा अभ्यास घरांत चालू असे, पण तो रात्रीं व पहांटेस होईल तितकाच. कारण, दिवसां पुस्तक हातांत घेऊन खालीं जाण्याची सोयच नव्हती. पुस्तक वाचीत बसली आहे अशी नुसती बातमी या वडील बायकांच्या कानावर गेली पुरे, कीं, झाली चर्चा सुरू. मग तो विषय त्यांच्या करमणुकीला, चेष्टा करून उपरोधिक हंसण्याला व मला लाजण्याला कितीवेळ तरी पुरत असे. हीं बोलणीं मला एकटीलाच ऐकून घेऊन सहन करावीं लागत. त्यामुळें मलाच त्रास होई. स्वतःच्या कानावर या गोष्टी केव्हां तरी निरुपायास्तव जात असत.

## भाग आठवा
## पहिली स्वारी.

हा क्रम सुमारें चार महिने चालल्यानंतर स्वतःची बदली असिस्टंट स्पेशिअल जज्ज या जागेवर झाली. त्या अन्वयें स्वतःला ऑफिसासह आठ महिने फिरावें लागणार होतें. मला बरोबर नेण्याचा बेत नव्हता. कारण, " बायकामाणसांना नेण्याची सोय कशी काय आहे, उतरण्याचीं ठिकाणें कशीं काय आहेत, याबद्दल पहिल्या वर्षीं स्वारीचा अनुभव घेऊन मग दुसऱ्या वर्षीं तुला नेऊं, " असें सांगितलें. अर्थात्च तें सांगणें मला कोणत्याही रीतीनें बरें तर वाटलें नाहींच, उलट अतिशय वाईट वाटलें. त्यापुढें आपल्याला बढतीचा आनंद व्हावयाचा तो कोणीकडे गेला. आतां मीं एकटीनें दिवस कसे काढावेत, माझें इंग्रजी शिकणें आतां बंद पडेल, अभ्यासांत वेळ जात होता तोही नाहीं, व विसाव्याची जागा तर नाहींच. " स्वतःचें येणें परत घरीं होईपर्यंत मी दिवस कसे काढूं ? " असे शब्द माझ्या तोंडांतून बाहेर पडतात न पडतात तोंच रडें कोसळलें व तें

किती वेळ आवरतां आवरेना. पुष्कळ वेळानें माझें रडें कमी झालेलें पाहून माझी अनेक तऱ्हेनें समजूत करून म्हटलें "कांहीं दिवस मन जरा घट्ट करून रहा. तुझें इंग्रजी बंद पडावयाचें नाहीं. तें शिकविण्याकरितां एखादी बाई पाहण्याची तजवीज मी उद्यां करतों. तुझा सकाळसंध्याकाळचा वेळ घरच्या कामांतच जाईल. राहिला दुपारचा वेळ. तो तास दीड तास तिच्याजवळ शिकण्यांत घालवावा, व आणखी तास दीड तास ती सांगेल तो दुसऱ्या दिवसाचा अभ्यास करून ठेवण्यांत घालवावा. शब्द अगर वाक्यें अडतील तीं आबा, बाबाला विचारून घ्यावींत. आतां घरांतील बायका आपल्या नेहमींप्रमाणें बोलतीलच, याला उपाय नाहीं. तें सोसलेंच पाहिजे. कांहीं दिवस सासूचे व कांहीं दिवस सुनेचे आहेत. आपण होऊन त्यांच्याशीं उद्धटपणानें किंवा हटवादीपणानें वागूं नये. आपल्याला सांगितलें असेल तें मुकाट्यानें न बोलतां करावें. उत्तर मात्र केव्हांही देऊं नये."

ह्या बोलण्यास दोनतीन दिवस झाल्यावर वानवडीच्या झनाना मिशनमधील सिस्टर्सपैकीं एक मिस हरफर्ड नांवाच्या बाई मला शिकविण्यास ठेविल्या, व त्या दोनपासून साडेतीन वाजेपर्यंत शिकवूं लागल्या. ही गोष्ट अर्थात्च घरांतील वडील बायकांना अगदींच नाराज होण्यास कारण झाली. याबद्दल माझ्यावर त्या अतिशय रागावल्या, व घरांतील कोणीही माझ्याशीं गरजेपेक्षां अधिक बोलूं नये अशी एकीकडे सर्वांना ताकीद दिली. हें म्हणजे अबोल्याचें लहानसें भावंडच होतें.

मिस हरफर्ड मला शिकवावयास येऊं लागल्यावर आठ दिवसांनीं **स्वतः**चें ऑफिसासह सातारा जिल्ह्यांत फिरावयास जाणें झालें. मग आठदहा दिवस धुमसत असलेल्या क्रोधाग्नींतून हळूहळू ज्वाला निघूं लागल्या. पहिल्यानें तूं "मडमेला शिवून अंग न धुतां नुसतें वस्त्रांतर करून घरांत बेधडक शिवतेस हें आम्हांला खपावयाचें नाहीं, तुला अंग धुवावयाचें नसलें तर तूं आपली माडीवरच बसून रहा, आम्ही आपलें तुझें ताट माडीवरच पाठवूं. आतां इंग्रजी शिकून मडम व्हावयाचें आहे,तेव्हां आतां यजमानीणबाईच्या

व मडमेच्या थाटाला तें अधिक शोभेला ! खालीं घरांतील कष्ट करावयास दासी बटकी आम्ही आयत्या मिळालेल्या आहोंतच !" वगैरे पुष्कळ शब्दांनीं खरमरीत व मला ऐकूं जाण्यासारखा त्यांनीं निरोप पाठविला.

मीं सर्व बोलणीं आधींच ऐकलीं असल्यामुळें निरोप घेऊन सांगणाऱ्या बाईला कांहींच उत्तर दिलें नाहीं. दुसरे दिवसापासून मडम शिकवून गेली म्हणजे मुकाट्यानें उठून स्नान करीं. हौदाला शिवावयाचें नसल्यामुळें आडावर जाऊन स्नान करीं. घरांत हौद बांधल्यापासून व नळ घेतल्यापासून अर्थातच आडाच्या पाण्याचा उपसा फार कमी असे, त्यामुळें तें फार माजलें होतें. आधींच कार्तिक मार्गशीर्षाचा महिना, त्यांत तिसऱ्या प्रहरीं गार पाण्यानें केलेलें स्नान मला सोसलें नाहीं. वीसबावीस दिवसांनींच ताप येऊं लागला. तीनचार दिवस झाल्यावर "वहिनी रोज गार पाण्यानें स्नान करते म्हणून तिला ताप येऊं लागला आहे, डॉ. विश्रामचें औषध चालू आहे, पण अजून घाम येत नाहीं, व ताप कमी होत नाहीं," वगैरे काळजी वाटण्यासारखा कांहीं मजकूर आबाभावोजींनीं लिहिला असावा.

या ठिकाणीं हें सांगितलें पाहिजे, कीं, घरांतील वडील बायकांचा अशा रीतीनें जरी मला पुष्कळ जाच होता, तरी माझे दोघे दीर माझ्याशीं भावाप्रमाणें वागत. ते कधीं कधीं आपल्या शाळेंतील गमती व मुलांनीं केलेले निरनिराळे कट असतील ते सांगून करमणूक करीत; इतकेंच नाहीं, तर खालील मंडळी कोणी कांहीं चहाड्या सांगत असली तर त्यांच्याशीं, अगर मुख्य बायका माझ्या विरुद्ध बोलत असल्या तर माझी कड धरून त्यांच्याशीं भांडत. असा सर्व रीतींनीं या दोघांचा मला पाठिंबा होता, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट असे.

त्याप्रमाणें त्यांनीं स्वारींत पत्र पाठविल्यावर एकदोन दिवसांत स्वतःचें येणें पुण्यांत झालें. आठ दिवस मुक्काम होता. तितक्या वेळेंत माझ्या प्रकृतीस बरें वाटलें. ताप बरा झाल्यावर स्वतः पुण्यांत असतांनाच मिस हरफर्ड शिकवावयास येऊं लागल्या. मला आधींच सांगितलें होतें, कीं,

"मिस हरफर्डला शिवल्याबद्दल स्नान करण्याचें कारण नाहीं, वस्त्रांतर करावें म्हणजे झालें. इतकेंही करून फारच रागावूं लागल्या, तर त्यांच्या मोठ्या सोंवळ्यांत जाऊं नये, अलीकडे काम करावें. कांहीं झालें तरी शिकण्यास आरंभ केला आहे त्याप्रमाणें कांहीं तरी येईपर्यंत मध्यें सोडावयाचें नाहीं हें लक्ष्यांत ठेव. त्यांच्या रागावण्याकरितां व बोलण्याकरितां उगीच त्रासानें गार पाण्याचें स्नान करून किंवा असें दुसरें कांहीं करून आपली प्रकृति बिघडवून घेऊं नकोस. स्नान करण्याबद्दल आतां त्या तुला त्रास देणार नाहींत. मी पुनः एक महिन्यानें येईपर्यंत शांत मनानें अभ्यास जास्त झालेला दिसला पाहिजे."

दुपारीं हरफर्ड शिकवून गेल्यावर आतां अंग धुवूं कीं काय करूं, असा विचार करीत दहापांच मिनिटें मी तशीच बसलें. इतक्यांत वन्संकडून निरोप आला, कीं "तिला म्हणावें, आडावर जाऊन अंगबिंग धुऊन आमच्याभोंवतीं आणखी दुखणीं आणूं नको! आमचीं आम्हांला कामें पुरेशीं आहेत. त्यांत तुमचीं दुखणीं काढण्याला वेळ नाहीं. हव्या तशा नाचा; जें एकेक होईल तें थोडें आहे."

हा निरोप ऐकल्यावर मला एक प्रकाराचें समाधानच वाटलें. कारण, अंग धुऊं नकोस असें स्वतःच सांगितलें होतें, त्यामुळें मी इतका वेळ विचारांत पडलें, त्याचा आयता उलगडा झाला. त्यानंतर एक महिनाभर चांगला अभ्यास चालला होता. घरांत जिकडेतिकडे शांतता असल्यामुळें माझें मनही शांत होतें.

## भाग नववा.

# पंडिता रमाबाईंचें पुण्यास आगमन व आर्यमहिला समाजाची स्थापना.

या संधीस "पंडिता रमाबाई नांवाची कोणी एक कोंकणस्थ बाई संस्कृतज्ञ व मोठी विद्वान् असून सर्व श्रीमद्भागवत तिला मुखोद्गत आहे, तिनें काशी-

कडील मोठमोठ्या पंडितांना व शास्त्र्यांना वादांत जिंकलें आहे, अशी विद्वान् बाई पुण्यास येऊन राहणार आहे," ही बातमी ऐकून मला फार आनंद झाला, व ही बाई असेल तरी कशी, तिला आपण केव्हां पाहूं, असें मला होऊन गेलें.

दुसरे दिवशीं शनिवार होता म्हणून मी नित्याप्रमाणें सभेला गेलें. तों सगळ्या बायकांच्या बोलण्यांत पंडिताबाईचाच विषय होता. माझ्या-प्रमाणें ज्या त्या तिला पाहण्यास उत्सुक होत्या. ती कशी असेल, कोठं उतरेल, आपल्याला भेटेल कीं नाहीं, ती जवळच कोठें उतरली. तर बरें होईल, लांब उतरली तर मग काय? वगैरे पुष्कळ गोष्टींची चर्चा आमच्यांत बराच वेळ चालल्यावर, मी नक्की बातमी काढण्याकरितां भिडे व मोडक बसले होते तेथें जाऊन पंडिताबाईबद्दल सर्व विचारून घेतलें. ते म्हणाले "पंडिताबाई ही कोणी परकी आहे कीं काय? ती एक आपली कोंकणस्थच बाई आहे. आम्हीं मंडळींनीं तिला बोलाविलें आहे. ती ह्याच इमारतींत उतरावयाची असा बेत केला आहे. ती दुःखी कष्टी बाई, तिचा तुम्ही येऊन समाचार घेतला पाहिजे."

असें ऐकिल्यावर पंडिताबाई आपल्याजवळच उतरणार ह्याबद्दल आम्हांला मनांतून आनंद झाला, व आम्ही त्यांच्या येण्याची वाट पहात होतों. त्या-प्रमाणें चार पांच दिवसांनीं त्या ठरल्याप्रमाणें अभ्यंकरांच्या वाड्यांत येऊन उतरल्या. त्यांच्याबरोबर त्यांनीं भाऊ मानलेला एक गरीबसा बंगाली बाबू होता आणि त्यांची सव्वा वर्षाची मनोरमा नांवाची मुलगी होती. त्या आल्यावर एकेकदां आम्ही सगळ्या बायका त्यांना भेटलों. त्याच सुमारास स्वारींतून स्वतःचें येणें पुण्यास झालें व पंडिताबाईचें पहिलें पुराण आम-च्याच घरीं झालें. तेथून प्रत्येक आठवड्याला एकेकाच्या घरीं पुराण व्हावें असें ठरल्याप्रमाणें जेथें पुराण असेल तेथें आम्ही दोघें जाऊं लागलों.

ही गोष्ट प्रथम पंडिता रमाबाईसंबंधानें राग येण्यास घरांतील बायकांस कारण झालें. आमच्यां घरीं बायका बऱ्याच असल्यामुळें दुपारच्या वेळीं

सूत काढून निरनिराळया जातींच्या वातींचें लक्ष करण्याचा एक कारखाना किंवा लहानशी गिरणीच आमचे घरीं होती, म्हटलें तरी चालेल. त्यामुळें शेजारपाजारच्या ओळखीच्या बायका आपला कापूस घेऊन, किंवा नुसत्या बसावयासही येत असत, व निरनिराळया बायकांकडून गांवांतील निरनिराळ्या खऱ्या व खोट्या बातम्या आमच्या बायकांच्या कानांवर येऊन त्यांची आयतीच करमणूक होई. आजकाल पंडिता रमाबाईंचें आगमन हा विषय तूर्त चर्चेजोगा होता. त्यांच्याबद्दल प्रत्येकीनें खऱ्याखोट्या, बऱ्यावाईट वाटेल तशा गप्पा माराव्यात, व कंड्या उठवाव्यात, असें चालू झालें. ह्या गप्पा चार दोन दिवसांत आमच्या घरीं,वरील बायकांच्या द्वारें येऊन पोहोंचल्या. मग काय ? चेष्टेला व चर्चेला सीमाच नाहीं ! त्यांत आमचा दोघांचा कल तिकडे असल्यानें, तिच्या नांवानें आमचीही चेष्टा करण्यास व पाहिजे तसें बोलण्यास, आमच्या घरांतील बायकांस अनायासें संधि मिळालेली त्यांनीं कधींही वायां घालविली नाहीं. पंडिताबाईबद्दल त्यांना दिवसानुदिवस तिटकारा जास्त जास्त येऊं लागला. त्या आमच्या घरीं आल्या म्हणजे " ती बाटगी आहे, तिला शिवून आमच्या घरांत शिवूं नकोस, तुम्हांला आवडत असली तर तिला तुम्ही गळ्यांत बांधून बसा; पण आम्हांला हा भ्रष्टाकार खपावयाचा नाहीं. काय मेली बापानें चांगलें श्रीद्वारकानाथाशीं लग्न लावून दिलें असतांना पुन: तिनें बंगाली बाबूशीं लग्न लावून देह बाटविला. बरें, संसार तरी केला का ? तेंही नाहीं. तें सगळें निर्दाळून, आतां जग बाटवावयास आली आहे ! " वगैरे अगदीं तिटकाऱ्यानें बोलत.

स्वत:च्या सांगण्यावरून मी पंडिताबाईकडे एक दिवसाआड बसावयास जाऊं लागलें. सहज बोलण्यांत त्या म्हणाल्या " मी हल्लीं हावर्डचा सेकंड पार्ट शिकत होतें; पण येथें आल्यापासून शिकण्याचें जमत नाहीं. "

मीं म्हटलें "मीही थोडेंसें शिकत असतें. आजपर्यंत **स्वत:**च शिकविण्याचा क्रम असे, पण अलीकडे फिरण्याचें काम झालें; तेव्हां **स्वत:** फिरावयास जावयाचें असतें, व माझें शिकणें बं पडूं नये म्हणून वानवडीच्या

झनाना मिशनमधील एक मडम मला शिकविण्यास ठेविली आहे. ती मला शिकवावयास येत असते. तुम्हांला वाटलें तर तुम्हीही तिच्याजवळ शिकावयास येत जा." त्यांना तें पसंत पडलें व दोनतीन दिवसांनीं त्या आमच्या घरीं शिकावयास येऊं लागल्या.

आधींच त्या बाईचा तिटकारा आमच्या बायकांना आला होता. तशांत त्या दररोज आमच्या घरीं येऊं लागल्या. त्या माझ्याशीं हंसत बोलत व विशेष स्नेहाच्या रीतीनें प्रेम करीत असत, तें यांना आवडलें नाहीं. पुढें आमची सभा होती तिलाच जोडून पंडिताबाईनीं एक सभा स्थापन केली व तिला 'आर्यमहिलासमाज' असें नांव दिलें. पूर्वीं आमची सभा फक्त दहाबारा बायकांची असून तिला नांव नव्हतें व तिचा बोभाटही नव्हता, त्यामुळें ती आम्हांला पचली; पण आतांच्या सभेला पुष्कळ बायकापुरुषांची सहानुभूति असल्यामुळें दर शनिवारीं पुष्कळ मंडळी जमूं लागली. त्यांत मुख्यत्वेंकरून पंडिताबाईच निरनिराळ्या विषयांवर व्याख्यानें देत असत. आधींच पंडिताबाईंची वाणी अस्खलित व गोड असून विषय प्रतिपादन करण्याची शैली उत्तम. बोलत असतांना श्रोत्यांचें मन आपल्या भाषणाकडे आकर्षण करून घेण्याची त्यांची विलक्षण हातोटी होती. हे चारही गुण त्यांच्यामध्यें असल्यामुळें शहरांतील सर्व जुन्या व नव्या शिक्षणेच्छू विद्वानांना पंडिताबाईंचें कौतुक व अभिमान वाटूं लागला, व दर शनिवारच्या सभेला आपल्या घरच्या बायकांना व मुलींना ही मंडळी नेमानें पाठवूं लागली.

अशा रीतीनें या सभेची भरभराट लवकर होऊं लागली. शिवाय पंडिताबाईंचीं पुराणें गांवांत सुरू होतींच. मी बहुधा प्रत्येक पुराणाला बोलावणें असेल तेथें जात असें. शिवाय दर शनिवारीं उघडपणानें पंडिताबाईंच्या सभेला जाऊं लागलें. आमच्या घरच्या बायकांनीं व या बसावयास येणाऱ्या बायकांनीं रोज नव्या नव्या कंड्या सांगाव्यात. "पंडिता रमाबाईनीं सभा केली आहे, त्यांचा पुरुषांवर कटाक्ष आहे, पुरुषांच्या ताब्यांत बायकांनीं कां वागावें? ते बायकांना गुलामांसारखें वागवितात, त्यांची पर्वा करीत नाहींत,

चोवीस तास बायकांनीं काबाडकष्ट करावेत; पुरुष घरीं आले कीं, त्यांना अंघोळीला पाणी उपसून द्यावें, आयतें जेवायला वाढावें, आपण दमलें असलें तरी तें मनांत न आणतां नवऱ्याचे हातपाय चेपावे, इतकें करूनही कोठें कांहीं चुकलें कीं लाथाबुक्क्यांशीं गांठ! असे जे जुलमी पुरुष त्यांच्या ताब्यांत तुम्ही न रहातां मोकळ्या व्हा," वगैरे आपल्या समजुतीप्रमाणें व बुद्धीप्रमाणें निरनिराळ्या बातम्या सासूबाई व वन्सं यांना येऊन सांगत. आमच्या सर्व बायकांत वन्सं समजूतदार होत्या. त्यांना शिक्षणाची किंमत कळत होती; तरी पण एकदां जी बाजू धरली ती सोडावयाची नाहीं असा त्यांचा स्वभाव असल्यामुळें व जुनें तितकें चांगलें असा एकदां त्यांचा ग्रह झाला असल्यामुळें त्या अभिमानाला बळी पडत. वृत्ति अतिशय तापट असल्यानें आपल्या म्हणण्याप्रमाणें होईपर्यंत एखाद्या गोष्टीचा पिछा सोडीत नसत. मग त्या गोष्टीबद्दल दोन्ही बाजूंला कितीही त्रास होवो, त्याची पर्वा नाहीं, असा त्यांचा स्वभाव असे.

या नित्य बातम्या ऐकून "मीं सभेला जाऊं नये, पंडिताबाई आमच्या घरांत आल्या तर मीं त्यांना शिवूं नये, पुरुषांना या गोष्टी हव्या असल्या तरी आपण दुर्लक्ष करावें; नाहीं म्हणूं नये. पण करूं नये म्हणजे झालें; आपोआपच कंटाळून कंटाळून नाद सोडून देतील. तुझ्या माहेरचीं जुनीं व परंपरागत माणसें त्यांना तरी तुमचे हे ढंग आवडतील का? तुझी आई व वडील किती बरे चालीचीं माणसें आहेत? त्यांना नुसतें पाहिलें तरी संतोष वाटतो. त्यांच्या घरीं तर बायकांनीं मराठीसुद्धां शिकण्याची चाल नाहीं, मग इंग्रजीचें नांव कशाला? पण तुझें पहावें तों मडमेवर ताण!" अशा रीतीनें वन्संनीं व सासूबाईंनीं मला पुष्कळ वेळ मायेनें जवळ बसवून घेऊन तऱ्हेतऱ्हेनें शिकविण्याचा प्रयत्न केला. त्या बोलत असतांना त्यांचें सर्व बोलणें मला खरें वाटे, व त्या म्हणतात तसेंच आतां वागावें असा मी मनांत विचारही करीं, व त्या विचारांतील त्या गोष्टी होय होय म्हणून तोंडानें कबूल करीं; पण वेळ आली म्हणजे तशी कृति हातानें घडत नसे. कारण,

**स्वतः**ला ज्या गोष्टी पसंत असत, त्या गोष्टी कांहीं झालें तरी केल्या पाहिजेत; नाहीं तर राग येईल, हें मला पक्कें माहीत असल्यामुळें **स्वतः**ला हवी असेल तीच गोष्ट करण्यास मी कधीं चुकत नसें. एक, जें माझें खऱ्या सुखाचें व समाधानाचें ठिकाण त्यांत अंतर येऊं नये व ही एक समाधानाची बाजू बळकट असेल तर घरांतील इतर कोणत्याही माणसांकडून होणारा जाच व त्रास सोसण्याला मला अधिक बळ येईल, अशी माझी पक्की समजूत होती. आठ महिन्यांचा उन्हाळा व एक दिवसाचा पावसाळा, अशी घरांतील इतर आप्तांची व **स्वतः**ची वागणूक असे. त्यामुळें घरांतिल वडील बायकांना कांहीं उत्तर न देतां व दुसऱ्या कोणालाच बरें वाईट कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें **स्वतः**च्याच आवडीच्या दिशेनें वर्तन ठेवण्याचा माझा सर्वस्वी कल असे.

**स्वतः** घरांतील कोणत्याच गोष्टीची चौकशी करावयाची नसे व बोलावयाचें नसे. मला अमुक तऱ्हेचें वर्तन पसंत आहे, माझ्या बायकोनें किंवा तुम्हीं अमुक तऱ्हेनें वागावें, ही गोष्ट मला पसंत नाहीं, ती तुम्ही करूं नका, वगैरे मालकाच्या डौलानें मीपणाचा शब्द कधींही उच्चारावयाचा नाहीं, असा नियम होता; पण आपण न बोलतां न सांगतां आपल्या माणसानें (मी) मात्र आपल्याच धोरणानें वागलें पाहिजे, अशी **स्वतः**च्या मनाची अट असे. ती ओळखून मीं त्याप्रमाणें ठेविलेली वागणूक घरांतील वडील बायकांस अधिक राग आणण्यास व चेतविण्यास कारणीभूत झाली. त्या व विशेषतः वन्सं म्हणत, “ सभेला जाण्याचा हा नाचरेपणा हिलाच पाहिजे आहे ! दादा (**स्वतः**)–चा तितका आग्रह नाहीं; पुरुषांची वागावयाची रीत असते, पण बायकांनीं कितपत ऐकावें याचें कांहीं तरी तारतम्य हवेंना ? पुरुषांनीं शंभर गोष्टी सांगितल्या, तरी बायकांनीं त्यांतल्या फार तर दहा ऐकाव्यात. व्यवहारांतील बारीक सारीक गोष्टी पुरुषांना काय समजतात ? बायकांनीं शिकावें हें दादांना फार आवडतें, हें मलाही माहीत आहे. कोल्हापुरास सुट्टींत आल्यावर दादांनींच मला लिहावयास व वाचावयास शिकविलें. पोथ्या, पुस्तकें वाचावयास येण्यापलीकडे बायकांचा शिकण्याचा उपयोग

काय ? दादांचा उगीच कांहीं तरी नाद आहे झालें. आमच्या पहिल्या वहिनींचाही या शिकण्याबद्दल किती पिच्छा घेतला; पण ती फार गरीब असे. तिनें आमच्या मर्जीकरितां किती तरी रागें भरणें सोसलें, पण त्या माउलीनें असा नाचरेपणा कधींही केला नाहीं व जुन्या रीतीला सोडलें नाहीं. म्हणून आम्हीं पंचवीस माणसांनीं मानानें दिवस काढले. मी यजमानीण हा विचार तिच्या अष्टांगींही शिवला नाहीं. ती जहागिरदाराची मुलगी नसली तरी कांहीं एवढी भिकाऱ्याची नव्हती. चांगल्याचीच होती; पण स्वभावच सालस. आतां पहावें तर सगळीच तऱ्हा वेगळी! दादांनीं एक गोष्ट करावयास सांगितली, तर हिची तीन गोष्टी करण्याची तयारी आहे. अशा ठिकाणीं आमचा मान कसा रहावा व टिकाव कसा लागावा ? इकडे पाहिलें तर ही रागाच्या वेळेस आम्ही कितीही बोललों तरी रागावत नाहीं. घुम्यासारखी मुकाट्यानें ऐकून घेते; पण आपली कृति करण्यास चुकत नाहीं. मग आमच्या सांगण्यासवरण्याची शोभा काय?" वगैरे कांहींना कांहीं तरी नित्य चालावयाचें.

या क्रमाला सातआठ महिने झाले. तोंपर्यंत स्वतःचें दोन्ही जिल्हे फिरण्याचें काम संपून स्वारी आफिसासुद्धां घरीं आली. "आतां पावसाळ्यांत मुक्काम पुण्यांतच व्हावयाचा आहे, आतां ऑफिससुद्धां दरवाज्यावरच्या माडींत करूं, बाहेर जाण्याचें कामच नाहीं," असें स्वतः म्हटलेलें ऐकून मला फार फार आनंद झाला. स्वतः एकटेंच नेहमींच्या माडींत बसणें होई, कामापुरते तेवढेच शिरस्तेदार किंवा एखादा कारकून येत जात असे. एक नाईक मात्र या माडीवर पहारा करीत असे.

दुपारीं जेवण झाल्यावर व तिसरे प्रहरीं ताजीं फळें, बदाम, पिस्ते, खाण्याचा स्वतःचा पाठ असे. व तीं रोज तिसरे प्रहरीं ताजीं फळें, बदाम, मींच घेऊन गेलें पाहिजे, असें असल्यामुळें, मीच नेऊन देत असें. ज्या दिवशीं शनिवार असेल, त्या दिवशीं दोन वाजल्यापासून मला स्वतः बजावावयाचें, कीं, "पहा तुला सभेला जावयाचें आहे, आज शनिवार आहे, त्याची तुला आठवण आहेना ? वेळ चुकवूं नकोस; नाहीं तर विसरलें, किंवा

खालीं कोणीं कांहीं काम सांगितलें, अशी सबब सांगितलीस तर मला खपावयाचें नाहीं. एकदां नेमलेल्या कामाकडे दुर्लक्ष करूं नये, त्याबद्दल पहिल्यानें त्रास हा होणारच, तो सोसला पाहिजे;" वगैरे सांगितल्यावर मी लागलीच खालीं येऊन सभेची वेळ चुकूं नये म्हणून सभेची वेळ झाली, कीं, " मी जाऊन येतें ." असें मुठींत जीव धरून, भीत भीत वन्संना सांगून त्यांची होय म्हणण्याची वाट न पहातां, एकदम बाहेर पडावयाची. संध्याकाळीं घरीं आल्यावर मला कितपत त्रास सोसावा लागेल, हा नेहमींचा अनुभव असल्यामुळें तेच विचार मनांत घोळून सभेच्या इमारतींत जाईपर्यंत माझें मन खिन्न असे. पण बरोबरीच्या बायकामंडळींत गेल्याबरोबर त्यांच्याशीं हंसण्याबोलण्यांत व माझ्याकडे जें काय काम नेमिलें असेल तें करण्यामध्यें मी हें सर्व विसरून जाई; पण पुनः घरीं परत आल्यावर सभेंतील आनंद व तो धीटपणा मावळून जाऊन मीं भेदरल्यासारखें माजघरांत उभें राहावयाचें. कारण, संध्याकाळीं, ताईसासूबाई व वन्सं यांची ओटीवरच बसण्याची जागा असे. त्यामुळें मी घरीं असलेली त्यांच्या प्रथम दृष्टीस पडावयाचीच. आमच्या ताईसासूबाई व वन्सं एकदां बोलूं लागल्या, कीं, कोणाला भ्यावयाच्या नाहींत. त्यांत ह्या संध्याकाळच्या वेळेस घरांत पुरुष माणसें कोणी नसत, त्यामुळें त्यांना जास्त सवड मिळे. स्वतःचें येणें झालें, कीं, हें बंद होई. मला मात्र आधीं कडक ताकीत व्हावयाची, कीं, " तुम्ही सभेला जाऊन आलां आहांत, लुगडें बदललें आहे, तरीसुद्धां आमच्या घरांत स्वयंपाकांत शिरून वाढावयास घ्यावयाचें नाहीं. चटण्याकोशिंबिरीला, किंवा तिखटमिठाला देखील शिवावयाचें नाहीं. नाहीं तरी सभेला जाणाऱ्या बायकांनीं असलीं हलकीं कामें करूं नयेतच ! वर जाऊन पुरुषांच्या ( नवऱ्याच्या ) मांडीला मांडी लावून बसावें म्हणजे छान दिसेल ! "

हीं व याहून अधिक कडक बोलणीं, सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं जेव्हां जेव्हां संधि साधेल तेव्हां यावयाचींच. घरांतील इतर आप्त बायांशिवाय बादरायण नात्याच्या आणखी पांचसात बायका असत. त्या आमच्या वडील

बायकांना प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष होला हो देऊन मदतच करीत. तरी मी कोणाला कधींच उत्तर देत नसें. कारण, या खालच्या बायकांपैकीं मी कोणाला कांहीं बोललें, कीं, त्या अर्थाचा अनर्थ करून, व कांगावा करून त्या बोलण्याचा पदर वडील बायकांपर्यंत चिकटवावयाच्या, म्हणजे त्यांच्या हेतुप्रमाणें त्याला महत्त्व येई. तेव्हां मीं कोणाला कांहींच बोलावयाचें नाहीं, असा निश्चय केला. फार झालें म्हणजे खालीं असतांना आपल्याशींच मुळूं मुळूं रडून, मनाला असह्य झालेला भार हलका करावयाचा, एवढाच मार्ग मला माहीत होता.

याप्रमाणें शनिवारच्या रात्रीपासून दोनचार दिवसपर्यंत माझ्याशीं या बायकांचा अबोला असावयाचा. तरी पण तिटकाऱ्याचीं बोलणीं मधून मधून येतच. ह्याप्रमाणें क्रम चालल्यावर, गुरुवारीं कोठें भाजी चीर, ताक कर, साहित्य काढ, वाढावयास घे, वगैरे कामें पुन्हां वरसं मला सांगूं लागल्या म्हणजे मेळ्यांतून टाकून दिलेल्या प्राण्याला पुनः मेळ्यांत घेतल्यानें जसा आनंद होतो, तसा मला आनंद होई व मी त्या सांगतील तें काम उल्हासानें व तत्परतेनें लागलीच करीं. अशा आनंदाचे दिवस जातात न जातात, तोंच शनिवार दत्त म्हणून उभा! ह्याप्रमाणें मिश्र-सुखांत एक वर्ष लोटलें. त्या अवधींत माझें इंग्रजी शिकणें बरेंच मार्गास लागलें. मिस हरफर्डच्या सहवासानें इंग्रजी चारदोन वाक्यें मला व्यवहारापुरतीं बोलतां येऊं लागल्यावर मिस् हरफर्ड यांना रजा दिली.

मुलींच्याकरितां हायस्कूल पाहिजे म्हणून हिराबागेंत सभ्य बायकापुरुषांची एक मोठी सभा भरविली होती. त्या सभेंत त्या वेळचे गव्हर्नर सर जेम्स फर्ग्यूसन् यांच्यापुढें सदर हायस्कूलची मागणी करावयाची होती. त्या दिवशीं सदर सभेपुढें इंग्रजींत ॲड्रेस वाचण्याचें काम माझ्याकडे सोंपविलें होतें. इतक्या मंडळीपुढें इंग्रजीमध्यें ॲड्रेस वाचण्याचा हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें कदाचित् मी वेळेवर घाबरेन, बरा वाचणार नाहीं, म्हणून मला समजण्याजोग्या सोप्या व लहान लहान वाक्यांत स्वतः हा ॲड्रेस लिहून दिला होता. तो एकदोन दिवसांत सातआठ वेळ वाचून घेतला होता; पण

शेवटीं वाचला त्या दिवशीं व्हावयाचें तेंच झालें ! वाचावयास म्हणून मी जों उभी राहिलें, तोंच हातपाय कांपूं लागले, छातींत धडकी भरून डोकें व अंग तापलें. डोक्यावरून तर कढत रक्ताचा लोटच जात आहे असें मला भासलें. कांहीं वेळ तशीच उभी राहिल्यावर अन्नपूर्णाबाई भांडारकर माझ्यामागें बसल्या होत्या, त्यांच्या हें लक्षांत येऊन त्यांनीं मला हळूच डवचलें व हळूच म्हणाल्या, "रमाबाई, घाबरूं नका. धीर धरून सावकाश वाचा. सगळे लोक तुमच्याकडे पहात आहेत बघा." हें ऐकून मी एकदम भानावर आलें आणि कसा तरी मनाचा धडा करून वाचावयास आरंभ केला व शेवट तर लावलाच. पण प्रथम वाटलें होतें, त्यापेक्षां अधिक घाबरलें. असो.

माझ्या दृष्टीनें वाटलेल्या या संकटांतून सुटून मी घरीं आलें व मध्यें थोडा वेळ गेला नाहीं तोंच हिराबागेंत मौजा पाहण्याला आलेली आमच्या घरची आश्रित नी विद्यार्थीमंडळी परत आल्यावर आमच्या घरांतील वडील बायकांना "वहिनीबाईनीं हजार दोनहजार माणसांत खडखडीत इंग्रजींत वाचलें; लाजल्या नाहींत किंवा घाबरल्या नाहींत," वगैरे खूप तिखटमीठ लावून व फुगवून मजकूर सांगितला; पण हा दोन अर्थानीं होता. निंदाव्यंजक शब्द पण भावार्थाच्या आवाजानें. व दुसरे स्तुतिपर शब्द पण हेलनापर निंदाव्यंजक आवाजानें. ह्याबद्दल जसें जसें आमच्या वडील बायकांकडून त्यांना प्रोत्साहन मिळत जाई, तसें तसें ते पुनःपुनः तेंच तें सांगत. आमच्या घरांत बायकांपैकीं सगळ्यांत वडील काय त्या ताईसासूबाईच होत्या. आमच्या सासूबाई वारल्यावर स्वतःला ताईसासूबाईनीं दोनतीन वर्षेंपर्यंत सर्वपरीनें आईसारखें मायेनें वागविलें, त्यामुळें त्यांना आईच्याच ठिकाणीं मानावयाचें असे. त्या कोणाला कांहीं बोलल्या, वेळेवर शिव्या दिल्या, तरी त्यांना कोणींही उलट उत्तर दिलेलें स्वतःला आवडत नसे. इतकेंच नाहीं, त्या स्वतःलासुद्धां कांहीं बोलल्या तरी तें सर्व मुकाट्यानें ऐकून घ्यावयाचें, पण त्यांना उत्तर म्हणून द्यावयाचें नाहीं, असा नियम असे. असें असल्यामुळें त्यांना राग आला म्हणजे त्या वाटेल त्याला वाटेल तसें बोलत व

सर्वजण त्यांना भीत. कोणावर ही गदा केव्हां येईल याचा नियम नसे,व त्याला कारणही लागत नसे. अगदीं क्षुल्लक कारणानें एकदां सुरुवात झाली म्हणजे त्याला सयसुमार रहावयाचा नाहीं. पण त्या मनाच्या भडभड्या असल्यामुळें रागाची वेळ एकदां गेली म्हणजे त्याबद्दल पुनः कांहीं नाहीं. मनांत आढी किंवा कपट न धरतां फिरून आपण होऊन बोलूं लागावयाच्या. म्हणून त्यांच्याबद्दल राग आला तरी तो टिकत नसे.

वर सांगितलेली सभेची हकीकत होतां होतां ताईसासूबाईंच्या कानांवर गेली. त्या ती हकीकत ऐकत असतां वन्सं त्यांच्याजवळ येऊन म्हणाल्या, " ताई, अलीकडे होताहेत या गोष्टी चांगल्या नाहींत बरें ! भाऊंच्या वेळचा अभिमान तुम्हींच राखिला पाहिजे. बायको दुसरी व फजिती तिसरी, हा अनुभव आमच्याच घरीं येऊं पहात आहे. आपल्या माईच नाहींत का ? त्याही दुसऱ्याच होत्या, लाडक्या होत्या; पण परक्या पुरुषाच्या दृष्टीस पडण्याची त्यांची काय ताप होती ? एक दिवस पन्हाळगडावर अंगणामध्यें कारकून पाणी प्यावयास आले. त्या वेळेस आम्ही आंत न जातां तेथेंच उभ्या राहिलों, इतकाच अपराध ! एवढ्याचवरून आमच्या भाऊंनीं या माईशीं चार दिवस भाषण वर्ज केलें होतें. ती कद्र कोणीकडे व हल्लींचा प्रकार कोणीकडे ? जें पहावें तें अधिक आहे. "

झालें. याप्रमाणें ताईसासूबाईंच्या रागांत भर घालून वन्सं देवघरांत गेल्यावर ताईसासूबाईंचा भडिमार सुरू झाला, तो साडेनऊ वाजेपर्यंत चालू होता. त्या दिवशीं **स्वतः**ला घरीं येण्यास बरीच रात्र झाली. घरीं आल्यावर **स्वतः**च्या समक्ष ताईबाई रागानें बोलत होत्या, पण पहिला आवेश मात्र नव्हता. त्या म्हणाल्या " दिवसांदिवस माणसांनीं अब्रू अगदीं सोडून दिली. पहिल्या बायका पुरुषांच्या पुढें उभ्यासुद्धां राहत नसत. मग बोलण्याची गोष्ट कशाला ! पुण्याहवाचनाला मात्र चार माणसांत बायकांना नवऱ्याजवळ बसण्याचा प्रसंग येई, तेव्हां मानेला कळ लागली तरी वर मान करावयास त्यांचा धीर होत नसे ! त्या बायका का लाडक्या नसत ? का त्यांच्यामध्यें प्रेम नसे ? आतांचें प्रेम म्हणजे बायकोनें पदराला पदर बांधून जवळ असावें,खुर्चीला

खुर्ची लावून जवळ बसावें, पुरुषांसारखें लिहावें व वाचावें, येथवर आलें. आजपर्यंत घरांतल्या घरांतच ऐकत होतों, पण आजची त्यावर कडी आहे! एवढ्या हजार दोन हजार मंडळींत बायकोनें इंग्रजी वाचलें त्याची लाज कशी वाटली नाहीं! डोक्यावरचें पागोटें तरी राहिलें कसें? पहिले लोक अब्रूला किती जपत असत, पण आतां ती राहिलीच नाहीं; उलट मोठें आवडलें असेल! त्याच वेळेस उठून पाठ थोपटायची होती, म्हणजे अधिक चांगलें झालें असतें! बायकांना शिकविलें म्हणजे त्या उद्धट होतात, त्यांच्या डोळ्यांत पाणी राहत नाहीं, ही गोष्ट खोटी आहे काय? शिकवावयाचेंच तर व्यंकटेशस्तोत्र, शिवलीलामृत यांसारखें कांहीं वाचतां आलें म्हणजे पुष्कळ झालें. पुरुषांसारखें इंग्रजी शिकून काय चाकरी करावयाची आहे? कोणतीहि गोष्ट मर्यादेच्या बाहेर गेली म्हणजे तिचा परिणाम असाच व्हावयाचा. इंग्रजी शिकविलें म्हणून असें झालें. आतां तरी तें इंग्रजी सोडून द्या. आतांच्या या मुली बोट दिलें म्हणजे हात गिळावयास येतात. त्यांना बेतानें वागविलें नाहीं तर त्या आळ्यांत रहावयाच्या नाहींत. काय बाई तरी! घरांत ती एक शब्द बोलत नाहीं, रागावलों तरी चकारशब्द काढीत नाहीं. किती तरी गरीब दिसते; पण बाहेर पहा तिला इतका कुठला धीटपणा आला तो! ऐकिल्यापासून मला पुनःपुनः नवल वाटतें आहे."

हें सर्व बोलणें जशी कांहीं इंग्रजी शिकण्यानेंच मी उद्धट होऊन **स्वतः**च्या आळ्यांत राहिलें नाहीं, ह्या कामांत **स्वतः**चें अंग नसून उपाय चालला नाहीं म्हणून गप्प बसणें झालें, अशी त्यांची समजूत होऊनच चाललें होतें. त्या बोलत असतांना **स्वतः**ला दोनतीन वेळ हंसूं आलें, पण उत्तर कांहीं दिलें नाहीं. मुकाट्यानें ऐकून घेणें चाललें होतें. हा प्रकार पाहून माझी अतिशय त्रेधा उडाली व रडण्यामुळें मला जेवणहि गेलें नाहीं. ताईसासूबाई बोलत असतांना **स्वतः** कांहींच उत्तर दिलें नाहीं. ह्यामुळें ताईसासूबाईंचा झालेला समज कायम राहून तो आजच्याहून उद्यां जास्त जाचक होईल,

हें मला माहीत होतें म्हणून अधिक भीति वाटली. "तिनें आपण होऊन वाचलें नाहीं. मीं सांगितलें म्हणून वाचलें," इतकें जरी स्वतः म्हटलें असतें, तरी मला पुरें होतें; पण तसें कांहीं झालें नाहीं.

जेवण झाल्यावर रोजच्यासारखें उठून माडीवर जाणें झालें. मींही बऱ्याच वेळानें वर गेलें तेव्हां हंसून म्हटलें " कां ? आजचा सपाटा कसा काय आहे ? हल्ला तर फार जोराचा आहे बुवा. तो फार दिवस त्रास देईलसें वाटतें. पण आपणांला तितकीच उलट तयारी केली पाहिजे. आपण तितक्याच सोशिकपणानें व धिम्मेपणानें हें सर्व सहन केलें पाहिजे, असा आपण निश्चय करूं. त्याचा राग वाढण्याला आपल्याकडून जागाच द्यावयाची नाहीं. त्यांच्या वेळच्या समजुतीप्रमाणें त्या बोलतात, त्यांत त्यांचा दोष नाहीं; पण त्यांना दुखवावयाचें नाहीं, उत्तर द्यावयाचें नाहीं, येवढें तूं कर. त्यांचें वाटेल तसें बोलणें मुकाट्यानें ऐकून घेणें जरा त्रासाचें आहे, हें मी समजतों; पण आज होणाऱ्या त्रासापासून जो सोशिकपणा आपण शिकूं तो आपल्याला जन्मभर उपयोगीं पडेल. एकदां ही संवय लागली म्हणजे आपल्याविरुद्ध कोणी कितीही बोलत असलें, तरी या संवयीनें मनाची उचंबळ होत नाहीं, व त्रास होत नाहीं. तेव्हां कांहीं न बोलतां खरें व योग्य दिसेल तें मात्र करावयाचें, सोडावयाचें नाहीं, हें पक्कें लक्षांत ठेव. ताईचा व अक्काचा स्वभाव कडक आहे, त्याला उपाय नाहीं; अशा माणसांना उत्तर न देणें बरें. मी सुद्धां त्यांचें बोलणें ऐकून घेतों हें तूं पहात नाहींस का ? आतां माझ्यापेक्षां तुला पुष्कळ अधिक त्रास होतो, हें खरें आहे, पण ही इतर मंडळी कितीही बोलली तरी मी तुला आहेंना ? मग इतकें भिण्याचें कारण काय आहे बरें ? थोडें धीरानें वागण्यास शिकावें; तरीही वाईट वाटेल, पण तें थोड्या दिवसांचें आहे, तें कांहीं नेहमीं राहणारें नाहीं," वगैरे वगैरे पुष्कळ तऱ्हेनें माझी समजूत केली.

ह्यापुढें असेच प्रसंग वारंवार येत गेल्यामुळें वडील बायका कितीही बोलल्या तरी तें सर्व सोसून, स्वतःला आवडत असत त्याच गोष्टी करण्याचा

मीं क्रम ठेविला. तरीही माझ्याकडून एकदोन गोष्टींत चुका झाल्यामुळें मला स्वतःजवळ माफी मागावी लागली व पुरती अद्दल घडली.

## भाग दहावा.

# स्वारी दुसरी, १८८२–१८८३.

सन १८८२ सालीं दसरा झाल्यावर आम्ही सातारा जिल्ह्यांत फिरावयास गेलों. या वेळीं मलाही स्वारींत बरोबर नेलें होतें, हें वेगळें सांगावयास नकोच. या वेळीं आमचेबरोबर पांचसात शिपाई, पांचसात कारकून, शिरस्तेदार, दोघे स्वयंपाकी, एक वरकामाचा ब्राह्मण, एक माझी बाई, गडी, हमाल, गाडीवाले मिळून पस्तीस चाळीस माणसें होतीं. शिवाय, सात बैल-गाड्या, दोन तंबू व एक घोड्याची गाडी, इतकें खटलें असे. हा प्रवास आम्हां दोघांनाही फार आवडे. याचें कारण भिन्न भिन्न स्थळें, भिन्न हवा, भिन्न पाणी, भिन्न देखावे यांमुळें नेहमीं मन उल्हासित व सुप्रसन्न राही. त्यांत पुण्यापेक्षां प्रवासांत स्वतःची प्रकृति व विशेषतः डोळे फार चांगले राहत, त्यायोगानें सर्वपरी मनाला सुख व समाधान असे. प्रवासांत होतों तरी नित्याच्या कामांत व क्रमांत अंतर पडावयाचें नाहींच. तें सर्व दोरीसूत चालावयाचेंच. आदले दिवशीं मुक्काम नेमला असेल तेथें सकाळीं आठनऊ वाजतां जाऊन उतरावयाचें. घोड्याचे गाडींत आम्ही उभयतां, एक शिपाई व कोचमन, आणि त्या गाडींत सामान म्हटलें म्हणजे गादी, तक्या, दोन दप्तरें, दऊत, फराळाचा डबा व पाण्याची सुरई, इतकें नेहमीं बरोबर असे. मुक्कामाच्या जागीं उतरल्याबरोबर, शिपायाचें काम म्हटलें म्हणजे जवळपास झाडांची गर्द छाया असेल तेथें गादी, तक्या, दऊत, दप्तर, मांडून 'बसा-वयाची जागा तयार आहे' अशी येऊन वर्दी द्यावयाची. तोंपर्यंत स्वतः गाडींतून उतरल्याबरोबर मुखमार्जनादि प्रातर्विधि उरकून उतरलेलें ठिकाण आजूबाजूनें मोकळें व कोरडें आहे, पिण्याचें पाणी वहातें व स्वच्छ आहे,

असें स्वतः पाहून मग इकडे येऊन कामाला सुरवात होई. बैलगाड्या आधींच थोडा वेळ आलेल्या असत, किंवा त्यांची मुक्कामावर गांठ पडे. मी गाडींतून उतरल्याबरोबर बैलगाडींतील भांड्यांचे व साहित्याचे पेटारे काढवून घेऊन जेथें स्वयंपाक करावयाचा असेल, ती जागा बाईकडून झाडून व सडा घालवून स्वच्छ करावी, व मग भांडींकुंडीं व साहित्य काढून मोकळी झाल्यावर सांजा व तोंडी लावणें करून जिकडे बसणें झालें असेल तिकडे घेऊन जाई. हा वेळपर्यंत आमच्या घरांत कोणालाच-बायकापुरुषांना चहाची संवय नव्हती. त्यामुळें वाटेंत असलें म्हणजे स्वयंपाकाला उशीर असेल त्या दिवशीं सांजा किंवा पुरी असें कांहीं ताजें फराळाचें करून द्यावें लागे. केलेला जिन्नस चांगला झालेला असला व भूकही लागलेली असली, तरी नेहमींसारखे चारपांचच घास खावयाचे, अधिक खावयाचे नाहींत; पण यापूर्वीं बरोबरच्या कारकून मंडळींना कांहीं दिलेंस का, अशी चौकशी होई. मीं नाहीं म्हटलें तर त्यांना आधीं कांहीं तरी दे, असें सांगावयाचेंच. याकरितां त्यांच्यासाठीं लाडू, फोडणीचे पोहे वगैरे कांहीं तरी फराळाचें करून ठेवावें लागे. स्वतःचा फराळ झाल्यावर पुनः कामाला सुरवात होई. बराच वेळ एकसारखी खालीं मान घालून लिहिणें चाललें असलें, म्हणजे मध्येंच विश्रांतीसाठीं चारदोन मिनिटें मान वर होई. तेव्हां समोरच्या डोंगराकडे अगर नदी किंवा झाडी जें काय जवळपास असेल तिकडे सहज लक्ष जाऊन क्षणभर चेहरा गंभीर होई व लागलेंच आनंद झाल्यासारखें होऊन त्या भरांत एखाद्या श्लोकाचा किंवा अभंगाचा चरण आपल्याशींच म्हणण्यांत निमग्न व्हावयाचें. इतकी विश्रांति झाली, कीं, पुरें. मग पुनः कामास सुरवात होई.

मुक्कामास उतरल्यापासून दोन तासांनीं स्नानाला उठावयाचा नियम असे. स्नान व जेवण झाल्यावर त्याच पाटावर बसून सर्व माणसांची पूसतपास व्हावयाची. आदले दिवशीं मला जीं कामें सांगितलीं असतील तीं कशीं व कितपत झालीं आहेत याची चौकशी करावयाची, रोजच्या टपालांत नवीन पत्रें कोणाचीं आलीं तीं पाहून त्यांना उत्तरें काय लिहावयाचीं तें सांगून

"मी जरा विश्रांति घेऊन उठेपर्यंत तूं हीं सर्व पत्रांचीं उत्तरें लिहून ठेव, व मी उठल्यावर मला वाचून दाखीव." असें मला सांगून विश्रांति घेण्याकरितां पडदे लावून जागा तयार केली असेल तेथें स्वतः जाऊन विश्रांति घ्यावयाची. अर्धा, पाऊण, कधीं कधीं एक तास झोंप व्हावयाची. मी तेथेंच उशाशीं पत्रें लिहीत बसें. झोंप झाल्यावर लिहिलेलीं पत्रें वाचून दाखवीं व बंद करून टपालांत टाकण्यासाठीं शिपायापाशीं देई. मग मी रघुवंशांतील नवीन दोन श्लोक काढून ते दोनतीन वेळ जवळ वाचून नीट समजून घेई, म्हणजे ते दुसऱ्या दिवसाला तयार करून ठेवण्यास बरें पडे. इतकें झालें म्हणजे स्वतः चूळ भरून टाकून ऑफिसांत जाणें होई. तिकडे फळें, सुपारी नेऊन दिली, म्हणजे संध्याकाळपर्यंत मला त्या बाजूचें काम नसे. मग मी मराठी वर्तमानपत्रें घेऊन त्याच बिछान्यावर वाचीत पडें, किंवा गांवांतील कोणी बायका आल्या असतील तर त्यांच्याशीं बोलत बसें; किंवा त्यांच्या गांवांत जें कांहीं पहाण्यासारखें असेल तें पाहण्यास त्यांच्याबरोबर जाई.

इकडे स्वतःचे दोनतीन तास सरकारी कामकाज झाल्यावर संध्याकाळीं तालुक्यांतील कामगार, शेटसावकार, मास्तर वगैरे भेटावयास येत. तेव्हां लेखणी खालीं ठेवून दप्तर बांधावयास सांगावयाचें व आलेल्या मंडळीशीं बोलत बसावयाचें. सकाळीं फिरणें पुरतें झालें नसलें, तर त्याच मंडळींना बरोबर घेऊन फिरावयास जावयाचें. स्वतःचें चालणें जरा जोराचें व जलद असे, तेव्हां बरोबर चालण्यास इतर कांहीं तरी टिकत, पण तालुक्याच्या गांवीं येऊन अधिकारानें राजे बनलेल्या व चालण्याच्या मेहनतीची संवय अगदीं मोडून गेलेल्या रावसाहेबद्वयांना स्वतःच्या बरोबर चालणें अगदीं दुरापास्त होई. आपल्याकडून सर्व मंडळी बरोबर चालली, तरी ही रावसाहेबांची दुक्कल मागें रहावयाची. चालतां चालतां मध्येंच स्वतः एखादा प्रश्न विचारला, म्हणजे यांना उत्तर देण्याला किती तरी कष्ट पडत. यामुळें दुसरे दिवशीं सावध होऊन फिरावयास जाण्याची वेळ टाळून मुळींच रात्रीं सात वाजतां भेटावयास येत. मुनसफ, मामलेदार उठून गेल्यावर बाकीची

मंडळी बराच वेळ बसत. त्यांच्याशीं बोलण्यांत, अनेक तऱ्हेची माहिती मिळविण्याचा स्वतःचा उद्देश असे. त्या गांवीं जमिनीचा महसूल किती आहे, सारा कितपत झेपतो, कोणत्या पिकाला तुमची जमीन चांगली आहे, पीक किती आणे पडतें, गांवांतील लोक फुरसतीचा वेळ कसा घालवितात, मोठा व्यापार असा कोणता व कसा चालतो, गांवांत मुख्य देव कोण आहे, त्याला कांहीं कायमचें उत्पन्न आहे कीं नाहीं, तेथें पुराण कोणतें चालतें, विशेष उत्सव कोणता होतो, संध्याकाळीं उद्मी, व्यापारी, शेतकरी व देशमुख, देशपांडे वगैरे सर्व गांवकरी मिळून कांहीं भजनबिजन करतात कीं नाहीं, दिवसभर काम करून थकल्या भागल्या जिवाला ही एक श्रेयस्कर विश्रांतिच आहे व ती अवश्य असावी, अशी, व गांवांत शाळा कशी काय चालते, लोकांचें लक्ष तिकडे कितपत आहे, वगैरे चौकशी व्हावयाची.

याप्रमाणें रोजच्या सहज बोलण्यांत माहिती मिळविण्याचा क्रम असे. मंडळी उठून गेल्यावर संध्याकाळीं जेवावयास बसलें म्हणजे दुपारीं मीं जीं मराठी वर्तमानपत्रें वाचन ठेविलीं असतील त्यांत कशांत काय कम-जास्त असेल तें सर्व तोंडानें सांगावें लागे. तसेंच आज नवल विशेष काय आहे, कोण बायका भेटावयास आल्या होत्या, काय बोलणें झालें वगैरे चौकशी व्हावयाची. मी म्हणें "सांगण्यासारखें बोलणें काय व्हावयाचें आहे ? कांहींतरी इकडलें तिकडलें बोलत होतों, झालें."

मग आपण म्हणावयाचें "हं, बरोबरच आहे! तुम्ही शिकलेल्या, शहरच्या राहणाऱ्या, रोज वर्तमानपत्रें वाचणाऱ्या असा तुम्हांला डौल ! त्या काय बिचाऱ्या खेड्यांतल्या. त्यांना शहरांतील सभा कोठें ठाऊक आहेत ? तुमच्या या डौलाला व आढ्यतेला पाहूनच त्या दिपून जात असतील ? तेव्हां त्या बोलतील तरी काय ?" असें आपणच दोन्ही बाजूंचें कांहीं तरी बोलून उगीच मला लाजवावयाचें, एवढाच काय तो रोख असे. दुसरें कांहीं नाहीं.

असा विनोदांत कांहीं वेळ गेल्यावर निजण्याच्या पूर्वी एक तास कार-कुनांपैकीं कोणीतरी एकजण येऊन दैनिक इंग्रजी वर्तमानपत्रें वाचीत असे.

त्यावेळीं मी स्वतःच्या पायांस तूप चोळीत बसें. कारण, डोळे दुखरे असल्यामुळें दररोज पायाला तूप लावून घेतल्याशिवाय झोंप येत नसे. एखादे वेळेस वाचन नसेल, त्या दिवशीं आम्ही उभयतां बुद्धिबळें खेळत असूं. अशा वेळीं गडी पायांस तूप लावीत असे. सुमारें दहाअकरा वाजतां आम्हीं झोंपी जावयाचें. स्वतःला झोंप जातीची कमी असल्यामुळें चार साडेचार तास झोंप लागली, कीं, पुष्कळ झाली असें वाटे. यासंबंधानें माझें अगदीं उलट असे. मला झोंप फार असल्यामुळें स्वतःची झोंप तीन साडेतीन वाजतां झाल्याबरोबर मला उठविण्यास आरंभ होई. तेव्हां उठण्याचा कंटाळा म्हणून मनांतल्या मनांत राग येई व केव्हां केव्हां त्रास वाटून मी रडकुंडीला येई; पण यापैकीं कांहीं बाहेर दाखवीत नसें व बोलत नसें. तरी स्वतःच्या लक्षांत येई. पण हें आपल्याला समजलें नाहीं असें दाखवून मी उठून नित्यक्रमाला लागेपर्यंत मला जागी करण्याचा क्रम चालावयाचा. मीं एकदां उठून दिवा जवळ घेऊन वाचण्याचें पुस्तक हातांत घेतलें म्हणजे मग अमुक वाच म्हणून सांगावयाचें. याप्रमाणें मी वाचूं लागलें म्हणजे त्यांतील श्लोक, केका, अभंग आपण म्हणूं लागावयाचें, किंवा ऐकत असतां अर्थाकडे मन गढलें म्हणजे तल्लीनतेनें चुटक्या अगर टाळ्यासुद्धां वाजवावयाच्या. एखादा नामदेवाचा प्रेमळ अभंग स्वतःच्या आवडीसारखा आला तर तो मला पुनःपुनः म्हणावयास सांगावयाचें व अभंगाच्या विचारांत मन गढून गेल्यामुळें डोळे मिटून स्वतः डोलूंसुद्धां लागावयाचें, अशी कधीं कधीं स्थिति होई. अशा वेळीं सकाळच्या संधिप्रकाशाच्या शांत उजेडांत हें भक्तिपूर्ण मुख फारच प्रेमळ दिसून माझें मन सद्गदित होई आणि स्वतःबद्दल प्रेम व पूज्यबुद्धि आपोआप वाढे. मी एकटी असलें म्हणजे माझ्या मनांत असें येई, कीं, नुसत्या नात्याच्या किंवा संसाराच्या दृष्टीनें मी इकडे पहातें. पण येथें सामर्थ्य व दैवीभाग जास्त आहे; पण हें वाटणें फार वेळ टिकत नसे. याबद्दल आपण जवळ कांहीं विचारावें व आपल्याला काय वाटतें तें सांगावें, असें मनांत आणून त्या बुद्धीनें मीं वर पाहिलें; व त्याच वेळीं माझ्याकडे

पहाण्याची वेळ आली तर दृष्टादृष्ट होतांच माझे हे सर्व विचार वाळूच्या इमारतीप्रमाणें ढांसळून जावयाचे. मी कांहीं बोलणार होतें हें लक्षांत येऊन स्वतः म्हणावयाचें " कांहीं टीका करावयाचा विचार मनांत घोळत आहे वाटतें ? असेल तर चालूं दे. मग विचार कशाला ? आम्हीं भोळींभाबडीं माणसें ! कांहीं तरी भजन करतों. तुम्हीं इंग्रजी शिकलेल्या बायका, तुम्हांला हें थोडेंच रुचणार आहे !" असें ऐकलें म्हणजे मी लाजून उठून जाई. झालें राहिला बेत. गेलें उद्यांवर. याप्रमाणें नेहमीं चालायचेंच.

प्रत्येक तालुक्याच्या गांवीं आमचा मुक्काम दोन किंवा तीन दिवस होत असे. तेव्हां मुलींच्या शाळेचे मास्तर शाळा पाहावयास येण्याबद्दल आमंत्रण करण्यास येत. त्यांनीं आमंत्रण केल्यावर म्हणावयाचें " हें काम बायकांचें आहे. त्यांस आमंत्रण करा म्हणजे त्या येतील. "

असें ऐकल्यावर ते मजकडे येत व शाळा पाहण्याची वेळ ठरवीत. रात्रीं जेवतेवेळीं विचारावयाचें " आज भेटावयास कोण कोण आले होते ? "

मी म्हणें "कोणी नाहीं. मामलेदारीणबाई व मुन्सफीणबाईच आल्या होत्या. संध्याकाळीं मात्र मुलींच्या शाळेचे मास्तर येऊन आमंत्रण करून गेले."

हें ऐकलें म्हणजे म्हणावयाचें " मग केव्हांचा बेत ठरला ? कांहीं व्याख्यानाची तयारी असेलच ! मलाही मघांशीं कामाच्या धांदलींत कांहीं ऐकल्यासारखें वाटतें खरें; पण तेव्हां लक्षांत आलें नव्हतें. कांहीं रस्त्यानें जाणारे लोक बोलत होते, कीं, येथें भल्या जाड्या विद्वान् बाई आल्या आहेत, त्यांचें उद्यां मुलींच्या शाळेंत व्याख्यान आहे, वगैरे वगैरे कांहीं बोलत होते खरे. आम्हीं आपल्या कामांत. आमचें कोठें लक्ष असतें ? पण ओझरते कानावर आलेले शब्द तुझ्याचबद्दल असतील, असें आतां वाटतें. "

हें बोलणें नवीन ऐकणाराला खरेंच वाटेल, असें गंभीरपणें बोलावयाचें. फुरसतीची वेळ असली म्हणजे थट्टेनें व विनोदानें बोलावयाची संवय असे. मी म्हणे " इतक्या शब्दांपैकीं ' भल्या जाड्या " एवढा शब्द मात्र मला लागू पडतो खरा. बाकी सर्व कल्पनाच आहे. "

दुसरे दिवशीं मी शाळा पाहून आल्यावरसुद्धां ही थट्टा चालावयाचीच. बरें, एखादे गांवीं कांहीं अडचणीमुळें किंवा आळसानें शाळा पाहण्यास गेलें नाहीं, तर लागलाच राग येई व म्हणणें होई "मनुष्य अगत्यानें बोलवावयास येतो, तेथें नुसतें जाऊन पाहण्यास काय होतें ? काय ओझें घ्यावयाचें असतें ? तुमच्या जाण्यानें बोलावणारास मोक्ष थोडाच मिळतो आहे ! आपल्याला अनायासें माहिती मिळते म्हणून जावें. आम्ही बोलतों म्हणजे काय ! नुसतें करमणुकीसाठीं विनोदानें बोलतों. थट्टेच्या बोलण्याचा अर्थ भलता घेऊं नये." अशा तऱ्हेनें सुखासमाधानांत होणारा प्रवास अधिक प्रिय कां होणार नाहीं !

याप्रमाणें आम्हांला तर घरच्याहून प्रवासांत जास्त सुख होई. फिरतां फिरतां आमचा मुक्काम एकदां तासगांवीं पडला. तालुक्याचा गांव असला म्हणजे आमचें राहणें दोन तीन दिवस तरी व्हावयाचें. या वेळीं आम्ही श्रीगणपतीचे धर्मशाळेंत उतरलों होतों. आम्ही उतरून जेवणखाण झाल्यावर दुपारीं डे० ए० इन्स्पेक्टर भेटावयास येऊन म्हणाले कीं, "या तालुक्याच्या आमच्या शाळांच्या परीक्षा नुकत्याच आटपल्या आहेत व याच वेळीं आपला मुक्काम येथें आला आहे. अशी संधि आणूं म्हटलें तरी येणार नाहीं. मुलांच्या व मुलींच्या शाळेचा बक्षिससमारंभ आपला मुक्काम आहे तांपर्यंतच उरकून घेऊं, म्हणजे आपल्या उभयतांच्या हातानें उभय शाळांचीं बक्षिसें दिलीं जातील."

डेप्युटींनीं विनंति केल्यावर त्यांना स्वतः होय म्हणून सांगितलें. मला मात्र रात्रीं सांगितलें, कीं, "आज दुपारीं शाळेचे डेप्युटी आले होते. परवांच्या दिवशीं मुलींच्या शाळेचा बक्षिससमारंभ आहे. बक्षिसें तुझ्या हातून देण्याचा त्यांचा विचार आहे, तेव्हां तुला कांहीं तरी बोलण्याच्या तयारीनें गेलें पाहिजे. नुसतें खुर्चीवर बसवयास जावयाचें नाहीं. हें मी नेहमींसारखें थट्टेनें सांगत नाहीं. नाहीं तर तूं नेहमींसारखें थट्टेवारीच नेशील. तेथें बायका बायकाच आहेत, पुरुष कोणी येणार नाहींत. पण

बायका मात्र पुष्कळ येतील. तेथें तुझी फजिती होऊं नये म्हणून आधीं सांगून ठेवतों. बोलतां येत नसेल तर तुला वाटेल तें लिहून काढ. ”

हें ऐकून मी खरोखर फार घाबरलें, व न झेंपणारें ओझें माझ्या शिरीं दिलें आहे असें होऊन मीं म्हटलें “ मी तरी काय ? मला कोठें इतकी संवय. आतांच माझे हातपाय कांपूं लागले आहेत. मग परवां कसें होईल ? मला गांगरल्यासारखें झालें आहे. काय लिहावें किंवा काय बोलावें हें अगदीं सुचत नाहीं. स्वतः कांहीं सांगितलें तर मी आतां लिहून घेतें. ”

यावर थोडें निक्षून सांगितलें, कीं, “मी कांहीं सांगत नाहीं ? आमचीं आम्हांला काय थोडीं कामें आहेत, तर आम्हीं दुसऱ्याचीं घ्यावींत ! माझ्याकडून लिहून घेऊन तूं तेथें वाचून दाखविणार ? हें मला आवडत नाहीं. आपल्याला जें काय वेडेंवांकडें येईल तेंच लिहून काढावें. त्यांत एखादें वाक्य कमीजास्त करतां येईल. नाहीं तर प्रसंगाला उचित अशीं चार वाक्यें बोलावींत, हें चांगलें. त्यांत बोलावयाचें तें काय असतें ? आतां तुला घाबरल्यासारखें झालें असलें तर पहांटेस लिहून काढ. उद्यांचा सगळा दिवस अवकाश आहे. त्यांत इतकें घाबरावयास काय झालें ? तुम्हीं बायका बायकाच असलां म्हणजे किती तरी टकळी सुरू असते ? तसेंच येथें बायकांतच बोलावयाचें आहे. जीं काय चार वाक्यें बोलावयाचीं तीं नीट व्यवस्थेनें बोल, म्हणजे झालें. ” अशा रीतीनें पुष्कळ सांगितलें.

दुसरा दिवस माझा विचारांत व काळजींत गेला. पण काय लिहावें तो निश्चय झाला नाहीं. बक्षिससमारंभाची जागा तासगांवकर ताईसाहेब यांचे दिवाणखान्यांत केली होती. त्या व गांवांतील पन्नासपाऊणशें बायका हजर होत्या. नेमलेल्या वेळीं मी तेथें गेलें. मुलींनीं कांहीं कविता म्हटल्या व मास्तरांनीं रिपोर्ट वाचल्यावर मुलींना उपदेशपर दोन शब्द सांगण्याची माझी वेळ आली. मी उठून उभी तर राहिलेंच; पण दम लागल्यासारखें होऊन हातपाय कांपूं लागले. अशी स्थिति दोनतीन मिनिटें झाली, तरीही मीं बोलावयास सुरवात केली व कोण जाणें कसें झालें तें पांचपंचवीस

वाक्यें मी झपाट्यानें व न अडखळतां बोलून गेलें खरी. सभेंत उभें राहून प्रमुखपणानें बोलण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होता. हा समारंभ तेथील बायकांना फार आवडलासें दिसलें. कारण पुढें आमचा मुक्काम तेथें दोन दिवस होता, तेवढ्या वेळांत बऱ्याच बायकांनीं आपल्या घरीं हळदी-कुंकवाला येण्याचा मला आग्रह केला व दोन्ही दिवस बहुतेक बायका आमच्या घरींच बसावयास येत असत. एक वेळ कांहीं करण्याकरितां स्वतः आंत यावयाचें होतें; पण बऱ्याच बायका बसलेल्या असल्यामुळें तसेंच परत जाणें झालें. माझी थट्टा करण्याला स्वतःला हें एक साधन मिळालें, व म्हटलें, "आतां या शिष्यिणी तुला आमच्याबरोबर येऊं देतात कीं नाहीं याची मला भीति पडली आहे! बायकांचें म्हणजे हें असें आहे."

समारंभाच्या दिवशीं मी घरीं आल्यावर "आज कसें काय झालें?" म्हणून पुष्कळ वेळां विचारलें. पण मीं कांहीं सांगितलें नाहीं. इतकें मात्र म्हटलें, कीं, "बायकांचें कांहीं का असेना, त्याची चवकशी पुरुषांना कां असावी? फजिती होईल असें भविष्य केलें होतें, त्याप्रमाणें झाली असेल. कांहीं सांगितल्याशिकविल्यावांचून आपलें वेडें माणूस चार माणसांत पाठविलें तर असेंच व्हावयाचें दुसरें काय?"

हें ऐकून बरें वाटलें नाहीं. थोडी काळजी वाटली असावी असें दिसलें व पुढें दुसरें कांहींच बोलणें झालें नाहीं, तरी पण झोंप लागण्याच्या पूर्वी राहवेना म्हणून मला पुनः पुनः खोदून विचारलें, "तूं काय बोललीस तें नीट सांग. एकदां सर्व ऐकेपर्यंत मनुष्याला काळजी असते. तुला एखादी गोष्ट जबाबदारीनें कितपत करतां येते, एवढेंच पहावयाचें. त्यांत थट्टेचा भाग नाहीं."

असें ऐकल्यावर लागलींच मी काय बोललें होतें तें आठवलें तितकें सांगितलें. यांत केळीचें उदाहरण सांगितलें. आपल्या लोकांत स्त्रीशिक्षणा-विरुद्ध जो आक्षेप घेण्यांत येतो, त्यांत ते अशी गोष्ट पुढें आणतात, कीं, बायका शिकल्या म्हणजे दांडग्या, बेपर्वा व मर्यादारहित होतील. या

करितां मुलींनो, तुम्हीं शिकलेल्या मुलींनीं तर या आक्षेपाला जागाच देतां कामा नये. मनुष्यानें उद्धट व्हावें हा सुशिक्षणाचा परिणाम खचित नव्हे. सुशिक्षणाचा व संपत्तीचा परिणाम म्हणजे मनुष्याला विनयसंपन्न व नम्र करावयाचा असाच असतो. याला उदाहरण, साधारण सर्वांना समजणारें आपण केळीचें घेऊं या. केळीचें वैभव म्हणजे तिला अतिशय मोठा लोंगर येणें हें होय. असें वैभव प्राप्त झालें असतां ती कधीं ताठत नाहीं, उलट अधिक नम्र व विनयशील दिसते व यामुळेंच ती अतिशय शोभते. यावरून आपल्याला इतकाच बोध घ्यावयाचा, कीं, विद्या, संपत्ति, अधिकार यांसारखें कोणतेंही वैभव प्राप्त झालें असतां आपण अधिक नम्र व विनयशील होऊन आपल्या पतीशीं व वडील माणसांशीं आदरानें व आज्ञाधारकपणानें वागावें त्यांत आपलें कल्याण आहे. वगैरे वगैरे हें सर्व नटिपणें ऐकून घेतल्यावर संतोष वाटला असें दिसलें. उत्तर मात्र कांहीं दिलें नाहीं.

या खेपेस परत येतांना वाईस जाऊन तसेंच महाबळेश्वरीं जाऊन परत आलों. महाबळेश्वरीं आठ दिवस राहून पाहण्यासारखीं स्थळें (निरनिराळे पॉइंट्स) पाहून घेतले व प्रतापगडास जाऊन तेथील किल्ला, व अफझुलखानास शिवाजीनें मारलेलें ठिकाण व देवीचें देऊळ पाहिलें.

---

## भाग अकरावा.

# एक विद्यार्थी.

आमच्या घरीं आज सुमारें तीसचाळीस वर्षें नेहमीं चारपांच तरी विद्यार्थी त्यांचा सर्व खर्च चालवून बाळगलेले असत. दुसऱ्या अनेक धर्मापेक्षां विद्यार्थ्यांना धर्म करणें स्वतःला मनापासून आवडत असे, म्हणून ह्या दिशेनें धर्म जास्त जास्त होई. हे घरांत राहिलेले विद्यार्थी आपला अभ्यास संभाळून भाजी आणणें, जमाखर्च ठेवणें, वाणी, कापडवाला व दाणेवाला ह्यांच्या दुकानांतून आम्ही सांगूं तो माल आणून

देणें, हीं कामें करीत असत. त्यांच्यापैकीं जो हुषार व जाणता असेल, त्याच्याकडून कीर्द लिहिण्याचें व बिलें चुकविण्याचें काम करून घेण्यांत येई. ह्याप्रमाणें वेळच्यावेळीं जमाखर्च लिहिण्याची स्वतःची ताकीद असे. त्याप्रमाणें कोणताही माल उधार आणावयाचा नाहीं, असा नियम असे. शेंदोनशें रुपयांचा माल आणला असला तर त्याची चौकशी होईपर्यंत आठपंधरा दिवस कदाचित् देणें राहिलें तर महिन्या-अखेर तरी त्याचे पैसे चुकते करून पावती घेतली पाहिजे, अशीही ताकीद असे. याप्रमाणें सर्व व्यवस्था आमच्या वन्सं पहात.

त्या वेळच्या विद्यार्थ्यांपैकीं भट या आडनांवाचा एक कोंकणचा मुलगा होता. तो लिहिण्यांत हुषार असून त्याचें मोडी अक्षर चांगलें असल्यामुळें त्याच्याकडे जमाखर्चाचें काम सोंपविलें होतें. दर महिन्याचे दहा तार-खेच्या आंत नोकर लोकांचे पगार व व्यापारी वगैरे लोकांचीं बिलें चुक-विण्याची चाल असे. अलीकडे कधीं कधीं नोकरांना पगार दिला, कीं, व्यापाऱ्यांचे पैसेही त्याच्याच हातीं पाठवून देत. तेणेंकरून एकेच दिवशीं जमाखर्च लिहिणें सोईचें होई. कांहीं दिवस असा क्रम चालल्यानें सदर मुलाला लबाडी करण्याची वासना झाली. बिलें चुकविण्याचें व जमाखर्च लिहिण्याचें हीं दोन्ही कामें त्याच्या हातांत असल्यामुळें लबाडी जिर-विण्यास त्याला चांगली संधि मिळाली. सदर भटानें सुमारें दोन महि-न्यांच्या बिलाचे पैसे घरांतून उचलून वहीस खर्ची घालून ज्याचे त्यास न देतां ते वाईट कामाकडे खर्चून टाकिले.

हें कृत्य उघडकीस येण्यास असें कारण झालें, कीं, एके दिवशीं आमच्या वन्संनीं पावशेर काजू वाण्याकडून आणविले. तो ते घेऊन आल्यावर त्याला सहज म्हणाल्या "या काजूशिवाय आमचें पूर्वीचें कांहीं देणें राहिलें नाहींना! एवढेंच उधार आहे."

हें ऐकून वाणी आश्चर्यानें म्हणाला "काय? तुम्हीं पैसे पाठविले होते कीं, काय? मला तर गेल्या दोन महिन्यांचे पैसे मिळावयाचे आहेत."

हें ऐकून वन्संना चमत्कारिक वाटून त्या म्हणाल्या "आमचे पैसे कधींच उधार रहात नाहींत,हें तुम्हांला माहीत असून तुम्ही दोन महिने विचारल्या-

वांचून स्वस्थ कसे बसलां ? तुम्ही आपल्या दुकानच्या माणसाजवळ नीट चौकशी करा. "

वाणी निघून गेला तोंच हा मुलगा घरीं आला; तेव्हां वन्संनीं त्याला विचारिलें " तूं वाण्याचे पैसे चुकते केले नाहींस ? "

त्यानें न गोंधळतां एकदम सांगितलें " मीं सगळ्यांचीं बिलें चुकतीं केलीं. "

तेव्हां त्याला अधिक न बिचकवितां तूं आपल्या अभ्यासाला जा, असें वन्संनीं सांगितलें, आणि मुकाट्यानें शिपायाला पाठवून दाणेवाला व कापडवाला यांचे तरी पैसे पोहोंचते झाले किंवा नाहींत, याचा शोध आणविला. तेव्हां कोणालाच पैसे मिळाले नाहींत असें कळल्यावर त्यांनीं शिपायाला सांगितलें, " तूं देवडीवर बैस आणि हरीला कोणत्याही कामाला दरवाज्याबाहेर जाऊं देऊं नकोस. "

तो दिवस दसऱ्याचा होता, म्हणून जेवण झाल्यावर व्यापाऱ्यांना समक्ष बोलावून रुजुवात घ्यावी व मग स्वतःच्या कानावर घालावें, असा वन्संचा विचार होता; पण हरीला त्यांचा संशय येऊन त्यानें पुढील दरवाज्यानें, ' मित्राकडे जावयाचें आहे, पुस्तक आणावयाचें आहे ' वगैरे सबबीवर बाहेर जाण्याचा प्रयत्न केला; पण शिपायांनीं त्याला बाहेर जाऊं दिलें नाहीं. तेव्हां तो मार्केटाकडील भिंतीवरून खासगीवाल्यांचे बागेंत उडी टाकून पळून गेला.

ही बातमी एका विद्यार्थ्यानें येऊन वन्संना सांगितली; पण त्या कांहीं बोलल्या नाहींत म्हणून त्यानें तीच बातमी मला येऊन सांगितली. तें ऐकल्याबरोबर चारपांचशें रुपयांची अफरातफर करून दिवसाढवळ्या मनुष्य भिंतीवरून उडी मारून पळून जातो, व इतकीं माणसें व शिपाई असून त्याला पकडण्यास कोणी जात नाहीं, याबद्दल मला जो राग आला त्या भरांत आज सण आहे, जेवणाच्या आधीं ही बातमी कानावर गेली तर त्रास होईल, जेवण जाणार नाहीं, याचा मला अगदींच विसर पडला व मीं एकदम जवळ जाऊन ही बातमी कळविली. माझ्या ह्या उतावळे-

पणाबद्दल दुसरीकडून मला यथास्थित प्रायश्चित्त मिळालें. स्वतः मात्र मीं सांगितलेलें ऐकून घेतलें व उत्तर दिलें नाहीं खरें, पण मनाला त्रास झाला असावा असें दिसलें. कारण, लिहिण्याचें काम चाललें होतें तें बंद ठेविलें व जेवणाची वेळ झाली म्हणून दप्तर बांधावयास शिपाई वर आला होता त्याला विचारलें " तुम्ही देवडीवर शिपाई असून चोरी करून मुलगा पळून जातो, ही गोष्ट तुम्हांला कळूं नये ? जा त्याच्या पाठीमागें व तो कोठें जात असेल तेथून त्याला धरून आणा, पण त्याला मारूं बिरूं नका हो. " इतकें बोलून जवळ असलेलें पुस्तक वाचावयास घेतलें. मी खालीं स्वयंपाक घरांत गेलें.

शिपाई जो निघाला तो बडबडत " तो कोठें जातो आहे ? मी त्याला धरून आणतों, " असें फुशारकीनें बोलत देवडीवर गेला. ताईसासूबाई व वन्सं देवघरांत होत्या त्यांनीं हें ऐकिलें. तेव्हां त्यांनीं त्या शिपायाला बोलावून विचारलें " अरे, ही बातमी इतक्यांत वर कोणीं कळविली ? "

तो म्हणाला " आम्हांला काय ठाऊक ? वहिनीबाई तेथें होत्या त्यांनीं सांगितलें असेल तर कोण जाणें ? "

इतकें ऐकल्याबरोबर झाली सुरुवात !! वन्सं म्हणाल्या ' बघितलें ताई ? सणावाराची बातमी जेवणाच्या आधीं कळूं नये म्हणून मीं इतका वेळ कळविली नाहीं. नाहीं तर काय ? तो माझा काका मामा होता, कीं, त्याला मुद्दाम कोणीं पळवून लाविलें, म्हणून हिनें ही बातमी इतक्या घाईनें वर जाऊन कळविली ? आमचें का कांहीं नातें नाहीं ? आम्ही कोणी नाहीं ? हीच काय ती हिताची आहे वाटतें ? कानामागून आली आणि तिखट झाली. "

इतकें ऐकल्यावर ताईसासूबाई रागानें उसळून म्हणाल्या " अग बिजवराच्या बायका अशाच चहाडबुचक्या असतात ! ह्या चहाड्या सांगून सांगून मर्जी संपादन करावयाच्या, आजपर्यंत हिला अशी खोड नव्हती ! मी उलट निर्वाळा देत होतें, कीं, ही इतर बिजवरांच्या बायकांसारखी नाहीं; पण लवकरच माझा संशय फिटला म्हणावयाचा ! दिवसेंदिवस

एकेक गुण येत चालला आहे एवढें बरें आहे. इतके दिवस कितीही बोललें तरी राग येत नसे; पण आतां तोही येत चालला आहे! उत्तर देत नाहीं, पण आठरल्यासारखी होते. एकेक होतें आहे तें बरेंच होत आहे. सभेला जाऊं लागल्या आहेत. इंग्रजी शिकत आहेतच! दोनचार म्हाताऱ्या घरांत आहेत, त्या हांकून दे म्हणावें! म्हणजे सुटलीस! मग साहेब आणि मडम हातांत बुकें घेऊन खुर्चीवर बसा म्हणावें! आतांशा पहावें तों दिवसानुदिवस तिला असें वाटूं लागलें आहे, कीं, आपण घरची यजमानीण आहोंत! नोकरचाकरांनीं आपल्याच ताब्यांत वागावें! नफा-नुकसान जें काय होत आहे तें आपलेंच होत आहे! पण तिला म्हणावें कीं, अशी फुशारून जाऊं नको. आम्ही जिवंत आहोंत तोंपर्यंत तुझें कांहीं चालूं देणार नाहीं! अशा चहाड्या करूं लागलीस तर मनुष्यें कोण टिकतील? हरीनें चोरी केली तरी नुकसान आमचेंच झालें! हिच्या बापाला पैसे भरावे लागतील कीं काय? पुनः अशी आग लावलीस तर आपला विचार पहा!" वगैरे अतिशय रागानें मोठमोठ्यानें बोलत देवघरांतून माजघरांत येत होत्या.

त्यांनीं शेवटलीं वाक्यें बोलण्याला व स्वतः खालीं यावयाला एकच गांठ पडून शेवटचीं दोनतीन वाक्यें स्वतः ऐकिलीं. अगोदरच मनाला फार त्रास झाला होता, त्यांत इतक्या तऱ्हेनें त्या मला विनाकारण बोलत आहेत ही गोष्ट समक्ष ऐकल्यामुळें स्वतःला सहन झाली नाहीं व जरा उभें राहून त्यांना म्हटलें "खरें म्हटलें तर ह्या गोष्टी तुम्हींच मला आधीं कळवावयाच्या त्या कळविल्या नाहींत, आणि चोरांचा कैवार घेऊन घरच्याच माणसांस जाचतां कां? ती माझ्याजवळ न सांगेल तर कोणा-जवळ सांगेल?"

हें ऐकल्याबरोबर त्या अतिशय संतापल्या आणि म्हणाल्या "बायकोचा इतका कैवार घ्यावयाला तिला कांहीं कोणीं डागण्या नाहीं लावल्या!! इतकी बायको लाडकी व नाजुक असली तर आपल्या जवळ घेऊन बैस!

नाहीं तर तिला चौरंगावर बसवून देवी म्हणून तिची पूजा कर. इंग्रजी शिकून मोठा शहाणा झालास असें तुला वाटतें, पण कांहीं शहाणपण नाहीं ! आमचा कंटाळा आला असेल तर बायकोचा कैवार घेऊन अपमान करूं नको. त्यापेक्षां घरांतून आम्हांला जायला सांग."

अशा तऱ्हेच्या त्यांच्या ह्या कुभांडी बोलण्यानें व त्राग्यानें स्वतःला कधींच न येणारा राग येऊन एकदम "नको कोणीं म्हटलें आहे ?" इतकें वाक्य तोंडांतून निघून गेलें मात्र, तोंच स्वतःच्या लक्षांत ही चूक झाली असें येतांच, आवाज अगदीं मृदु झाला व चूक सांवरण्याकरितां अगदीं पडतें घेऊन ताईसासूबाईशीं बोलणें सुरू झालें. तऱ्हतऱ्हेनें त्यांना पुष्कळ सांगितलें, कीं, "घरांत आम्हीं सगळयांना वडील काय त्या तुम्हीच आहांत, वाटेल त्याला तुम्ही रागें भरलांत तरी त्यानें ऐकून घेतलें पाहिजे. वेळेवर माझ्या हातून कांहीं चूक झाली तरी माझाही कान धरण्याचा तुम्हाला अधिकार आहे. तुम्ही वाटेल त्याला बोला, पण खरें काय आहे याची निवड करा. आतां घाईत माझ्या तोंडून जो शब्द गेला त्याजबद्दलसुद्धां तुमची मी क्षमा मागतों." असें प्रांजळपणानें शेवटीं सांगितल्यावर मग ताईसासूबाईचा राग थोडा कमी झाला.

आमच्या घराण्यांत बायकामाणसांना मानानें व मर्यादेनें वागविण्याची पहिल्यापासून चाल आहे. त्यांत वडील बायकांना सर्वांनीं मान दिलाच पाहिजे, त्या कांहीं बोलल्या तरी सोसलें पाहिजे, उत्तर देऊन अमर्यादा करावयाची नाहीं, अशी मामंजींची व स्वतःची ताकीद असे. त्यामुळें आमच्या वडील माणसांना अपमानाचा शब्द ऐकण्याची अगदींच संवय नव्हती. त्यांत जिकडून केव्हांही व कोणत्याही बाबतींत वडील माणसांना दुखविण्याचा शब्द यावयाचा नाहीं, त्यांत बायकोच्या संबंधांत तर कोणत्याही तऱ्हेचा उच्चार व्हावयाचा नाहींच अशी त्यांची बालंबाल खात्री होती, तिकडून व बायकोच्या कैवाराचेच निघालेले शब्द ऐकून त्यांना भयंकर अपमान वाटला, यांत आश्चर्य तें काय ? पण वर सांगितल्याप्रमाणें क्षमा मागितल्यावर त्यांचा राग कमी झाला व त्या मोकळया मनाच्या असल्यामुळें कांहीं दिवसांनीं त्यांचा राग अजीबात निघून गेला म्हटलें तरी चालेल.

पण स्वतःच्या मनाला मात्र ही गोष्ट लागून राहिली. जेव्हां जेव्हां त्या प्रसंगाची आठवण होई, तेव्हां तेव्हां वाटे, कीं, याच वेळीं आपण इतके विकारवश कसे झालों ? व आपल्या तोंडून हे शब्द कसे निघाले ? याबद्दल वारंवार पश्चात्ताप वाटे. ताईसासूबाईच्या मृत्यूनंतर चि० आबा-भावोजींना व वन्संना पुण्यास स्वतः जें पत्र लिहिलें, त्यांतही या वर झालेल्या चुकीचा उल्लेख अगदीं कळवळ्यानें केला होता. आमच्या ताईसासूबाई १८९७ सालच्या भाद्रपद मासीं प्लेगनें वारल्या.

## भाग बारावा.

## स्पेशल जज्जाच्या जागेवर बदली, दुसरी स्वारी.

### सुमारें सन १८८३–८४.



पुणें व सातारा या दोन्ही जिल्ह्यांतील सर्व तालुक्यांत जेथें कान्सिलिएटर व गांवमुनसफ असतील, तेथें तेथें स्वतः जाऊन एक अर्धा दिवस राहून त्यांचें दप्तर तपासून पुढें जाणें होत असे. आमच्या पूर्वींचे कामगार याप्रमाणें आपण जातीनें जाऊन त्या लोकांचीं दप्तरें तपाशीतच, असा प्रकार नेहमीं घडत नसे. हा भाग कामगारांच्या मनावर आहे. ते चार दोन दिवस तालुक्याच्या गांवीं मुक्काम करून आसपासच्या गांवमुनसफांना व कान्सिलिएटरांना निरोप पाठवीत, व दप्तरें घेऊन आले म्हणजे दप्तरें तपासून देत. आमच्या वेळेला सवलत न ठेवतां स्वतः खेड्यापाड्यांत उतरण्याचा क्रम ठेवला. त्यामुळें आमची व स्वारींतील सर्व माणसांची गैरसोय होऊं लागली. एकेक दोनदोन दिवस आम्हांला गाईचें किंवा म्हशीचें दूध मिळा-वयाचें नाहीं. भाजीचें तर नांव नको. सात आठ बैलगाड्या व दोन घोडे इतक्यांना पुरेशी वैरणही मिळत नसे. तसेंच गांवांत एकच विहीर असली तर आमच्या तीसचाळीस माणसांना व जनावरांना पाणी मिळण्याची पंचा-

ईत पडे. पूर्वींचे कामगार इतके खेड्यापाड्यांत जातीनें न जातां तालुक्यांत दप्तरें मागवीत, असें कारकून बोलतांना मीं ऐकलें, म्हणून जवळ म्हटलें "तालुक्यावर दप्तर मागवून चालत असेल तर **स्वतः** इतका त्रास कशाला करून घ्यावा ?"

तेव्हां सांगितलें "सरकारनें जी आमची नेमणूक केली आहे ती भत्ता घेऊन चैनीनें फिरण्याकरितां नव्हे. तालुक्यावर दप्तरें मागविलीं म्हणजे त्यांतल्यात्यांत जरा हुषार व लटपटीं माणसें असतात तीं पुढें येतात व आपल्याला हवें असेल तसें चित्र रेखाटून कामगाराच्या पुढें ठेवितात. अशानें शेतकऱ्यांची खरी स्थिति कळत नाहीं व त्यांची खरी खरी स्थिति समजून घेऊन त्यांच्या अडचणी दूर कराव्या हा सरकारचा मुख्य हेतु आहे, तो कांहीं लोकांना कळत नाहीं व उगीच आळस करतात. बाकी, आपण **स्वतः** खेड्यापाड्यांत हिंडलों म्हणजे त्या गांवांतील घरंदाज व वृद्ध माणसांची गांठ पडून आपल्याला हव्या असतात त्या गोष्टी त्यांच्याशीं बोलत असतांना सहज समजतात. अशी स्थिति असल्यानें आपण लहान गांवींही फिरावयास जातों. एरवीं त्रास करून घेण्याची कांहीं आवड आहे काय ? " असो.

---

## भाग तेरावा.
## तपकिरीची डबी हरवली.

याच वर्षी फिरत फिरत आम्ही सातारा जिल्ह्यांत गेलों, त्या दिवशींचा मुक्काम कोरेगांवीं करण्याचें ठरलें होतें. बैलगाड्या रात्रींच पुढें निघून गेल्या होत्या. आम्ही मात्र नित्याप्रमाणें सकाळीं उठून घोड्याच्या गाडींत बसून निघालों. रात्रीं उतरलेल्या मुक्कामीं चांगलें पाणी नसेल तर वाटेंत नदी किंवा चांगला ओढा लागेल तेथें प्रातर्विधि उरकून घेण्याची चाल असे. कोरे-गांवाच्या अलीकडे 'वसना' नदीवर आम्ही सर्वांनीं प्रातर्विधि उरकले.आज उशीर झाला होता म्हणून जवळ असलेल्या डब्यांतून आम्हीं दोघांनीं थोडेंसें

फराळाचें खाऊन बाकी राहिलेलें फराळाचें शिपाई व कोचमन यांच्या स्वाधीन करून " तिकडे जाऊन खा व डबा घांसून आणा, " असें मीं सांगितलें.

इतक्यांत सांगितलें, कीं, " आज उशीर झाल्यामुळें चालणें झालें नाहीं, तर असा थोडा सडकेनें पुढें होतों. तीं माणसें आलीं म्हणजे तूं गाडी जोडवून लवकर ये. "

पुढें जाणें झाल्यावर मी करमणुकीकरितां म्हणून तेथें असलेला घोड्याचा चाबूक हातांत घेऊन जवळच एक आंब्याचें ठेंगणें झाड होतें तेथें गेलें व चाबकानें दोनतीन फटकारे मारले. त्यांत पांचपंचवीस कैऱ्या पडल्या, तेवढ्यानें तृप्ति न होतां आणखी पडाव्यात म्हणून जोरानें जो फटकारा मारला, त्यासरशीं चाबकाचा बारीक शेवट हातांतील छंदाला अडकून चाबकाच्या जोरानें छंदही वर उडून गेलेला लागलीच समजून आला; पण वरून तो कोठें पडला हें दिसलें नाहीं. मीं आणि शिपायांनीं झाडाखालीं आसपास पुष्कळ शोध केला; पण आमचा शोधणाराचाच कीं काय, त्याजवर चुकून पाय पडून तों वाळूंत गेला किंवा झाडावर कोठें अडकून राहिला, काय झालें कोण जाणे ? पुष्कळ शोधला, पण सांपडला नाहीं खरा !

इतक्यांत गाडी तयार होऊन आली. तींत बसून मी पुढें चाललें. आतां जवळ काय सांगावें ? छंद हरवल्याबद्दल काय वाटेल ! आपण आंबे काढण्याचा लोभ धरला हें चांगलें केलें नाहीं, असा पश्चात्ताप पावून भीति वाटली. इतक्यांत एक मैल गाडी आली, तरी स्वतःची गांठ पडली नाहीं. तेव्हां मी घाबरलें व माझ्या वेडेपणामुळें व नादिष्टपणामुळें स्वतःला अशा उन्हाच्या वेळीं कितीतरी चालावें लागलें, याबद्दल मला फार वाईट वाटलें. पण उपयोग काय ? दुसऱ्या मैलावर स्वतःची गांठ पडली व गाडींत बसणें झालें. गाडी चालू झाल्यावर " आज माझ्याकडून एक मोठी चूक झाली आहे, " वगैरे छंदाची हकीकत मीं सांगितली. सर्व ऐकून घेतल्यावर बऱ्याच वेळानें व शांतपणानें म्हटलें " लोकांचे आंबे तूं न विचारतां पाडलेस हें वाईट केलेंस. याबद्दल तुझी

तुला शिक्षा व्हावी व आठवण रहावी, कीं, पुनः असें करूं नये, म्हणून तुझा छंद हरवला आहे. मी त्या छंदाचा शोध करणार नाहीं व पुनः नवाही करणार नाहीं, म्हणजे आठवण राहील. "

हें बोलणें अगदीं नेहमींसारखें चाललें होतें; पण ही गोष्ट आवडली नाहीं, असें मुद्रेवरून दिसत असल्यामुळें हें साधें भासणारें बोलणें मला शिक्षेसारखें वाटलें. जास्त राग येण्यास जागा होऊं नये, म्हणून मी तो सर्व दिवस आपलें नित्याचें काम न चुकतां खिन्न मनानें करीत होतें. रात्रीं जेवावयास बसल्यावर नेहमींसारखें पण ब्राह्मणाला हांक मारून म्हटलें " बजाबा, आज सकाळच्या पाऊणशें रुपयांचें लोणचें वाढावयास तरी आण ! "

तो बिचारा काय आणील ! येवढेंसें तोंड करून उगीच उभा राहिला. लोणचें केलें होतें कोणी ? कैऱ्या सकाळपासून जागच्याजागीं पडल्या होत्या. सकाळपासून त्या आंब्यांकडे नुसतें पहाणें देखील शिक्षेप्रमाणें वाटे. कोणीच कांहीं बोलत नाहीं व लोणचेंही कोणी आणीत नाहीं, हें पाहून मला सांगितलें, " दुसऱ्या गोष्टी ध्यानांत ठेवाव्या, पण छंद हरवला यांत इतकें खिन्न होण्याचें कारण नाहीं. माझ्याकडूनही आज तुझ्यासारखीच गोष्ट घडून आली आहे. आज दुपारीं माझी तपकिरीची डबी कोठें पडून हरवली. माझा एक जिन्नस हरवला व तुझा एक जिन्नस हरवला. तूं म्हणशील ती जस्ताचीच होती, तिची किंमत काय ! ! किंमतीचा विचार या वेळीं न करतां उपयोगाचे दृष्टीनें माझा जिन्नस जास्त होता; कारण, त्यावांचून अडेल. जिन्नस हरवणें म्हणजे सावधपणा व हुषारी कमी, एवढाच दोष येतो. तो न येण्यास जपावें हें बरें. पण त्यावांचून सगळा दिवस इतकें खिन्न कां व्हावें ! हंसून खेळून समाधानानें रहावें म्हणजे दुसऱ्यालाहि बरें वाटतें."

झालें. यावर पुनः त्या हरवलेल्या जिनसाबद्दल नांवही काढलें नाहीं.

---

## भाग चवदावा.

# अनसूयाबाईंचें पुराण.

याच सुमाराला पुढें अनसूयाबाई नांवाच्या संस्कृतज्ञ पुराणिकबाई पुण्यास आल्या. बरोबर त्यांचे पति व वृद्ध वडील होते. ह्याही पंडिता रमाबाईसारख्याच श्रीमद्भागवत वाचीत व पुराणिकासारखें सर्व देऊळभर ऐकावयास जाईल असें गळयावर संहिता वाचून अर्थ सांगत. आमच्या घरीं व दुसऱ्या बऱ्याच ठिकाणीं त्यांचें पुराण झालें व एके दिवशीं जोशांच्या अगर बायकांच्या विष्णुमंदिरांत त्यांचें पुराण ठरलें. त्या वेळीं देवळांतील नेहमीं येणाऱ्या बायकांनीं असा कट केला, कीं, ' या सुधारकांच्या बायकांना आज आपण बसावयास जागा द्यावयाची नाहीं. सभामंडपांतील तेवढी जागा राखून ठेवून गाभाऱ्याच्या पुढील जागा आपण धरून बसूं या, म्हणजे त्यांना मंडपामध्यें पुरुषांच्या शेजारींच जाऊन बसावें लागेल. ह्या सभेला जातात तेव्हां पुरुषांच्या खुर्च्यांना खुर्च्या लावून बसतात; मग येथेंच तेवढी वेगळी जागा कशाला पाहिजे ? '

हा त्यांचा बेत माझ्या एकदोघी मैत्रिणी होत्या त्यांजकडून मला कळला. जुन्या व नव्या प्रकारच्या बायकांशीं मी मिळूनमिसळून राहण्याचा प्रयत्न करीत असल्यामुळें दोहींकडे माझ्या मैत्रिणी व परिचित बायका पुष्कळ होत्या. तेव्हां देवळांतील बायकांनीं आम्हांला अशा वेगळ्या टाकण्याचा बेत केलेला मला आवडला नाहीं. त्याबद्दल वाईट वाटलें व अपमानही वाटला. तास दोन तास आधीं जर ही गोष्ट कळली असती, तर हा सर्व बेत ढांसळविला असता; पण तसा वेळ मिळाला नाहीं. आधींच मला देवळांत जाण्याला उशीर झाला होता. तेथें गेल्यावर मला हें सर्व कळलें; पण देऊळ गच्च भरून गेल्यामुळें कांहीं उपाय नव्हता. म्हणून पंडिता रमाबाई व आमच्या दुसऱ्या बायका बसल्या होत्या त्यांमध्यें

नाखुषीनें मीही जाऊन बसलें. पण मनाला चैन पडेना. त्यांच्यांतून घरीं उठून जावें असा विचार मनांत घोळत होता. सभामंडपांत एका बाजूला सुधारक व दुसऱ्या बाजूला सुधारकांच्याच बायका बसण्याची जागा करून मध्यें अनसूयाबाईंना बसण्याची जागा केली होती.

पुराणाला आरंभ होऊन दहावीस मिनिटें झाल्यावर लागलीच मीं पंडिता रमाबाईच्या कानांत हळूच सांगितलें, "आज मला बरें वाटत नाहीं, घेरी येते, करितां मी घरीं जातें." असें बोलून मी घरीं आलें.

येते वेळीं आपण जें काय केलें तें फार चांगलें केलें, यांत आपला पराक्रम आहे असें मनाला वाटत होतें. या भरांत वर घडलेली हकीकत मीं समोरच ओसरीवर ताईसासूबाई बसल्या होत्या त्यांना सांगितली, कीं, आम्हांला पुरुषांत बसविण्याचा कट करून बाकीची जागा देवळांतल्या बायकांनीं आडविली, म्हणून मला राग आला व मी फार वेळ न बसतां घरीं आलें.

जशी काय मीं केलेली गोष्ट अगदीं चांगली आहे, व ती सर्वांना पसंत पडेलच, अशा खात्रीनें व डौलानें मी बोलत होतें. माझ्या समजुतीप्रमाणें ताईसासूबाईंना ही गोष्ट पसंत पडलीच.त्या शाबासकीच्या स्वरानें म्हणाल्या, "पाहिलेंस, हा असाच तर्क ठेवला पाहिजे, म्हणजे लौकिकांत बरें दिसतें व लोक नांवें ठेवीत नाहींत. या नव्या शिकलेल्या पोरांना कांहीं व्यवहार समजत नाहीं. काय हवें तें करायाला सांगतात. म्हणून तें सगळें करून आपलें कसें चालेल? घरच्या पुरुषांना राग आला तरी दोन दिवसांनीं जाईल. त्याचा काय बोभाटा आहे? पुरुषांचा रागावण्याचा स्वभावच असतो. घरचादारचा सगळा राग काय तो बायकोवर काढण्यांत त्यांना पराक्रम वाटतो." वगैरे आणखी असे पुष्कळ शब्द वापरून अशाच गोष्टी करण्याला मला उत्तेजन येण्यासारखें माझ्या कैवाराचें व मायेचें बोलल्या, तें ऐकून मला फार आनंद झाला.

पण हा आनंद पुरता तास दोन तासही टिकला नाहीं; इतकेंच नाहीं; पण अशी चूक पुनः करण्याचा धीटपणा माझ्याकडून पुढें कधींच झाला नाहीं.

संध्याकाळीं **स्वतः** घरीं आल्यावर मी नेहमींसारखे कपडे घेण्यास पुढें गेलें, तेव्हां मला पाहिल्याबरोबर विचारलें "तुला आज काय होत आहे ?"

मी साहजिक म्हणून गेलें " कांहीं नाहीं. "

कांहीं होत नाहीं, इतकें बोलून गेल्यावर आज देवळांतून निमित्त करून घरीं उठून आल्याची मला आठवण झाली. मी आपल्या आपल्याशींच गोंधळून गेलें व आतां त्याबद्दल पुन्हा विचारलें तर मी काय सांगूं! एक बरें झालें, कीं, मला त्या वेळीं कांहींच विचारलें नाहीं व मजबरोबर भाषणही केलें नाहीं. कपडे घेण्याकरितां मी नेहमींसारखी पुढें उभी होतें, पण ते माझ्या हातांत न देतां आपण उठून खुंटीवर ठेवले. मी बूट काढावयास खालीं वांकलें, तों माझे हात मुकाट्यानें पलीकडे सारून देऊन आपले बूट आपणच काढले. मी आणखी दहापंधरा मिनिटें तशीच उभी राहिलें, पण नेहमींसारखें कांहीं बोलणें विचारणें झालें नाहीं. हें पाहून मी मनांत चरकलें व इतका वेळ ज्या घमेंडींत होतें ती सर्व विरघळून जाऊन जिवाला फार रुखरुख लागली, कारण, नेहमींची संवय अशी असे, कीं, बाहेरून आल्याबरोबर निदान दहापांच मिनिटें तरी माझ्याशीं बोलल्यावांचून होत नसे. बाहेरून येते वेळीं कोणी मंडळी बरोबर असली तर, किंवा अतिशय जरूरीचें काम असलें तर मात्र त्यांत अंतर पडे; पण तसा कांहीं प्रकार नसून आज हें असें कां? रात्रीं वाढ तेवेळींसुद्धां वाढावयास नेलेला पदार्थ तोंडानें हवा नको म्हणावयाचें त्या जागीं हातानेंच खूण केली. ही गोष्ट दुसऱ्या कोणाच्या लक्षांत आली नाहीं, पण माझ्या मात्र लागलीच आली, व चैन पडेना. मनाला वाटलें-कीं, मीं केलेलें जर आवडलें नाहीं, तर सगळ्यांना कळेल असें उघड तरी रागवायाचें होतें. म्हणजे एकपरी बरें झालें असतें; पण हा 'तोंड दाबून बुक्क्यांचा मार' झाला आहे.

रोजच्यासारखी मी वर गेलें आणि रोजच्याप्रमाणें दक्षिणा प्राईज कमिटीकडून आलेल्या बुकांचा आदले दिवशीं झालेल्या वाचनाचा पुढील भाग वाचूं लागलें. हें वाचन होते वेळीं अशुद्ध वाक्य किंवा शब्द आला तर त्यावर खूण कर, असें म्हणावयाचें असे, पण त्या दिवशीं कांहीं नाहीं. वाचतांना मीं मुद्दाम एकदोन चुका केल्या, तरी लक्ष दिलें नाहीं.

वाचन पुरेसें वाटल्यावर दुसऱ्या बाजूला तोंड फिरवून पांघरूण घेतलें. तेव्हां मीं दिवा दूर ठेवून पुस्तक जाग्यावर ठेवलें. गडी पायाला तूप लावावयाला आला त्याला मीं म्हटलें " आज तूं नको, जा. " असें म्हणून मीच तूप लावूं लागलें. मनांतला हेतु हा, कीं, 'आतां पुरे कर,' एवढें तरी बोलणें होईल! तूप लावूं लागल्यावर लागलीच झोंप लागली; सुमारें अर्ध्या तासानें दुसऱ्या कुशीवर वळतांना " आतां पुरे कर;" असें म्हणून दुसरा पाय द्यावयाचा; पण आज झोंपेंत सुद्धां कशी आठवण राहिली कोण जाणे! कांहीं भाषण केलें नाहीं. फक्त दुसऱ्या कुशीवर वळून लागलीच गाढ झोंपीं गेल्याचें मिष केलें.

हा वेळपर्यंत तूप लावतांना मी मधून मधून पेंगत होतें. पण हें झोंप लागल्याचें मिष व बोलण्याची वेळ गेली, हें माझ्या लक्षांत आल्याबरोबर माझी झोंपबीप पार जाऊन मला अतिशय वाईट वाटलें. मी बराच वेळ रडलेंसुद्धां. " कधींच नाहीं, मग हा असा अबोला कां ? " असें विचारावें व " कांहीं चूक असल्यास एक वेळ क्षमा करावी, " असें मोकळया मनानें म्हणावें, असा मीं आपला आपल्याशीं विचार केला; पण तोंडांतून एक शब्द येईल तर शपथ! मन अगदीं पुष्कळ लीन झालें, तरी लहानपणांतील मानी स्वभावाला अशा रीतीनें तोंडांतून उद्गार काढणें फार जड जातें. या गोष्टीला अनुसरून हजार वेळ बेत केलेला असूनहि तोंडाबाहेर ब्र काढवेना. आतां बोलावेंच, असा निश्चय करून बोलणार, तोंच स्वतःच्या जागेपणाची चळवळ लक्षांत आल्याबरोबर झालेला विचार जागच्याजागीं राही. असें करतां करतां सारी रात्र निघून गेली. दोघांनाही झोंप आली नाहीं. थोडें फटफटल्याबरोबर स्वतः उठून बाहेर जाणें झालें. तेव्हां माझी भारी निराशा झाली व कधींही माहीत नसलेली ही जबरदस्त शिक्षा असह्य होऊन मी खूप रडलें, व डोळयांला गार पाणी लावून व डोळे नीट पुसून उशीर झाला म्हणून चटकन खालीं निघून गेलें खरी, पण खालीं गेल्यावर अगदींच चैन पडेना.

सर्व रात्र गेली पण मी क्षमा मागून मोकळी कां झालें नाहीं ? नसत्या आढ्यतेनें मीं मनाला वेदना लावून घेतली ती कां बरें ? आतां जेवण

होण्याच्या पूर्वीं याबद्दल मन मोकळें करून घेईन तेव्हां मला बरें वाटेल, असा विचार करून मीं रोजच्याप्रमाणें अंग धुवून चटण्या, कोशिंबिरी, ताक वगैरे केलें. पण मी सोंवळ्यांत आहें, तेव्हां जेवणाच्या आधीं मुद्दाम ओंवळी झाल्याखेरीज माझी गांठ कशी पडेल व काय निमित्तानें ओंवळी होऊं, अशी विवंचना पडली. कारण, मी दुपारचें वाढूं लागल्यापासून वन्सं, सासूबाई वगैरे वडील बायका माझ्या हातचें जेऊं लागल्या; पण त्यांची ही अट असे, कीं, मी अंग धुतल्यापासून दुसरी पंगत उठेपर्यंत (वडील बायकांचीं जेवणें होईपर्यंत) माजघर, स्वयंपाकघर व देवघर यांशिवाय कोठेंही जातां कामा नये. हौदाकडे, मागीलदारीं व माडीवर गेलें तर पुनः अंग धुवून सोंवळ्यांत गेलें पाहिजे, एरवीं चालावयाचें नाहीं. या अटीमुळें वरील विवंचना पडली. आतां आंघोळीला खालीं येण्याची वेळ झाली आहे, तेव्हां पोट दुखण्याचें निमित्त करून एकदम ओंवळें व्हावें, ह्याशिवाय दुसरा मार्गच नाहीं, असें मनांत आणून लागलींच मीं घरांत दुसऱ्या नातलग बायका होत्या त्यांना उद्देशून मोठ्यानें म्हटलें, "मला आज जरा बरें वाटत नाहीं; मी थोड्या अवकाशांत येतेंच; पण मी पुनः अंग धुवून येईपर्यंत कोणीतरी पुढें वाढायाला घ्या."

हें ऐकून आमच्या वन्सं रागावल्या व म्हणाल्या "हो, तोंवर दुसऱ्याचें सगळें वाढणें होईल, मग आयत्या वेळीं बाईसाहेब हळुहळू शिक्कामोर्तब करावयाला येतील डौलानें."

ह्या वेळीं इतर बायका हंसूं लागल्या, पण ताईसासूबाई म्हणाल्या "अग, असें कां म्हणतेस? रोज ती सगळेंच वाढीत नाहीं का? ती अशी डौली नाहीं व असें सोंग करावयाची नाहीं. ती आज सकाळपासून सुकल्यासारखी दिसत आहे."

माझें लक्ष पुढल्या गोष्टीकडे असल्यामुळें बायका बोलण्यांत गुंतल्या आहेत, त्यांचें लक्ष इकडे नाहीं, अशी संधि साधून मी सोंवळ्याच्या माडींतून आपल्या माडीवर गेलें. स्वतःची उठण्याची वेळ होऊन दप्तर बांधणें

चाललें होतें. मीं अगदीं जवळ जाऊन म्हटलें, "माझ्या हातून एकदां चूक झाली; मी असें पुनः कधीं करणार नाहीं. काल संध्याकाळपासून मला कसें तें चैन पडत नाहीं."

तेव्हां कांहीं मिनिटें गेल्यावर मला म्हटलें, "पहिल्यांदा अशी वेड्यासारखी वागतेस, त्याचा तुला तर त्रास होतोच, पण मलाही होतो. आपलें माणूस आपल्या धोरणानें वागलें नाहीं तर तें कोणाला बरें आवडेल? एकदां आपल्या माणसाच्या आवडीची दिशा समजली म्हणजे तीच बळकट धरावी, म्हणजे दोघांनाही असा त्रास होणार नाहीं. पुनः असें करूं नको." वगैरे सांगून खालीं आंघोळीला जाणें झालें.

मीही दुसऱ्या जिन्यानें खालीं जाऊन बजाबानें स्वतःकरितां पाणी काढलें होतें तें चटकन् अंगावर घेऊन वाढावयाला लागलें व तो बोभाटा मिटविला.

वाढणें झालें व मागील पंक्तीला वडील बायकांच्या बरोबर माझें जेवण झालें; तरी तो सगळा दिवस माझा उदासपणांतच गेला. स्वतःला न आवडणारी गोष्ट म्हणून पुनः करावयाची नाहीं, असा माझ्या मनानें निश्चय केला. सर्व शिक्षेमध्यें अबोल्यासारखी जबर शिक्षा दुसरी कोणतीच नसेल, असें माझ्या मनानें पक्कें घेतल्यामुळें फिरून तसा प्रसंग मीं शेवटपर्यंत येऊं दिला नाहीं, व आलाही नाहीं.

यापुढें कांहीं दिवसांनीं हिराबागेंत एज्युकेशन कमिशनची सभा भरली. त्या कमिशनपुढें स्त्रीशिक्षणाबद्दल मला व पंडिता रमाबाईंना बोलावयास सांगितलें. पंडिता रमाबाई जात्या विदुषी, बोलण्याची पुष्कळ संवय व सभाधीट असल्यानें त्यांचें भाषण फार उत्तम वठलें; पण माझी मात्र त्या वेळीं धांदल झाली. दहापांच वाक्यें कशींबशीं बोलून एकदांचीं संपविलीं. तरी पण या हिराबागेंतील पहिल्या भाषणापेक्षां या वेळचें भाषण अधिक बरें झालें असावें, असें यासंबंधानें केव्हां केव्हां बोलणें होत असे त्यावरून माझ्या लक्ष्यांत आलें.

हिराबागेंतील या दोन्हींतिन्ही सभांना शहरांतील जुन्या व नव्या अशा बऱ्याच बायका जमत, व मोकळ्या मनानें व हौसेनें एकमेकींशीं वागत,

हें पाहून त्यांच्या परस्परभेटीचे वारंवार प्रसंग जुळवून आणिले, तर या बायका प्रेमानें व एकोप्यानें वागूं लागतील; त्यांचा संकोचितपणा कमी होऊन त्यांस शिक्षणाची गोडी आपोआप लागेल; म्हणून हळदीकुंकवा-सारखे किंवा पार्टीसारखे समारंभ वर्षांतून दोनचार वेळां तरी करावेत; त्याला लागणारा खर्च आपण करावा, लोकांजवळ मागूं नये म्हणजे झालें, असें मला **स्वतः** सांगितलें.

त्याप्रमाणें पुढें कांहीं महिन्यांनीं दोघी चौघी मैत्रिणींनीं 'लेडी रे (त्यावेळच्या गव्हर्नरची बायको) यांना पार्टी दिली. ही पार्टी पुण्यांत बाय-कांची अशी पहिलीच झाली. तींत हिंदुबायकांचे खाण्यापिण्याचे जिन्नस वेगळ्या खोलींत मांडले होते. त्यांत धान्यफराळाचे जिन्नस कांहीं एक नसून फक्त फळफळावळ व मेवामिठाई ठेविली होती, म्हणून हिंदुबायकांना ते फार आवडले, गैर कांहींएक वाटलें नाहीं. तसेंच, युरोपियन व इतर जातींकरितां फळफळावळ व मेवामिठाई असून शिवाय हिंदु तऱ्हेचीं पक्वान्नें करून ठेविलीं होतीं, तीं त्यांना आवडलीं. हिंदु बायकांचा मात्र तेथें उभें राहून चार बायकांत शिष्टाचाराप्रमाणें एखादा जिन्नस थोडासा खाण्यापेक्षां मिठाई व फळें रुमालांत बांधून मुलाकरितां घरीं नेण्याकडे मनाचा ओढा जास्त असे. कारण, त्या दिवशीं मुलें बरोबर आणण्याची मनाई होती. खाणें झाल्यावर हिंदु रिवाजाप्रमाणें पानसुपारी, हळदीकुंकू वगैरे सर्व ठेविलें असल्यामुळें आमच्या बायकांना ही पार्टीची चाल परकी न वाटतां उलट पसंत पडली.

पुढें **स्वतः**ची बदली येथेंच स्मालकाज कोर्टाचे जज्जाचे जागीं झाली. पुढें कांहीं दिवसांनीं हिंदुस्थानच्या फायनॅन्स कमिटीमध्यें **स्वतः**ची नेमणूक होऊन त्याकरितां सिमल्यास जाणें भाग पडलें. त्याप्रमाणें आम्ही सन १८८६ च्या चैत्र महिन्यांत पुण्याहून सिमल्यास जाण्याकरितां निघालों.

---

## भाग पंधरावा.

# फायनॅन्स कमिटीकडे नेमणूक.

## सन १८८६.

## सिमल्याची स्वारी.

आम्हीं पुण्याहून निघून अहमदाबादेस **स्वतः**चे मित्र प्रो० आबासाहेब काथवटे यांचे घरीं पहिला मुक्काम केला. ह्या वेळीं **स्वतः**चे जिवलग मित्र रा. ब. शंकर पांडुरंग पंडित, हे कांहीं सरकारी नाराजीमुळें रिकामे होते. त्यांना सिमल्यास येण्याकरितां **स्वतः** आग्रह करून मुद्दाम आपल्याबरोबर घेतलें होतें. शिवाय, ह्याच वेळीं, भावनगरचे एक श्रीमान् व खानदानीचे नागर गृहस्थ हरिप्रसाद संतुकराम देसाई हे **स्वतः**चे व पंडितांचे मित्र असल्यामुळें सिमला पाहण्याच्या उद्देशानें आपलीं मुलेंमाणसें व नोकरचाकर बरोबर घेऊन भावनगराहून अहमदाबादेस आले व तेथून आम्ही सर्व मिळून पुढें रवाना झालों. आम्ही दोघें, वन्सं, बाबाभाऊजी, बाई, ब्राह्मण व गडी असे तीन नोकर व **स्वतः**चे मित्र रा. ब. पंडित, बाकी देसायांपैकीं भाईसाहेबांचें कुटुंब, दोघी मुली व नोकर बायका इतक्या बायका असून भाईसाहेब, त्यांचे चार मुलगे व एक पदरचा हकीम व आणखी कांहीं जवळचे नातेवाईक व बाकीचे नोकर अशी मंडळी होती.

अहमदाबादेहून निघालों तों दुसरा मुक्काम जयपुरास झाला. जेवणखाण झाल्यावर तेथील प्रसिद्ध म्युझियम पाहण्याकरितां आम्ही सर्वजण गेलों. तेथें अनेक होतकरू कारागीर, संगमरवरी दगडाचीं कामें-म्हणजे देवादिकांच्या फार सुबक मूर्ति, पक्ष्यांचीं व जनावरांचीं चित्रें, चौकोनी, अष्टकोनी, बदामी व वाटोळ्या डब्या व डबे, बूट, वशा, अशीं अनेक तऱ्हेतऱ्हेचीं शिल्पकामें करीत होते. तयार केलेलीं कामें कपाटांतून मांडून ठेविलीं होतीं. पैकीं एक लक्ष्मीनारायणाची मूर्ति लहान, सुबक व गोजिरवाणी असलेली आमच्या

वन्संना फार आवडली, व ती त्यांनीं घेण्याची इच्छा दाखविली म्हणून ती मूर्ति घेऊन दिली. तेथून आम्ही राजवाडा व सरकारी बाग पहावयास गेलों. येतांयेतां पहावयास सांपडला तितका शहराचा भाग पाहून बिऱ्हाडीं आलों, व रात्रीच्या गाडीनें पुढें अंबाल्यास जाण्याकरितां निघालों.

अंबाल्यापावेतों रेल्वे होती. तेथें उतरल्यावर टांग्यांत बसून काल्का येथें गेलों. काल्का येथें 'उडिया गार्डन' नांवाची बाग मोठी पहाण्यासारखी आहे. ती पहाण्याकरितां आम्ही कालिकेस थांबलों. ही वेळ दुपारचे अकराबारा वाजण्याची होती. कादंबरींत एखाद्या बागेचें वर्णन जसें येतें, तसाच या बागेचा देखावा फार मनोरम होता. आधीं आम्ही तीन दिवसांच्या प्रवासांतून त्या बागेंत ऐन उन्हाच्या वेळेस आल्यामुळें आम्हांला तो फुलांनीं व पुष्पांनीं अतिशय गजबजलेला बाग, तो झाडांच्या शीतळ छायेमधून येणारा गार वारा व जागजागीं स्वच्छ पाण्यानें तुडुंब भरलेले हौद, वरून वहात जात असल्यामुळें तें अधिक रमणीय दिसत होतें. त्या सर्वांहून मनाला विशेष आनंदविणारे त्या प्रदेशांतिल निरनिराळ्या रंगाचे, सुंदर बांध्याचे व आकाराचे, मंजुळ बोलणारे व कांहीं कांहीं लहान, चिमणीएवढे पक्षी असून अतिशय उंच व बारीक स्वरांत शीळ घालीत; ती ऐकून त्यांच्या त्या शिळांनीं व मंजूळ किलबिलाटानें आमचे प्रवासांतील सर्व श्रम परिहार होऊन आम्हांला उलट अतिशय आल्हाद वाटला. या बागेंत सर्वांहून अधिक झाड पीयर नांवाच्या फळाचीं होतीं. हीं फळें हिरवीं असून एका बाजूला लाल असल्यामुळें शेंदरी आंब्यासारखीं दिसत होतीं. झाडाला आंब्यासारखींच पुष्कळ पानें असून तें डेरेदार व ठेंगणें असतें. हे दिवस त्या फळाच्या हंगामाचे असल्यामुळें सर्व झाडें फळांनीं ओथंबलेलीं होतीं. जमिनीवर नुसतें उभें राहिलें तरी फळें हातांनीं तोडतां येत असत. झाडाला फळांहून पानें कमी असावींत असें वाटे. हौदाशेजारीं कमानी करून त्यावरून निरनिराळ्या रंगांच्या व वासाच्या फुलांचे वेल सोडले होते. एकंदरींत तो बाग फारच उत्तम व नेहमीं आठवण होण्यासारखा आहे असो;

बाग पाहून आम्ही पुढें निघालों तों रात्रीं सातआठ वाजतां सिमल्यास जाऊन पोहोंचलों. तेथें भाड्यानें जो बंगला घेतला होता, तो आम्हां हिंदु कुटुंबांतील तीसचाळीस मनुष्यांस राहण्यासारखा होता. हा बंगला अर्कीच्या राजाचा असून जुन्या सिमेट्रीजवळ होता. बंगला दुमजली व मोठा असल्यामुळें देसायांच्या व आमच्या कुटुंबांतील मंडळीस पुरेसा होता. या बंगल्याच्या तळघरांत अर्कीवाल्याचा वकील रहात होता.

सिमल्याची हवा फारच उत्तम व पाण्यालाही गोडी चांगली; पण पाणी विपुल नाहीं. वस्तीच्या मानानें तर फारच कमी; त्यामुळें तेथील पहाडी लोक पाहिले ते काथवटींत बसून स्नान करीत व त्याच पाण्यांत सद्रा विजार धुवून काढीत. तिकडील बायकांचा पोषाख म्हणजे एक सुशीची विजार, अंगांत सद्रा व डोक्यावर तीनचार हात लांबीची ओढणी. हाता-पायांत, गळ्यांत व डोक्यांत निरनिराळे चांदीचे, पितळेचे व मण्यांचे दागिने. वेण्या अनेक घालून त्या पाठीवर सोडतात. बर्फ पडूं लागला म्हणजे हे लोक ज्वालामुखीच्या पायथ्याशीं व आसपास रहातात. पुरु-षांचा पोशाख म्हणजे लंगोटी, सद्रा व डोक्याला गुंडाळण्यास चारपांच हात लांबीचें फडकें इतकाच असतो. हे लोक बांध्यानें मजबूत असून रंगानें गोरे व नाजूक असतात. हे लोक बहुतेक हमालीचा किंवा मजु-रीचा धंदा करतात. त्यांच्या जातींत चारपांच किंवा अधिकही सख्या भावांत एक बायको करण्याची चाल आहे. अनुकूल असल्यास आणखी दुसऱ्या बायका केल्या तरी चालतात. नीति व आचार यांचा आपल्या इकडच्यासारखा विधिनिषेध मानण्यांत येत नाहीं.

आम्ही रहात होतों त्या बंगल्याच्या आसपास कुली लोकांची वस्ती बरीच होती. संध्याकाळची वेळ झाली म्हणजे त्यांच्या बायका आमच्या कंपौंडांत बसावयास येत. त्यांच्याशीं सहजीं बोलण्याचालण्यावरून या गोष्टी मला समजल्या. आम्हां दक्षिणी लोकांविषयीं तेथील लोकांना तर नाहींच, पण युरोपियन लोकांना देखील फारशी माहिती नसावी, असें दिसे. संध्याकाळीं

आमच्या बंगल्यांतील आम्ही सर्व मंडळी फिरावयास निघालों म्हणजे घरची दहापंधरा मंडळी, चारपांच नोकर व चारपांच जिनरिक (हात-गाड्या) असत. त्यांचे कुली वीसपंचवीस. जिनरिकेला चार कुली असत. असा मिळून बराच मोठा जमाव होई. आधींच त्या वेळचे सिमल्याचे रस्ते अतिशय अरुंद, वांकडेतिकडे व उंचनीच असे असत. तशांत ही आमची सर्व मंडळी एकदम रस्त्यावर बाहेर आली म्हणजे रस्ता लांबवर भरून जाई; त्यामुळें कोणी नव्या पहाणाऱ्या माणसाला वाटे, कीं, ही कोठच्या तरी राजाची स्वारी असेल. या धोरणानें कोणी साहेबलोक वाटेंत भेटले म्हणजे आमच्या चपराशी (हे तेथीलच होते) लोकांना विचारीत, कीं, "ये कहांका राजा है" त्यावर चपराशी "पूनेका," असें उत्तर देत. नुसतें पुणें या शब्दाला ते ओळखीत नसत. थोडे बुच-कळ्यांत पडून म्हणत "पूने सतारेका राजा?" व त्यांनीं होय म्हट-ल्यावर त्यांस समजलेसें वाटे.

सिमल्यास आमचा मुक्काम चार महिने होता. पण त्यांत आम्हांला कंटाळवाणें असें कधींही वाटलें नाहीं. सकाळचा व दुपारचा वेळ आपापल्या कामांत बांधल्यासारखा जाई. संध्याकाळीं पांच वाजतां बायका पुरुष मिळून कधीं 'जक्को' वर, (हा डोंगर असून यावर जें मारु-तीचें स्थान आहे, तें रामदासस्वामींनीं स्थापन केलें आहे असें सांगतात, व येथून चांदीचा रस ओतल्यासारख्या बर्फाच्छादित हिमालयांत शिख-रांच्या ओळी दिसतात.) कधीं 'कुसुमति' हिलवर व कधीं इकडे तिकडे फिरावयास जात असूं.

संध्याकाळीं फिरून आल्यावर रात्रीं नऊ वाजेपर्यंत **स्वतः**जवळ इंग्रजी वाचण्याचें काम रा० ब० पंडितांकडे होतें, तें काम ते फार प्रेमानें करीत; पण बाहेरून मात्र घटकोघटकीं "आतां पुरे, डोकें दुखावयास लागलें, भूक फार लागली आहे," असें म्हणून वाचन थांबवून हात आंखडून लहान मुलासारखे बसत. हें पाहून **स्वतः**ला हंसूं येई, व समजूत केल्या-सारख्या आर्जवाच्या स्वरानें त्यांना म्हणावयाचें, कीं, "असें काय बरें? तेवढा कॉलम तरी वाचा. मग जेवावयाला उठूं. अजून तुमचा पोरपणा

गेला नाहीं. लहान मुलासारखे अडतां किती ?" म्हटल्यावर पंडितांनीं हंसून मुकाट्यानें वाचावयास घ्यावयाचें. पण थोडा वेळ गेला नाहीं तोंच प्रत्येक वाक्यावर कांहीं तरी टीका करून व चेष्टा करून आपणही हंसावयाचें व स्वतःला हंसण्यास लावावयाचें.

अशा रीतीनें नऊ वाजेपर्यंत चेष्टा, विनोद व वाचन झाल्यावर जेवावयास बसावयाचें. जेवावयास बसलें म्हणून तरी काय ? आधींच त्यांना जेवण जात नसे, त्यामुळें प्रत्येक पदार्थ हातांत घेऊन कधीं चांगला, कधीं वाईट म्हणून हंसून व टीका करून जेवण होईपर्यंत कोणीकडून तरी वेळ काढावयाचा. त्यांच्या मनांतला हेतु हा, कीं, आज आपल्याला जेवण गेलें नाहीं, ही गोष्ट स्वतःच्या लक्षांत येऊं नये. पण हा यांचा प्रयत्न व्यर्थ होई. त्यांना भात फारसा आवडत नसे. पण नियमानें पोळी खावयाची तितकी खाल्ली, कीं, फक्त टिवल्याबाहुल्यांतच वेळ घालवीत. इकडे न बोलतां स्वतःचें लक्ष असे. त्यामुळें यांना जेवण गेलें नसेल त्या दिवशीं सांगावयाचें, कीं, " थांबा, उठूं नका, आज तुम्ही जेवावयाचें तितकें जेवलां नाहींत. पोळी घ्या, नाहीं तर दूध घ्या, मग उठा. "

ऐन वेळेवर आपल्याला पकडलें असें पाहून ते हंसत व म्हणत " तर मग इतका वेळ यत्न उगीच केला. "

एक दिवस त्यांना असेंच जेवण गेलें नाहीं, म्हणून दूध पिण्याचा आग्रह केला. तेव्हां ते म्हणाले, " वहिनीबाईची बाजू सांवरून घेण्याकरितां मी इतका वेळ उगीच बसलों. पण एक जिन्नसही बरा झाला नाहीं, मग खावें काय ? "

तेव्हां मीं मध्येंच म्हटलें "काय काय बिघडलें आहे त्याचें वर्णन तरी करा एकदां, म्हणजे त्यांतही बराच वेळ निघून जाईल ? कोणीकडून वेळ काढावयाचा इतकेंच ना ? आपल्याला जेवण जात नाहीं हें सांगावयाचें नाहा ?"

यावर पंडित म्हणाले " पहा बरें, तुम्ही सांगा म्हणतां म्हणून सांगतों. ह्याबद्दल तुमच्यावर कोणीं रागावलें तर माझ्याकडे कांहीं नाहीं ! काय सांगूं ? कोशिंबिरी आंबट, भाजीला चवच नाहीं, भजीं थोडींशीं बरीं आहेत, पण

तीं तेलकट आहेत, तीं मला खावयाचीं नाहींत. आमटींत कांदा कमी आहे. पोळीला डाग जास्त पडले आहेत, मुरंबा दाट झाला आहे व आंबा उतरला आहे, मग काय खावयाचें आहे!!"

**स्वतः** म्हटलें "मीठ अळणी आहे, मिरचीला तिखट नाहीं एवढेंच कसें विसरलांत? होय. सगळे जिन्नस वाईट झाले आहेत, मला कबूल आहे; पण तुम्ही नुसतें दूधच घ्या." असें म्हटल्यावर ते निरुपायास्तव दूध पिऊन उठले.

आम्ही सिमल्याला जाण्यापूर्वीं रावबहादूर पंडित यांच्यावर विनाकारण सरकारी गहजब झाला होता. हा गहजब म्हणजे साप म्हणून भुई धोपटण्याचा प्रकार होता. पुण्यास ज्या दिवशीं फीमेल हायस्कूल उघडण्याचा समारंभ झाला, त्या दिवशीं श्रीमंत सयाजीराव गायकवाड या समारंभास हजर होते व लीवॉर्नर आदिकरून त्या वेळची अधिकारी मंडळीही हजर होती. श्रीमंत गायकवाड यांना दुसरीकडे जावयाचें असल्यामुळें ते तेथील काम संपण्यापूर्वीं अर्धातास अगोदर उठून गेले. शेवटीं म्हणावयाचें गीत होण्यापूर्वीं ते गेले, ही गोष्ट लीवॉर्नरसाहेबांना नाराज होण्यास कारण झाली पण रा. ब. पंडित हे हायस्कूलच्या पुरस्कर्त्यांपैकीं एक असून त्यांनींच कार्यक्रमास वेळ अधिक लागल्यामुळें कार्यपत्रिकेंतील अगोदरच गीत कमी केलें होतें. ह्यामुळें लीवॉर्नरना अतिशय संताप आला व या गोष्टीच्या मुळाशीं राजद्रोहाचें बीज आहे असें त्यांनीं दीर्घरवानें अकांडतांडव केलें व राईचा पर्वत करून तीनचार दिवसांच्या आंतच रा. ब. पंडितांना सस्पेंड करविलें. रा. ब. पंडितांना व त्यांच्या मित्रत्वानें **स्वतः**ला यामुळें फार त्रास झाला. पंडितांचा स्वभाव जात्याच मानी व तल्लख असल्यामुळें या विनाकारण झालेल्या मानहानीबद्दल त्यांनीं जिवाला फार लावून घेतलें होतें. सतत याच विचारानें त्यांचें डोकें दुखत असे. जेवणाकडे लक्ष नसे व ते उदास दिसत.

ही त्यांची स्थिति **स्वतः**ला माहीत असल्यानें पंडितांचें मन ज्या रीतीनें गुंतेल व रमेल ते उपाय करावयाचे असा क्रम ठेविला होता. दररोज त्यांच्याशीं विनोदानें करमणूक होईल असें वारंवार बोलावयाचें. दुपारीं

दोनतीन वेळ मध्येंच त्यांच्या खोलींत जाऊन बसावयाचें. दहापांच मिनिटें त्यांच्याशीं बोलून पुन: आपल्या कामास लागावयाचें. दोनचार तास त्यांना एकटेच एका विचारांत राहूं द्यावयाचें नाहीं, हा स्वत:चा मुख्य हेतु असे. तिसऱ्या प्रहरचा फराळ व चहा त्यांच्याच खोलींत बसून घ्यावयाचा. फायनॅन्स कमिटीची बैठक असे त्या दिवशीं तिकडे जातांना पंडितांना लिहिण्याचें काम देऊन ठेवावयाचें व संध्याकाळीं घरीं आल्यावर पंडितांनीं लिहिलेल्या अक्षराबद्दल व ओळीच्या सरळपणाबद्दल उगीच कांहीं तरी चेष्टा करून हंसावयाचें व "मी गेल्यापासून तम्हीं काय काय केलें, त्याचा हिशेब द्या," वगैरे म्हणावयाचें. अशा रीतीचें बोलणें केवळ आपल्याला करमणूक वाटण्याकरितांच होत आहे हें पंडित समजून होते, म्हणून तेही आपण उदासीन नाहीं, आनंदांत आहों असें दाखवीत, चेष्टा करीत, हंसत, डोकें दुखत असलें तरी त्यांच्या खोलींत स्वत: गेल्याबरोबर चटकन् हुषारीनें उठून बसून आपल्याला कांहीं होत नाहीं, उगीच आळसानें बसलों होतों असें दाखवीत. आपणाबद्दल स्वत:ला वाईट वाटेल किंवा काळजी वाटेल अशी कोणतीही गोष्ट दृष्टोत्पत्तीस येऊं द्यावयाची नाहीं, असा त्यांचाही प्रयत्न असे.

पंडितांचें मन विशेष रीतीनें कशांत तरी गुंतवावें असा विचार मनांत आणून एक दिवस संध्याकाळीं बोलतां बोलतां माधवराव कुंटे यांची सहज गोष्ट काढली व त्यांच्या धारणाशक्तीबद्दल आणि जबर विद्याव्यासंगाबद्दल खूप वर्णन करून म्हटलें. "आपल्या सर्व मंडळींत कुंट्यांची धारणाशक्ति व स्मरणशक्ति वाखाणण्यासारखी आहे खरी."

हें बोलणें पंडितांना विशेष आवडलें नाहीं, तरी ते कांहीं बोलले नाहींत. तेव्हां विचारलें " कां, कुंट्यांचे गुण तुम्हांला पसंत नाहींत वाटतें ? "

तेव्हां पंडित जरा आवेशानें म्हणाले " त्यांत गुण तो काय आहे ! व पसंत काय असावयाचें ! वय कितीही असलें म्हणून काय झालें ? एकदां निश्चय झाला म्हणजे मनुष्य कोणतीही गोष्ट साध्य करील. आज आपण कांहीं नवीन शिकूं म्हटलें तर आपल्याला नाहीं का व्हावयाचें ? "

तेव्हां स्वतः म्हटलें "मला तूर्त पुष्कळ काम आहे. माझें राहूं दे.पण तुम्ही फ्रेंच शिकतां कां? खरोखर अजूनही तुमच्या मनांत शिकावयाचें असेल तर येथें शिकविणार तयार आहे. तुमची तयारी असल्यास शिका. मात्र ती बाई आहे हो. तिच्या बंगल्यावर रोज तुम्हांला गेलें पाहिजे. ती तुमच्या घरीं येणार नाहीं. ती राहते त्या टेंकडीचें नांव कुसुमती हिल आहे. पहा. तुम्हांला झेंपत असेल तर पत्करा, मी एक आपली सोय दाखविली." पंडित याजवर कांहीं बोलले नाहींत, हंसले मात्र.

नंतर जेवणाची वेळ झाली म्हणून आम्ही सर्व जेवावयास गेलों. सकाळीं उठल्यावर चहा पितेवेळीं पंडितांनीं विचारिलें "खरेंच का कांहीं फ्रेंच शिकायची सोय आहे?"

तेव्हां स्वतः म्हटलें "वा! मग मीं काय तुमची थट्टा केली असें तुम्हांला वाटलें? ही पहा तिच्या नांवाची व पत्त्याची चिठ्ठी माझ्या खिशांत आहे. काल जदुनाथबाबूशीं बोलतांना मला या बाईबद्दल कळलें."

मग दुसरे दिवसापासून पंडित सकाळीं सात ते दहापावेतों त्या बाईच्या घरीं खरोखरीच फ्रेंच शिकावयास जाऊं लागले व स्वतःच्या अनुमाना-प्रमाणें या नवीन व्यासंगामुळें पंडितांच्या मनाचा उदासपणा पुष्कळ कमी दिसूं लागला. शिवाय, त्या वेळचे व्हाइसराय लॉर्ड डफरिन यांच्या भेटीचा दोनचार वेळ योग जमून आल्यामुळें पंडितांच्या मनाचा कांहीं खुलासा होऊन त्यांना अधिक बरें वाटलें, असें दिसलें. असो.

एकंदरींत सिमल्याचे चारी महिने आम्हां सर्वांनाच, त्यांतही विशेषें-करून स्वतःला व शंकररावांना अधिक चांगले गेले, यांत शंका नाहीं.

आम्ही परत आल्यावर "आपल्या सिमल्याच्या प्रवासाचें वर्णन तरी लिही." असें मला स्वतः सांगितलें; पण मला लिहितां येणार नाहीं व जें काय मी लिहीन त्यावर टीका होईल, अशा भीतीनें मीं कांहींच लिहिलें नाहीं. वाटेनें एकदां पंडितांचे देखत स्वतः म्हटलें " तूं सिमल्याचा प्रवास लिहिणार आहेस, पण कुसुमती टेकडीवरच्या मडमेविषयीं कांहीं लिहूं नको हो!"

सिमल्यास चार महिने झाल्यावर फायनॅन्स कमिटी मद्रासेस जावयाची असल्यामुळें आम्हांला मद्रासेस जावयाचें होतें, म्हणून आम्ही परत पुण्यास येण्यास निघालों. प्रथम सिमल्याला जातेवेळीं घाई असल्यानें वाटेंतील प्रसिद्ध तीर्थें व शहरें पाहण्यास अवकाश सांपडला नाहीं, म्हणून परत येतेवेळीं प्रत्येक क्षेत्रीं व शहरीं एकदोन दिवस राहून तीं पाहून यावें म्हणून मुद्दाम तीन वारांची रजा घेतली होती. सिमल्याहून निघून हरि-द्वारास जाण्याकरितां खालीं उतरतांना वाटेंत काल्का व अंबाला यांच्या-मध्यें आम्हांला बरीच रात्र झाली. तेव्हां रस्त्यावरच एक पडवी दिसली; तेथें टांगे उभे करून जवळपास शोध करण्याकरितां एकदोन माणसें गेलीं. त्या पडवींत जाऊन मेणबत्ती लावून आम्हीं इकडे तिकडे पाहिलें तेव्हां तेथें एक ओबडधोबड घडवंचीसारखें बाक होतें, त्यावर आम्ही दोघें व पंडित जाऊन बसलों. पाण्याकडे गेलेल्या माणसास येण्यास अवकाश होता, म्हणून मीं फराळाचे डबे व करंड्या आणण्यास नोकरांस सांगि-तलें व इकडल्या तिकडल्या गोष्टी बोलत बसलों. पंडित म्हणाले " आज तुम्हीं फराळाचें काय केलें आहे? मला फार भूक लागली आहे. "

यावरून थट्टा सुरू झाली व सांगितलें " तुझ्या या निर्जीव पदार्थांनीं यांची भूक धरत नाहीं. "

पंडित हंसून म्हणाले " असें थोडेंसें खरें आहे. निर्जीव सजीवचें जरी कांहीं मानलें नाहीं, तरी या भट्टी जेवणापेक्षां त्या खाण्यांत स्वाद व रुचि जास्त असते, यांत संशय नाहीं. ज्यांनीं कोणीं स्वाद घेतला नाहीं तीं माणसें अभागी, असें मी समजतों! "

त्यावर स्वतः चटकन् उत्तर दिलें " हें तुमचें भाग्य तुम्हांलाच लख-लाभ असो! तसें भाग्य मिळण्याची इच्छा जन्मजन्मांतरीं नको! "

याजवर अशीं थट्टेचीं बरींच बोलणीं झाल्यावर पंडित म्हणाले " या गोष्टी बोलण्याचा इतका कंटाळा आहे, तर विलायतेला जाण्याचा विचार आहे तेव्हां कसें होईल? "

तेव्हां स्वतः म्हटलें “ तें कां ? त्यांच्यामध्येंसुद्धां या पदार्थाला न शिवणारी मंडळी आहेच. पण तो विचार कशाला ? आम्ही आपल्याला दूधभात व पिठलें मिळण्याची सोय करूं तेव्हां निघूं. निदान दूध वेळवर मिळालें नाहीं तर पिठलें भातावर भागवून घेऊं. आम्हांला ते निरनिराळ्या चवीचे पुष्कळ पदार्थ नकोत ! ”

इतकें बोलणें चाललें असतांना पाणी घेऊन मंडळी टांग्यावर आली. आतां फराळाचें काढण्यापूर्वी जागा झाडावी म्हणून पुनः दिवा लावला व झाडण्याकरितां कांहीं आहे का असें इकडे तिकडे नोकर दिवा घेऊन पाहूं लागले. तोंच पंडितांची नजर सहज तिकडे जाऊन ते एकदम हंसून म्हणाले “ अहो, ही नुसती पडवी नसून हें खाटकाचें दुकान आहे!”

स्वतः विचारलें “ हें तुम्ही कशावरून म्हणतां ? ”

“ कशावरून म्हणजे ? हा पहा, धडधडीत ठोकळा आहे. ” असें म्हणून ते हंसूं लागले.

तें ऐकिल्याबरोबर “ येथें कांहीं जिन्नस काढूं नका, ” असें म्हणून एकदम बाहेर जाणें झालें.

मग सडकेपलीकडे उघड्या जागेंत आम्ही फराळास बसलों. शंकररावांना ही संधि मिळाल्यामुळें ते मात्र मधून मधून हंसून थट्टा करून म्हणत “ खाटकाचें दुकान असा नुसता शब्द ऐकून विजेचा धक्का लागल्याप्रमाणें एकदम उठून इकडे आलांत हें काय ? ” वगैरे बोलणीं व चेष्टा करीत असतांना आमचें फराळ झालें. मग आम्ही स्टेशनावर आलों व रात्रीच्या गाडीनें निघून सकाळीं सातआठ वाजतां हरिद्वाराच्या स्टेशनावर म्हणजे सहारणपूर येथें येऊन पोंचलों.

तेथून निघून आम्ही प्रथम हरिद्वारास आलों. त्या वेळीं थेट हरिद्वारापर्यंत आगगाडी झाली नव्हती. आम्हाला रेल्वे सोडल्यावर तेराचौदा कोस टांग्यांतून जावें लागलें. हरिद्वारास आम्ही शिंद्यांच्या ओरींत उतरला. त्या दिवशीं श्रावणी सोमवार होता. ऐन दुपारची वेळ असल्यामुळें

उष्मा फारच होत होता. आमच्या इकडील चैत्रवैशाखासारखे तिकडे आषाढश्रावण हे उकाड्याचे दिवस असतात. ह्या वेळीं उष्णतेनें हिमालयावरील बर्फ वितळून गंगेंत मिळाल्यामुळें तिला पूर येऊन ती भरून फुगून चालली होती व मोठी आल्हाददायक दिसत होती. शिवाय, ह्या वेळीं आम्ही सिमल्याच्या थंडगार हवेंतून नुकतींच खालीं उतरल्यामुळें हिमालयाच्या पायथ्याची उष्णता अतिशय वाटली व तिचा परिणाम स्वतःच्या प्रकृतीवर आम्ही अहमदाबादेस येऊन पोहोंचण्याचे पूर्वींच झाला; तें पुढें येईल.

शिंद्यांच्या ओरींत उतरून सामानसुमान लावल्यावर, मी "कांहीं फराळाचें देऊं का!" असें विचारावयास गेलें. "दूध अद्यापि मिळालें नाहीं, थोडा सांजा करून आणूं का? आज श्रावणी सोमवार आहे. कांहीं मंडळींना निराहार आहे म्हणून स्वयंपाकच उशीरां धरला म्हणजे सगळ्यांचीच सोय होईल," असें मी बोलत होतें. पण ऐकतें कोण, आणि लक्ष ठिकाणावर होतें कोठें! पुरुषमंडळीची बसण्याची जागा लांबच्यालांब सोपेवजा ओरी होती. तिला पांचसहा खिडक्या होत्या व त्या खिडक्यांमध्यें तक्क्यासारखे दगडी कठडे केले होते. खिडक्यांखालींच गंगेचें पात्र असल्यामुळें या भरून चाललेल्या गंगेचें पाणी ओरींतील खिडकींत बसलेल्या माणसांच्या हाताला लागे. अशा खिडक्यांपैकीं एका खिडकींत **स्वतः** बसून व दोन्ही हात गंगेच्या प्रवाहांत सोडून पाण्याशीं सहज खेळणें चाललें होतें. चेहरा गंभीर झाला असून गंगेच्या उगमाच्या बाजूला नजर अगदीं खिळून राहिली होती. मन त्याच विचारांत निमग्न झाल्यामुळें गंगामयच झालें होतें. मधूनमधून चेहऱ्यावर आनंद व उल्हास दिसत होता. अशी ती तल्लीन स्थिति पाहून मी कांहीं मिनिटें **स्वतः**च्या तोंडाकडे पाहत स्वस्थ उभी राहिलें. कारण, मध्यें कांहीं बोलून विक्षेप आणण्यास माझें मन घेईना. इतक्यांत राव ब. पंडित पुढें येऊन म्हणाले "आमची कांहीं खाण्यापिण्याची तजवीज?"

मीं म्हटलें "हाय, मी तेंच विचारण्यास आलें आहे, कीं, दूध अजून मिळालें नाहीं, सांजा करून आणूं का?"

हें आमचें बोलणें चाललें असतां स्वतः मजकडे पाहून म्हटलें "काय आहे, काय म्हणतेस ? "

मीं पहिल्यानें म्हटलें तेंच सांगितलें, तेव्हां म्हटलें, मी कांहीं खात नाहीं, तुमचें होईल तेव्हां होऊं द्या. मला अजून भूक लागली नाहीं. पण या मंडळीची मात्र आधीं सोय कर. यांना भूक निघत नाहीं, असें शंकररावांकडे पाहून हंसून सांगितलें.

ती संधि साधून पंडित मला म्हणाले "वहिनीबाई, कशाला भूक असेल!! तुम्ही तिकडे कामांत होतां, पण येथें आल्यापासून वृत्ति अगदीं गंगामय झाली आहे! मला वाटतें, आतां हरिद्वारींच राहण्याचा बेत होणार आहे! नुसत्या नांवामुळें मनाचा ओढा इतका आहे, मग प्रत्यक्ष महादेवाची किती तरी धांदल उडाली असेल!! "

तेव्हां हंसून सांगितलें "येथें तुम्ही अगदीं चुकलां ! हें तुमच्यावरच येत आहे. कारण, माझं नांव सांभाचें नसून तीन अक्षरी विष्णूचें (माधव) आहे."

तरी शंकरराव तसेच पुढें म्हणाले "पण वहिनीबाई! येथें राहण्याचा बेत झाला तर तुमचें कसें होईल ? "

ह कुसुमती टेंकडीच्या बोलण्याचें उसनें फिटत आहे असें माझ्या लागलेंच ध्यानांत येऊन मीं म्हटलें "काय व्हावयाचें आहे ? माझी काळजी कशाला? कोठेंही राहणें झालें तरी मी जवळ असणारच; मग मला धाक कसला? आम्ही येथें राहिल्यानें तुमचें काम मात्र जास्त वाढेल. रोजचीं वर्तमानपत्रें, बुकें वगैरे पाठविणें, कांहीं खाजगी चळवळी असतील त्या कळविणें, मत विचारणें, हीं सर्व कामें तुम्हांलाच करावीं लागतील. एक पुण्याच्या मंडळींना मात्र अफू तुटल्यासारखें होईल व त्यांना परोपरीनें निरोप सांगण्याचें उद्धवाचें काम तुम्हांलाच करावें लागेल. "

तेव्हां पंडित म्हणाले "कसला उद्धव आणि कसला माधव! पुण्याचे लोक सगळया मुलखाचे भांडखोर ! पण त्यांच्यावर कोण लोभ आहे! पुणें म्हणजे अगदीं जीव कीं प्राण ! पुणें सोडून कोठेंच चैन पडावयाचें नाहीं.

येथें राहून ध्यानस्थ बसावयाचें झालें तरी चिंतन पुण्याचेंच चालेल इतका मनाचा ओढा त्या पुण्याकडे आहे. ”

हें सर्व बोलणें चाललेलें स्वतः हंसून मुकाट्यानें ऐकून घेतलें व मग म्हटलें “ सर्वस्वी नसला तरी तुम्ही म्हणतां तसा थोडासा आरोप तुम्हांला लागू करतां येईल खरा. असो. ”

ह्याप्रमाणें बोलत असतां तेथील क्षेत्रोपाध्याय, शिंद्यांचे वकील वगैरे मंडळी भेटण्यास आली. त्यांच्याशीं बोलणें होऊन दोनतीन वाजतां आमचीं जेवणें झाल्यावर संध्याकाळीं आम्ही सर्व मंडळी कनखल तीर्थ, देवळें आणि गंगोत्री, बद्रिकेदाराकडे जाण्याचा दरवाजा, वगैरे पाहून घरीं परत आलों व रात्रीच्या गाडीनें निघून सकाळीं लाहोरास उतरलों.

सकाळीं लाहोर स्टेशनावर आमची गाडी येऊन पोहोंचली. तेथें लाहोरची मित्रमंडळी आम्हांला उतरून घेण्याकरितां आली होती. त्यांनीं पाहून ठेविलेल्या जागेंत आम्ही उतरलों. लाहोरास स्वतःचें एखादें व्याख्यान व्हावें, असा मंडळींनीं आग्रह केल्यावरून स्वतः तें कबूल केलें व त्याच संध्याकाळीं व्याख्यान झालें. मला भेटण्याकरितां कांहीं पंजाबी बायका आल्या होत्या. त्यांनीं मला आपल्याबरोबर सर्व शहर व सार्वजनिक बाग आणि किल्ला दाखवून संध्याकाळीं परत आणून पोंचविलें. दुसरे दिवशीं कांहीं बायकांच्या आग्रहावरून मी त्यांचे घरीं गेलें. स्वतःलाही मित्रमंडळीकडे पानसुपारी होती. तेथून परत आल्यावर लाहोरचें प्रसिद्ध लांकडी काम, चांदीच्या मुलाम्याचीं उत्तम नक्षी केलेलीं भांडीं, रेशमी आणि कलाबतूच्या कशिद्याचें काम केलेलें तऱ्हेतऱ्हेचें कापड, मुलामुलींचे खेळ वगैरे खरेदी करून पुनः रात्रीच्या गाडीनें निघून दुसरे दिवशीं आम्ही अमृतसरास येऊन पोहोंचलों.

अमृतसर येथें उन्हाळा अतिशयच कडक म्हणजे असह्य वाटला. आगगाडीवरील व रस्त्यावरील हमालाच्या डोक्यावर ओझें असलें तरी एका हातांत पंखा असावयाचाच. उन्हाळा इतका कडक, कीं, काम करतांनासुद्धां एका हातानें वारा घेण्याचें काम चाललेंच पाहिजे,

तरच निभाव. आम्हांला स्टेशनावर उतरून घेण्याकरितां जी मंडळी आली होती, तीच पुढें बिऱ्हाडापावेतों पोहोंचविण्यास आली होती. त्यांनीं आमची उतरण्याची सोय एका मोठ्या सराईत केली होती. तेथें त्यांनीं कोचें, खुर्च्या, फळफळावळ, दूध वगैरेची तयारी आधींच केली होती, शिवाय, तीनचार कुली हातांत पंखे घेऊन उभे होते.

या प्रांतांत पीअर्स नांवाचीं फळें पुष्कळ पिकतात. तीं चवीनें आंबट गोड अशीं मधुर असतात. पोहोंचविण्यास आलेले लोक परत गेल्यावर पंडित व स्वतः थोडें दूध घेऊन व कांहीं फळें खाऊन आपापलीं पुस्तकें उघडून कोचावर स्वस्थ पडले. कुली वारा घालीत होते. माझ्याकरितांही पडदा लावून थोडीशी खोलीसारखी जागा केली होती व एका मित्रानें आपल्या घरची मोलकरीण वारा घालण्याकरितां पाठविली होती. पण त्या मोलकरणीस मीं सांगितलें, कीं, " तूं आतां घरीं जा. तुझें काम नाहीं. माझी बाई मजबरोबर आहे. " असें म्हणून तिच्या हातावर चार आणे टाकल्याबरोबर ती चालती झाली व मलाही जरा बरें वाटलें. कारण सर्व सामानाची व्यवस्था लावून स्वयंपाकाचें सामान काढून घेऊन स्वयंपाक करावयाचा हें आमचें मुख्य काम. पुरुषमंडळींचीं जेवणें झाल्याशिवाय काम टाकून उकडतें म्हणून वारा घेत स्वस्थ पडून रहाणें आम्हां हिंदु-बायकांना कसें रुचणार ! मीं खालीं जाऊन स्वयंपाकाची सर्व तयारी करून दिली. सामानसुमान नीट लावलें व स्वयंपाक होई-पर्यंत तेथेंच बसून राहिलें. पण तेवढ्या वेळांत मला चार वेळ थंड पाण्यानें अंग धुवावें लागलें. तेव्हां कोठें वाढण निभावलें, इतका जब्बर उन्हाळा होता.

आम्ही ज्या सराईत उतरलों होतों ती सराई फारच मोठी होती. सराईच्या दरवाज्यांतून आंत आल्याबरोबर सुमारें पंचवीसतीस हातांवर एक मोठें तळें बांधलेलें होतें. तळ्याच्या तिन्ही बाजूंला मोठमोठे सोपे बांध-लेले असून त्यांवर माड्या बांधल्या होत्या. त्यांत प्रवाशांना उतरण्याची ज्याच्या त्याच्या मानानें सोय केली जाते. प्रथम दरवाज्यांतून आंत

सराईत येतांना दरवाजा मोठा वेशीसारखा असल्यानें त्याच्या आंत दोन्ही बाजूंना दह्यानें भरलेले रांजण, विड्याचीं पानें, फुलें, पंखे, सरबतें व फळें यांचीं दुतर्फा दुकानें लागलेलीं होतीं. बाहेरून येणारा प्रत्येकजण पैशाअधेल्याचें तरी दहीं विकत घेऊन आंत आल्यावर सराईच्या मध्यभागीं असलेल्या मोठ्या तळयांत अंगाला दहीं लावून स्नान करी. असा क्रम सकाळपासून संध्याकाळपर्यंत चालूच असे. याच तळयाचा एक कोंपरा भोंवतालीं उंच चुनेगच्ची भिंती बांधून कुडून घेतला होता व आंत जाण्याला एकच वांकडी वाट ठेविली होती. ही जागा फक्त बायकांनाच स्नान करण्याकरितां ठेविली होती. बायकाही पुरुषांप्रमाणें दहीं विकत घेऊन आंत येत. ह्या लोकांत पडदा कडक असल्यामुळें तोंडावर बुरखा घेतलेल्या त्या तशाच स्नानघरांत जात. मींही पहिलें स्नान त्यांच्या स्नानगृहांत केलें. मी नेसलेल्या लुगड्यासकट स्नानाकरितां पाण्यांत शिरलें, ही गोष्ट तेथें असलेल्या बायकांना बरी वाटली नाहीं. कांहीं बायका हंसल्या. पण मी लक्ष देत नाहीं असें पाहून एकदोन पोक्त बाया मला म्हणाल्या " अग बाई, अंगावर कपडे ठेवून केलेलें स्नान तुला स्वच्छ तरी कसें वाटतें ? आम्ही काय पुरुष आहों ? बायकाबायकांत लाज कसली ? तुमच्या देशांत अशीच चाल आहे काय ? "

मीं म्हटलें " होय, आम्हांला तुमच्यासारखें स्नान करण्याची कधींच संवय नाहीं. " इतकें बोलून मी तेथून निघालें.

या स्नानगृहांत स्नान करणाऱ्या सर्वच बायका एका चालीच्या असल्यामुळें त्यांना त्याचें कांहीं वाटत नसे. पण मला मात्र तसा प्रकार इकडे पहाण्याची संवय नसल्यामुळें फार लाज वाटली.

आमचें दुपारचें जेवण झाल्यावर कांहीं शीख मैत्रिणी भेटावयास आल्या. अमृतसरास जें एक सोन्याचें देऊळ असें म्हणतात, तें कसें आहे हें पाहण्याकरितां मी या बायकांच्या बरोबर गेलें. देवळाला फक्त आंतून सोन्याच्या शाईची वेलबुट्टी व नकशी केली होती. देवळांत विशेष कांहीं दिसलें

नाहीं. म्हाताऱ्या बायका व पुरुष यांची पुराण ऐकण्यासाठीं पुष्कळ गर्दी जमली होती. देवळांत व मुख्य जागीं इतर हिंदुदेवळांप्रमाणें देव, बाण किंवा कोणाची तरी मूर्ति अगर आकार कांहींच नसून मुख्य जागीं एक भव्य चवरंग मांडून त्यावर उंची वेष्टणांत गुंडळलेली एक ग्रंथसाहेबाची पोथी होती. हाच आमचा देव व हाच आमचा धर्मग्रंथ, असें बरोबरच्या बायकांनीं मला सांगितलें.

मग परत येतेवेळीं कांहीं बायकांच्या विशेष आग्रहावरून मी त्यांच्या घरीं गेलें. त्यांच्या चालीरीतीप्रमाणें त्यांनीं हुक्का, सरबत, पानसुपारी वगैरे पाहुणचाराचे पदार्थ माझ्यापुढें आणले. आम्हां दक्षिणी बायकांना पुर्ती रोज विडा खाण्याचीसुद्धां संवय नाहीं, ती या दुसऱ्या पदार्थांची ओळख कोठून असणार! कारण आमच्या पुरुषांतसुद्धां हुक्क्याची माहिती फार क्वचित्, नाहीं म्हटलें तरी चालेल. तेव्हां अर्थात्च मीं हा पाहुणचार नाकारला. मग त्यांच्या चालीप्रमाणें मोठा मान म्हणजे मुख्य यजमानीण-बाईनें आपल्या हातानें चुना लावून पट्टी करून देण्याचा असतो, त्याप्रमाणें मुख्य बाईनीं पट्टी दिली व मीं ती घेतली, व त्यांच्या चालीरीतीबद्दल कांहीं बोलून चालून मी परत बिऱ्हाडीं आलें. त्याच रात्रीं आम्ही अमृत-सराहून निघून दुसरे दिवशीं दिल्लीस येऊन पोहोंचलों.

दिल्लींतही अशाच एका मोठ्या सराईत उतरलों. त्याच सराईत खालच्या मजल्यावर बंगाली यात्रेकरूंचा एक मोठा मेळा उतरला होता. या मेळ्यांत पुरुषांपेक्षां बायका जास्त होत्या. त्यांत कांहीं मुली, कांहीं गरभारशा, कांहीं लेंकुरवाळ्या व कांहीं वृद्ध अशा सर्व तऱ्हेच्या बायका होत्या; पण आश्चर्य हें कीं, सर्वांचे पोषाख एकसारखे दिसत होते. म्हणजे त्या दहा हात लांबी-चीं धोतरें नेसल्या होत्या. अंगांत चोळ्या नव्हत्या, कपाळाला कुंकू नव्हतें, इतकेंच नव्हे, तर त्यांपैकीं एकीच्याही डोकीवर केंस नव्हते. पदर मात्र डोक्यावरून असल्यामुळें त्या सर्व आमच्या इकडील सोंवळ्या झालेल्या बायकांसारख्या दिसत होत्या. या सर्व लक्षणांवरून सगळ्या बायका विधवा

असाव्यात, असा माझ्या मनाचा कल होऊन मला अतिशय वाईट वाटलें व त्याच भावनेनें मी पुनः पुनः त्यांच्याकडे पाहूं लागलें, तों, त्यांचें हंसणें, खेळणें, थट्टामस्करी, विनोद वगैरे प्रकार पाहून मला वाटूं लागलें, कीं माझ्या समजुतींत कांहीं तरी चूक आहे, या सर्वच बायका दुःखी वर्गाच्या खास नसाव्यात; पण मग पोषाखांत सौभाग्यलक्षणविवर्जित अशा सर्वच एकसारख्या कशा? याबद्दल त्यांना समक्ष विचारून खुलासा करून घ्यावा तर मध्यें भाषेची अडचण आली. मला बंगाली एक शब्दही समजत नव्हता व त्यांना इंग्रजी किंवा मराठी येत नव्हतें, शिवाय, स्वस्थपणें बसून बोलण्यासारखा वेळही नव्हता. कारण, आम्ही दिल्ली येथील प्रसिद्ध इमारती, स्थळें व मनोरे पाहून दोन दिवसांनीं आग्र्यास आलों.

आग्र्याला आल्यावर तेथील मुख्य इमारत ताजमहाल पाहाण्यास गेलों. स्वच्छ व काळ्याभोर मोठ्या प्रवाहानें युक्त असा यमुनेचा वेढा असलेला तो सुंदर संगमरवरी दगडांचा ताजमहाल आम्हीं पाहिला. त्यांतील प्रत्येक खांबावर ज्या वेलबुट्या, झाडें, फुलें व पक्षी कोरलेले आहेत, त्याला लागणारे सर्व रंगांचे दगड मिळवून ते सप्रमाण उत्तम रीतीनें बसविले आहेत. अशी इमारत बांधण्याकरितां ज्यानें अगणित द्रव्य खर्च केलें, त्याचें नवल वाटल्यावांचून रहात नाहीं; पण याहूनही इमारत बांधणाऱ्या शिल्पकारांचें कौतुक अधिक वाटतें, यांत शंका नाहीं.

आग्र्यांतील आणखी कांहीं पहाण्यासारखीं ठिकाणें पाहून नंतर आम्ही मथुरेला आलों. दुसरे दिवशीं नावेंत बसून गोकुळ व वृंदावन पहाण्यास गेलों. गोकुळांत पाहाण्यासारखें कांहीं नाहीं, पण वृंदावनास मात्र देऊळ मोठें व फार सुंदर बांधलेलें आहे. देवळाचें आवारही फार मोठें आहे. हे गोकुळअष्टमीच्या उत्सवाचे दिवस असल्यामुळें तद्देशीय म्हणजे ब्रिजवासी गुजराथी व बंगाली सुमारें शेंदीडशें ब्राह्मण आपापल्या श्रीमद्भागवताच्या पोथ्या पुढें ठेवून संहिता वाचीत बसले होते. या सप्ताहाचा सर्व खर्च व ब्राह्मणांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था धनिक यात्रेकऱ्यांकडून होई. म्हणजे

तेथील बडे लोक आलेल्यां यात्रेकऱ्यांकडून याबद्दल कांहीं तरी रकम मागून घेत. वृंदावनाहून आम्ही मथुरेस परत आलों. हें शहर मोठें असून यांतील इमारती मजबूत व भव्य आहेत. शहरांत रहाणारे पंडे लोक श्रीमान् आहेत. तेथें मुख्यत्वेंकरून ब्रिज भाषा बोलतात. ती फार गोड, मृदु व नम्र आहे असें तेथील लोक मानतात. निरनिराळया देशांत जी हिंदी भाषा वापरली जाते त्या सर्वांपेक्षां ब्रिज भाषा वरील गुणांनीं युक्त असल्यामुळें तिचा त्यांना मोठा अभिमान वाटतो.

मथुरेहून निघून आम्ही अजमिरास आलों. येथून सहासात मैलांवर पुष्कर नांवाचें पुराणप्रसिद्ध तीर्थ आहे. या ठिकाणीं कमळांची उत्पत्ति अतिशय असल्यामुळें कमळें विपुल मिळतात, व त्यांच्या मोठमोठ्या पानांचा उपयोग केळीच्या पानांसारखा जेवणाकडे करतात. कमळांच्या बियांचे मकाणे करतात. अजमिरास गेल्यापासून स्वतःला थोडें बरें वाटेनासें झालें, म्हणून "पुष्कर पहावयाचें असेल तर आज तूंच जा, मला बरें वाटत नाहीं म्हणून मी येत नाहीं," असें सांगितलें. इतक्या जवळ आल्यासारखें पुष्कर पाहून जावें असें मनांत आणून मी जानकीबाईना व उपाध्यायाला घेऊन गेलें. टांग्यांतून उतरलें तों तेथें पुष्कळच यात्रा स्नानाकरितां आलेली होती. त्यांतच दिल्लीस भेटलेला बंगाली बायकांचा मेळा आलेला होता. या बायका नुसत्या तोंडओळखीच्या होत्या, तरी त्यांना कांहीं विचारण्याचा माझा हेतु असल्यामुळें मी त्यांच्यापैकीं एका वृद्ध बाईच्या शेजारीं स्नानाकरितां पाण्यांत गेलें. स्नान करतांना तिला हिंदुस्थानींत विचारलें, "या सर्व बायकांमध्यें कुमारिका किती आहेत, विवाहित किती आहेत, व दुःखी किती आहेत? तुम्हीं सर्वांनीं सारखे पोषाख केले आहेत हें कसें? चोळी, बांगड्या, कुंकूं वगैरे सौभाग्यलक्षणें धारण करण्याची तुमच्यामध्यें चाल नाहीं काय? अविवाहित, विवाहित व विधवा ह्यांच्या खुणा कशा ओळखाव्या हें मला कृपा करून सांगा, रागावूं नका. मी परक्या देशांतली म्हणून माहितीकरितां विचारतें."

ह्या बाई पोक्त आणि समजुतदार होत्या. त्यांनीं नीट ऐकून घेऊन खालील माहिती सांगितली. त्या म्हणाल्या "दहा वर्षांच्या आंतील असून

जिच्या हातांत लोखंडी वाळा नाहीं, पण जी कांठाचें धोतर नेसलेली व भांगाच्या जागीं कुंकू लावलेली असेल, ती अविवाहित समजावी; जी कांठाचें धोतर नेसलेली आहे व डाव्या हातांत लोखंडी वाळा आहे, ती विवाहित समजावी. लोखंडी वाळा डाव्या हातांत असणें हें आमचें विवाहचिन्ह आहे. जी कांठाशिवाय साधें धोतर नेसलेली आहे व जिच्या भांगांत कुंकूं नाहीं व जिच्या हातांत वाळाही नाहीं ती विधवा समजावी. चोळी, कांचेच्या बांगड्या, गळेसर वगैरे घालण्याची आमची चाल नाहीं."

मीं विचारलें, "पण तुमच्या कोणाच्याच डोक्यास केंस नाहींत हें काय? "

त्यांनीं सांगितलें, " यात्रेकरितां क्षेत्रांत आल्यावर क्षौर केल्यावांचून परत गेलें तर आमच्यांत अपवित्र मानतात, " वगैरे सांगून आमच्या रीतीभातींबद्दल त्यांनीं मला उलट विचारलें, कीं, " डोक्यावर पदर न घेतां उद्धटपणानें पुरुषांपुढें वागणें हें तुम्हांला कसें आवडतें ? माथा उघडा ठेवण्याची चाल तुमच्या देशांत आहे काय ? तुम्ही पडदा ठेवीत नाहीं काय ? " वगैरे माहिती विचारीत असतां माझें स्नान होऊन मी कोरडें नेसलें व ब्रह्मदेवाच्या देवालयाकडे गेलें.

सर्व हिंदुस्थानांत ब्रह्मदेवाचें देऊळ व पूजा ह्याच क्षेत्रांत आहे, दुसरीकडे कोठेंही नाहीं, असें ऐकिलें. येथें एक थोडेंसें लांब सावित्रीचें देऊळ आहे, पण तें मी पाहण्यास गेलें नाहीं. कारण, आदले दिवसापासून स्वतःची प्रकृति आमांशानें थोडी बिघडली होती, यामुळें मला लौकर परत जावयाचें होतें.

अजमिराहून आम्ही सिद्धपुरास गेलों. तेथें सरस्वती नदी असून तेथें श्रीकपिलमहामुनींचें देऊळ आहे. ह्याच ठिकाणीं कपिलमहामुनींनीं आपली माता देवहूती हिला ब्रह्माचा बोध करून तिचा उद्धार केला. हें प्रसिद्ध स्थान आहे, म्हणून आपणां हिंदु लोकांना विशेष पूज्य वाटतें. या क्षेत्रालाच मातृगया म्हणतात. तें पाहून आम्ही अहमदाबादेस आलों. ह्या ठिकाणीं स्वतःची प्रकृति जास्त बिघडल्यानें, एकवेळ भावनगर व काठेवाड पाहून

जावें, असा भावनगरच्या मित्रांनीं आग्रह केला होता, तरी प्रकृतीकरितां तो बेत रहित करून आम्ही एकदम पुण्यास आलों. त्याच दिवशीं माझे वडील वारल्याची दुःखकारक बातमी आम्हांला येऊन पोहोंचली. इकडे स्वतःच्या प्रकृतीचें मान वाढूं लागल्यामुळें माझे पंधरा दिवस दुःखांत व काळजींत गेले. मग पुढें दुखण्याला थोडा उतार पडूं लागला. पुढें पंधरा दिवसांनीं प्रकृति चांगली सुधारून आगगाडींत बसण्यासारखी झाल्यावर आम्ही मद्रासेकडे जाण्यास निघालों.

भाग सोळावा.

## कलकत्त्याची स्वारी.



ऑक्टोबर, नोव्हेंबर व डिसेंबरअखेर.

मद्रासेकडे एक महिनाभर राहून दसरा झाल्यावर आम्ही मद्रासहून परत आलों व आठदहा दिवस पुण्यांत राहून मग कलकत्त्यास जाण्याकरितां निघालों. वाटेनें भुसावळ, जबलपूर वगैरे ठिकाणीं मुक्काम पडले. त्यांत जबलपुरास एक दिवस राहून नर्मदेचा प्रसिद्ध धबधबा पहाण्यास गेलों. टांग्यांतून उतरल्यावर नावेंत बसून धबधबा व त्याच्या भोंवतालचा अतिशय रमणीय देखावा पाहिला. तो देखावा पाहून ईश्वराच्या अगाध कृतीबद्दल अंतःकरण आश्चर्यचकित व थक्क होऊन गेलें. तेथून निघून आम्ही प्रयागास आलों व दारागंजांत उतरलों. दुसरे दिवशीं दशाश्वमेधावर जाऊन गंगेचीं भांडीं भरून घेतलीं. मग तेथून एका नावेंत आम्ही सर्वजणें बसून गेलों व त्रिवेणी संगमाच्या मधोमध मोठमोठे लांकडी चौरंग टाकले आहेत त्यांजवर उतरलों. वेणीदान करावयाचें नाहीं असा स्वतःचा निश्चय होता. जवळच दुसऱ्या चौरंगावर एका बाईच्या वेणीदानाचा समारंभ होत होता, तो पाहून आम्ही परत फिरलों व दुसरे दिवशीं काशीस आलों.

पुढें कलकत्त्यास जाण्याची घाई असल्यामुळें काशीसही दोन दिवसांवर आम्हांस राहतां आलें नाहीं. काशीस पोंहचल्यावर दुसरे दिवशीं सकाळीं उठून भागीरथीचें स्नान करून विश्वेश्वर, मंगलागौरी, अन्नपूर्णा, काळभैरव वगैरेंचें दर्शन घेऊन मी परत आलें. दुपारीं तेथील तऱ्हेतऱ्हेचीं भांडीं व कपडे खरेदी करून संध्याकाळीं एक भाड्याची नाव करून तींत बसून आम्ही काशीपासून वरुणेपर्यंत सर्व घाट व देवळें पाहून रात्रीं नऊदहा वाजतां घरीं आलों. रात्र चांदणी व भोंवतालचा देखावा रमणीय असल्यामुळें आणि विशेषेंकरून काशीक्षेत्राबद्दल पवित्र भावना व पूज्य बुद्धि यांची त्यांत भर पडल्यामुळें ती वेळ व तो देखावा चिरस्मरणीय होऊन राहिला.

दुसरे दिवशीं आम्ही कलकत्त्यास गेलों. धरमतोल्यावर एक भाड्याचा बंगला घेऊन राहिलों. हा बंगला फार मोठा होता खरा; पण पुष्कळ जुना असून कांपौंडांत विहीर, बाग, झाडेंझुडपें इत्यादि कांहीं नसल्यानें अगदीं उजाड ओसाड दिसे. त्यामुळें या बंगल्यांत राहिल्यानें मनाला करमणूक व आनंद वाटण्याचें एकीकडे राहून उलट उद्विग्नता आली, व तो दिवस फार कंटाळवाणा गेला. संध्याकाळीं स्वतः घरीं आल्यावर विचारलें "तूं आज काय केलेंस?"

मीं जरा कंटाळल्यासारखें म्हटलें "कांहीं केलें नाहीं, करावयाचें काय? आधीं जागा नवी, कोणाची ओळख नाहीं. बंगला म्हणून जो घेतला आहे तो तरी मन रमण्यासारखा असावा, तर तेंही नाहीं. झाडें, फुलें, वेली यांतहा मनुष्याचें मन कांहीं वेळ तरी रमतें; पण त्यांपैकीं येथें कांहींच नाहीं. उलटें जिकडे पहावें तिकडे भणभणीत व ओसाड. घरांतसुद्धां कांहीं करण्यास मन लागत नाहीं. बरें, भाडें तरी थोडें आहे? तेंही पुष्कळच. असा बंगला कां घ्यावा? यापेक्षां आपण दुसरें घर जरा चांगलें व योग्यतेला शोभेल असें घेऊं. भाड्याचा खर्च व्हावयाचा तितका होऊन फुकट रहावयास आल्यासारखें दिसत आहे," वगैरे पुष्कळ पण ऐकूं जाण्यासारखें बोललें. "घर जुनें असून तळघरांत कोल्हे दिवसासुद्धां भयंकर ओरडतात.

बाहेर जाणाऱ्या माणसांचें ठीक आहे, पण घरांत रहाणाऱ्या माणसांचा दिवस उदास, कंटाळवाणा जातो. ”

हें सर्व बोलणें ऐकून घेऊन शांतपणें उत्तर दिलें “ बागबगीचे व झाडें-झुडें का कोठें मनाचें रंजन करतात ? वाचनासारखें साधन ज्याच्यापाशीं आहे, त्यानें अशी कुरकुर करूं नये. वाचनाइतकें आनंद व समाधान देणारें दुसरें कांहीं नाहीं. एका जातीच्या पुस्तकाचा कंटाळा आला तर दुसरें पुस्तक घ्यावें. कविता वाचाव्यात अगर पोथी वाचावी. फार वाचून मन थकलें तर ईश्वरनिर्मित बागबगीचे पाहाण्यास जावें. तुला काय साधन नाहीं ? गाडी जोडून फिरावयास जावें, म्हणजे थकलेल्या मनाला विश्रांति मिळते. मनुष्यांनीं केलेल्या बागा वगैरे कृतींनीं जर मनाला आनंद व करमणूक होते, तर ईश्वराच्या कृतीचें म्हणजे सृष्टिसौंदर्याचें मनन केलें तर त्याच्या योजकपणानें, अगाधपणानें व दयाळूपणानें आम्हां प्राणिमात्राला किती सुखाचीं साधनें होऊन राहिलीं आहेत, हें मनांत येऊन मन थक्क होतें व अंतःकरण सद्गदित होतें. पण हें तुझें मन अण्णासाहेबांच्या दुःखानें उदास झालें आहे, म्हणून आतांशा कशांतच करमणूक वाटत नाहीं. तुझ्या मनालाच कांहीं तरी काम देतों, म्हणजे झालें. उद्यां तूं या ओसाड दिसणाऱ्या जागेला शोभा आणण्याचें मनांत आण. ”

हें ऐकून मला हंसूं आलें. मग मीं म्हटलें “ नुसतें मनांत आणून जागेला शोभा कशी येईल ? ”

यावर स्वतः म्हटलें “ मी आधीं काय म्हणता तें ऐकून घे. उद्यां सकाळीं चार मजूर लावून तुला जेवढी बाग करावयाची असेल, तेवढी जागा आंखून देऊन त्यांच्याकडून खणून काढीव व त्यांत वाफे करून मेथी कोथिंबिरीचें बीं टाक. शिवाय, या ऋतूमध्यें येणाऱ्या फुलझाडांचें थोडेंसें बीं आणून टाक, म्हणजे करमणूक व उपयोग हीं दोन्हीं होतील. या बागेला पाणी तूं घालीत जा, म्हणजे अनायासें व्यायाम होईल. मी घरीं आल्यावर संध्याकाळचें वाचन आपण या तुझ्या बागेंतच करूं. ”

असें म्हणून दुसरे दिवशीं मला उठण्याबरोबर त्याची आठवण दिली. मींही सांगितल्याप्रमाणें मजूर बोलावून आणून संध्याकाळपर्यंत काम करून घेतलें. संध्याकाळीं स्वतः घरीं आल्यावर आम्ही गाडींतून फिरावयास गेलों. व येतेवेळीं थोडेंसें फुलझाडांचें बीं घेऊन आलों. पुढें एकदोन दिवसांनीं या नवीन केलेल्या बागेंत खुर्च्या टाकून संध्याकाळचें वाचन वाचीत बसलों. इतक्यांत एक बंगाली वर्तमानपत्र वांटणारा मनुष्य आला व "पत्र सुरू करावयाचें आहे काय ? " असें विचारूं लागला.

मीं घाईनें म्हटलें " बाबारे, आम्हांला पत्र नको. बंगाली वाचतां येत नाहीं, मग उगीच पत्र कशाला घ्यावयाचें ? "

त्या मनुष्यानें माझ्या बोलण्याकडे लक्ष न देतां स्वतःकडे पाहून पुनः विचारलें, तेव्हां त्याला सांगितलें "आज आणलेलें पत्र असूं दे, उद्यांपासून आणूं नको. पुढल्या सोमवारीं घेऊन ये, मग सुरू करूं. "

हें ऐकून मला जरा चमत्कारिक वाटलें; पण मी उगीच बसलें. तो मनुष्य निघून गल्यावर स्वतः माझ्याकडे पाहून म्हटलें " ज्यांच्या गांवांत येऊन चार दोन महिने रहावयाचें, त्यांची भाषा आम्हांला समजत नाहीं, असें म्हणावयास मला तर लाज वाटली असती ? "

मीं म्हटलें "जी आपली भाषा नाहीं ती येत नाहीं म्हणावयास लाज कसली ? आतां यापुढें शिकावयाचें मनांत आणलें तर तें जमावें कसें ? व शिकविणार तरी कोण ? "

स्वतःला बंगाली अक्षरओळख मात्र होती; पण चांगलें वाचतां येत नव्हतें, हें मला माहीत होतें; म्हणून मीं मुद्दाम म्हटलें " बरें तर, मीं शिकावें असें मनांत असल्यास उद्यांपासून स्वतः शिकवा. माझी तयारी आहे. दुसऱ्या कोणाजवळ मात्र मी शिकणार नाहीं. "

हें ऐकिलें तेव्हां खरें म्हटलें. म्हणजे नेहमींप्रमाणें कांहीं तरी थट्टेनें बोलावयाचें किंवा उत्तर द्यावयाचें; पण आज त्या जागीं कांहीं न बोलतां विचारच करीत असलेला चेहरा दिसला. मी मनांतल्या मनांत अगदीं

आंशाळलें. माझ्या बोलण्याचा राग तर आला नाहींना, असें वाटलें. पण यासंबंधानें कांहींच बोलणें झालें नाहीं.

तो दिवस तसाच गेला. दुसरे दिवशीं चहा घेतल्यावर नित्याप्रमाणें फिरावयास जाणें झालें. परंतु घरीं येण्यास नित्यापेक्षां उशीर झाला, म्हणून मी वाट पहात बसलें होतें, इतक्यांत येणें झालें. बरोबर एक शिपाई होता. त्याच्या हातांत लहानमोठीं अशीं दहापंधरा पुस्तकें होतीं. तीं त्यानें टेबलावर ठेविलीं. मी जवळच उभी होतें. त्यांतून एकदोन पुस्तकें उघडून पाहिलीं. तों तीं बंगाली व इंग्रजी होतीं. हीं पुस्तकें कशाला आणलीं ? असें माझ्या तोंडांतून निघणार तोंच आदल्या दिवशींची आठवण होऊन मी गप्प बसलें. स्वतःचे घामानें भिजलेले कपडे काढून घेऊन दुसरा सदरा घालण्यास दिला व पिण्याचें दूध आणावयास जाणार तोंच सांगितलें " बुकें तेवढीं मोजून घेऊन या मनुष्याला चिठ्ठीप्रमाणें पैसे देऊन टाक बरें. "

मीं होय म्हणून लागलीच चिठ्ठीप्रमाणें बुकें मोजून घेऊन पैसे देऊन टाकले. मग पिण्याचें दूध आणून दिलें. तें पिऊन झाल्यावर टेबलावरचें एक बुक घेऊन तें स्वतः चाळण्यास आरंभ केला. मी त्या दिवाणखान्यांत दूर एका खुर्चीवर वर्तमानपत्र वाचीत बसलें होतें; पण मधूनमधून काय चाललें आहे तें पहात होतें. कारण, इतकीं पुस्तकें व तीं स्वतः जाऊन खरेदी केलीं, याचा उद्देश माझ्या ध्यानांत येईना. स्वतः बाजारांत जाणें किंवा जिन्नस खरेदी करणें कधींच माहीत नव्हतें. साऱ्या जन्मांत स्वतः बाजार करण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. मुळीं पैसा हातांत घ्यावयाचा नाहीं व जवळ बाळगावयाचा नाहीं, हा मुख्य नियम असे.

अकरा वाजेपर्यंत हें पुस्तक चाळणें झालें. कांहीं पुस्तकें वाचण्याचा प्रयत्न केला, पण शिकून बरेच दिवस झाल्यामुळें विसर पडला होता, त्यामुळें अक्षरें लागेनात असें दिसलें. अकरा वाजतां स्वयंपाक तयार आहे, असें म्हटल्यावर स्नानास उठणें झालें. जातां जातां शिपायाला सांगितलें, " मी जेऊन परत येईपर्यंत तूं बाजारांत जाऊन एक स्लेट व पेन्सिल घेऊन ये, वेळ लावूं नको. "

जेवण होऊन पुनः दिवाणखान्यांत आल्यावर आणलेली पाटी हातांत घेतली व त्या पुस्तकांपैकीं एक पुस्तक हातांत घेऊन पाटीवर मुळाक्षरें काढण्याचा क्रम सुरू केला. तोंपर्यंत नेहमींसारखें मधूनमधून कांहीं तरी विनोदानें, चेष्टेनें बोलावयाचें, पण तें आज कांहींच नाहीं! सगळें लक्ष नवीन वाचनाकडे वेधलें होतें. संध्याकाळीं गाडींतून फिरावयास जाण्याच्या आधीं जें पुस्तक वाचावयास अडत होतें, त्याचा धडा मोठ्यानें भराभर वाचला आणि तें पुस्तक खालीं ठेवलें आणि पोषाख केला. आम्ही गाडींतून दोघें फिरावयास गेलों. इकडल्या तिकडल्या पुष्कळ गोष्टी बोललों, पण सकाळच्या पुस्तकांबद्दल विचारण्यास मला धीर होईना. स्वतःच्या बोलण्यात मात्र एकदां सहज उद्गार निघाला, कीं, "आज बंगाली वाचण्यांत सगळा वेळ घालविल्यामुळें माझें रोजचें काम कांहीं झालें नाहीं."

हें ऐकून मीं कांहींच उत्तर दिलें नाहीं; पण माझें मलाच वाईट वाटलें, कीं, माझ्या कालच्या बोलण्यानें आज इतकी दगदग पडली. बंगाली शिकण्याची टाळाटाळी करण्याकरितांच "मला स्वतः शिकविलें तर मी शिकेन, दुसऱ्याजवळ शिकणार नाहीं," असा माझा बोलण्याचा हेतु होता. कारण, मीं नुसतें होय म्हटलें असतें, तर बंगाली मास्तर कोणी तरी आणिला असता; पण मला तें आवडलें नाहीं. कारण, एक तर मला लहानपणापासून शाळा ठाऊक नव्हती; स्वतःशिवाय कोणत्याही पुरुषाजवळ शिकण्याचा प्रसंग नव्हता. आतां स्वतःला वेळ नसल्यामुळें व बंगाली शिकून पुष्कळ दिवस झाल्यानें आतां विसरून गेल्यामुळें, शिकविण्यास कोणी तरी मनुष्य ठेवण्याची वेळ येईल ती टाळावी, या बुद्धीनेंच मी आदले दिवशीं बोलून गलें; पण या शब्दांची इतकी ईर्षा वाटून दुसरा सबंध दिवस उजळणी करण्याकडे घालविला, याबद्दल मला पश्चात्ताप होऊन चोरट्यासारखें झालें. रात्रीं बोलतां बोलतां अस्पष्ट शब्दांनीं तसें कांहीं मी बोललें व तेवढ्यानें माझ्या मनावरील भार कमी झाला.

दुसरे दिवशीं सकाळीं फिरावयास जाण्याच्या आधीं पाटी घेऊन व तिजवर बंगाली मुळाक्षरें काढून मला दिलीं व एकदोनदां वाचावयास

सांगून "मी घरीं येण्यापूर्वी हीं अक्षरें तयार करून ठेव," असें सांगितलें, परत येईपर्यंत मीं सर्व अक्षरें तयार करून पुनः काढून ठेविलीं व आपल्या कामाला गेलें. स्वतः घरीं येऊन नित्याप्रमाणें सर्व झाल्यावर हजामत करवीत असतां स्वतः एक बंगाली बुक हातांत घेऊन मोठ्यानें वाचावयास सुरवात केली व जो शब्द अडेल त्याचें अक्षर व उच्चार त्या नापिकाला विचारावयाचे, असा क्रम चालला होता. मी जवळच्या खोलींत वाचीत बसलें होतें. तेथें दिवाणखान्यांत दुसरें कोणी बोलत आहे असें मला ऐकूं आलें, तेव्हां कोणी तरी भेटावयास आलें आहे असें समजून ते कोण आहेत हें पाहण्यास उठलें व पाहतें तों दुसरें कोणी आलें नसून बंगाली पुस्तक हातांत घेऊन स्वतः मोठ्यानें वाचन चाललें होतें, व जवळ असलेला नापित शब्दांचे उच्चार व अर्थ सांगत होता !

हें पाहून मात्र माझें हंसूं राहीना. तो मनुष्य निघून गेल्यावर लागलींच मीं पुढें जाऊन म्हटलें "मास्तर तर फार छान मिळाला! श्रीदत्तांनीं जसे चोवीस गुरु केले होते, तसें इकडल्या गुरूंची यादी करावयास जर मला कोणीं सांगितलें तर या गुरूचें नांव पहिलें घालीन ! पूर्वी गुरूंपाशीं शिकावयाचें म्हणजे त्यांची सेवा करावी लागे असें म्हणतात; पण हा गुरु बिचारा उलट इकडचीच चाकरी करीत असे, म्हणून याचें नांव पहिलें पाहिजे."

अशा रीतीनें एवढ्या मोठ्या वयांत आपण स्वतः शिकून मला शिकविण्याचा क्रम ठेवलेला पाहून माझें मलाच अतिशय नवल वाटलें व मीं पूर्वी उच्चारलेल्या शब्दांमुळें स्वतःला ईर्षा येऊन अनेक तऱ्हेचे व्यवसाय, जबाबदारीचीं कामें इतकीं चालू असतांना त्यांतल्या त्यांत वेळ काढून मला बंगाली शिकविण्याकरितां आपण बंगाली शिकण्याची तसदी घेतली.

ह्याप्रमाणें बंगाली वाचनाचा क्रम ठेविल्यावर महिना दीड महिन्यानें मला चांगलें वाचतां येऊं लागलें. कंपौंडांत केलेल्या बागेंत मेथी व कोथिंबीर दाट उगवली असून इंग्रजी फुलझाडांना फुलें आलीं होतीं. त्या ठिकाणीं खुर्च्या टाकून आम्ही बसलों असतांना कांहीं आठवड्यांपूर्वी जें बंगाली

वर्तमानपत्र नको म्हटलें होतें तेंच आतां सुरू करून दररोज तेथें वाचण्याचा क्रम ठेविला. शिवाय, क्रमिक पुस्तकांचा अभ्यास सुरू होताच. कलकत्त्याहून परत येतांना विषवृक्ष, दुर्गेशनंदिनी, आनंदमठ वगैरे आणखी कांहीं कादंबऱ्या घेऊन आम्ही परत आलों.

भाग सतरावा.

## करमाळ्याचें दुखणें.

ता. २६, २७, २८ फेब्रुवारी, १८९१.



सन १८८८ सालांत कलकत्त्याहून परत आल्यावर शेतकी खात्याचे स्पेशल जज्ज डॉ. पोलन यांच्या जागेवर आमची कायमची नेमणूक झाली. असिस्टंट स्पेशल जज्ज असतांना आम्हांला पुणें व सातारा या दोन जिल्ह्यांतील कोर्टांची तपासणी करावी लागे; पण आतां पुणें, सातारा, नगर व सोलापूर अशा चार जिल्ह्यांत फिरावयाचें असल्यामुळें आठीच्या आठी महिने या फिरण्यांतच जात. त्याप्रमाणें आम्ही सन १८९१ च्या जानेवारी महिन्यांत नगर जिल्ह्यांत फिरावयास गेलों. सर्व जिल्हा फिरून सोलापूर जिल्ह्यांत फिरण्यास आम्हांला दीड महिना लागला. ह्या वर्षी सव्वीस फेब्रुवारीला खानेसुमारी होती. त्या दिवशीं इकडील कामें संपवून व सोलापूर जिल्ह्यांतील करमाळें तालुक्यांत ऑफिस व सर्व मंडळी ठेवून आम्हीं दोन दिवस पुण्यास जाऊन यावें असा बेत केला व त्याकरितांच नगर जिल्ह्यांतील काम घाईघाईनें आटपून करमाळ्यास आलों. तेथील काम दोन दिवसांत आटपून मंडळी ऑफिसासुद्धां सोलापुरास रवाना करून आपण खानेसुमारीला पुण्यास जाऊं असें मला सांगितलें व बेत केला. त्याप्रमाणें दुसरा सगळा दिवस विसावा न घेतां रात्रीपर्यंत काम केलें. त्यामुळें जेवावयास उठावयास जरा उशीर झाला. जेवण झाल्यावर त्या दिवशीं वाचन वगैरे कांहीं घेतलें नाहीं.

दुसरे दिवशीं सकाळीं नित्याप्रमाणें उठून कोको घेऊन फिरावयास जाणें झालें. ह्या खेपेस चिरंजीव सखू बरोबर घेतली होती. ती फक्त दहा महिन्यांची असल्यामुळें सकाळच्या प्रहरीं मला तिचें काम बरेंच असे. तरी होईल तितकें लवकर तें काम उरकून घेऊन स्वतः फिरून घरीं येण्यापूर्वी मला वाचनाकरितां तयार रहावें लागे. कारण सकाळच्या वेळींच स्वतः आठनऊ वाजतां घरीं आल्यावर माझ्या इंग्रजी वाचनाकडे तास दीड तास तेवढा मिळे. एखादे दिवशीं मीं आपलें काम आधीं उरकून घेतलें नसलें तर तो दिवस फुकट जाई व पुनः दुसरा दिवस येईपर्यंत जवळ वाचावयास मिळत नसे; म्हणून होतां होईल तों मी आपला वेळ चुकवीत नसें. अगदीं तयार राहीं.

ह्या वेळेस मीं मेडोजटेलरचें तारा नांवाचें पुस्तक वाचावयास घेतलें होतें. त्या दिवशीं बाहेरून येण्यास नऊ वाजून गेले होते. मी पुस्तक वही पेन्सिल घेऊन वाट पहात बसलें होतें. घरीं आल्यावर मीं सहज म्हटलें, "आज फिरण्याकडे जास्त वेळ दिला? या तालुक्यांत काम कमी आहे वाटतें? हे हुरड्याचे दिवस आहेत, गांवांतील मंडळी अतिशय अगत्याची, ती येथील रावसाहेबांना (मुनसफांना) भीड घालीत असतील; रावसाहेबांना भिड मोडवत नाहीं म्हणून दोन वाजतांच कोर्ट बंद करून निरुपायानें जावें लागत असेल, त्यामुळें अर्थातच तपासणीला काम बेताचेंच असणार."

तेव्हां सांगितलें "आधींच उशीर झाला आहे, बोलण्यांत वेळ घालवूं नको, वाचावयास घे. पण मला आधीं थोडीशी सुंठसाखर आणून दे, मग आरंभ कर. आमच्या पुरुषांच्या कामांची चवकशी तुम्हां बायकांना कशाला हवी?"

मीं म्हटलें "खरेंच! आम्हांला कशाला चवकशी हवी आहे? त्यांत एवढें आहे तरी काय? या तालुक्याच्या कोर्टांत जितकीं कामें सबजज्ज करितात, तितकीं कामें आम्ही बायका देखील करून टाकूं!"

तेव्हां हंसून विचारलें "आज त्यांच्यावर कां तुमची गदा? काम कमी आणि जास्त करणें हें ज्याच्या त्याच्या स्वभावावर आहे; पण ते करतात तीं कामें महत्त्वाचीं नाहींत असें कां तुला वाटतें?"

मीं म्हटलें "कामाचें महत्त्व कोण नाकबूल करील? पण तें महत्त्व काम करणाराच्या मनांत कितपत वागतें,याचा अनुभव आपल्याला या फिरण्यामध्यें नेहमीं येतो. सरकार यांना नेमलेला जो पगार देतें, त्यापेक्षां उत्तम, मध्यम, कनिष्ठ, अशा कामाप्रमाणें कमिशनासारखा पगार ठेविला असता,तर याहून अधिक काळजीनें व मेहनतीनें कामें खचित झालीं असतीं. शिवाय गरीब पक्षकार लोकांना अपिलें करण्याचा विनाकारण आतांच्या इतका खर्च तरी पडला नसता. पण हें काय ? मी बोलतां बोलतां सुंठीचें अगदींच विसरलें !" असें म्हणून सुंठसाखर कालवून घेऊन वाचावयास बसलें.

या वेळच्या वाचनाच्या भागांत तारेची वैधव्यस्थिति व तिच्या आईबापांच्या मनाची विव्हलता हें वर्णन वाचतांना मला फार वाईट वाटून गहिंवर आला, आणि हुंदक्यामुळें पुढील वाचन बंद ठेवावें लागलें.

नंतर विधवांच्या एकंदर अत्यंत दुःखद व शोचनीय स्थितीबद्दल बोलणें निघालें. त्यांत आमच्या समाजांत कांहीं चाली फार निर्दयपणाच्या व घातुक आहेत, त्यांचा परिणाम पर्यायानें दिवसेंदिवस जनतेवर घडून फार अहित होत आहे, पण हें समजेल तेव्हां खरें,हळू हळू समजेल,वगैरे गंभीरपणाचें व कळकळीचें भाषण चाललें असतांना सांगितलें, कीं, " आज वाटेंतच माझी प्रकृति बिघडली व पोटांत कळ करूं लागली. "

मीं विचारलें " कां बरें ? आज सकाळीं नीट साफ झालें नव्हतें कीं काय ? रात्रीं झोंप चांगली लागली होती ? काल रात्रीं मी जी एकदां निजलें, ती पहांटे मला जागी केली तेव्हांच पहिल्यानें जागी झालें. सखूसुद्धां सगळ्या रात्रींत उठली नाहीं. "

तेव्हां म्हटलें " सखू उठली नाहीं म्हणूनच तुला उठावें लागलें नाहीं. गेल्या दोनतीन रात्रीं तुला जागावें लागलें होतें, त्यामुळें काल झोंप जास्त लागली असेल. तसें भिण्यासारखें कांहीं नाहीं. रात्रीं मला झोंप बरी लागली होती. आसपास हवा बिघडल्याचा बोभाटा नाहीं, शिवाय, आपण पाणी पितों तें तापवून फिल्टर केलेलें असतें. तेव्हां कांहीं संशयाचें कारण नाहीं. पण आज प्रकृति तशा तऱ्हेची बिघडली खरी. "

मीं म्हटलें "तर मग थंडीच झाली असेल. साखरेवर पुदिन्याच्या अर्कांचे व आंबेचे थेंब घालून देतें आणि सुंठीचें चाटण शिजवून आणतें म्हणजे विकार कमी होईल." असें म्हणून मी उठलें व बऱ्याच वेळानें दोन्ही जिन्नस तयार करून घेऊन आलें.

तेव्हां पडदा लावला होता तेथें जाणें झालें होतें. तिकडून परत आल्यावर मीं पाहिलें तों मघाच्यापेक्षां अधिक थकवा आलेला दिसला. मग मीं आणलेलीं दोन्हीं औषधें देऊन ऊन पाण्यानें रबराची पिशवी भरून पोट शेकण्यास दिली; पण बरें वाटेना. म्हणून मीं डॉक्टरास बोलावूं पाठविलें. त्यांनीं येऊन हिंग, बडिशोप व पेपरमिंट यांचे अर्क एकत्र करून पिण्यास दिले. व "शेक मात्र सारखा चालूं द्या" असें सांगून एक मोठा स्पंजोपायलिनचा तुकडा पोट शेकण्याकरितां पाठविला. भात घालूं नका, तांदुळ भाजून त्याची कण्हेरी किंवा साबूदाणे शिजवून मीठ घालून पेज द्या, दूध घालूं नका." असें त्यांनीं सांगितलें होतें त्याप्रमाणें औषध, शेक व खाणें चालू होतें. आमच्या घरचें असें माझ्याशिवाय दुसरें कोणी नव्हतें. तथापि आमच्या ऑफिसची सर्व मंडळी उभीच्या उभी होती. ही मंडळी नुसती हाताखालची म्हणूनच काम करीत होती, असें नव्हतें. त्यांची स्वतःचे ठिकाणीं जी भक्ति व जो आदर होता, त्यामुळेंच ही मंडळी तत्परतेनें काम करीत होती.

औषधोपचार सुरू असतांनाही दुखण्याचा पाय मागें होईना. चार-पांच चारपांच मिनिटांनीं उलट्या सुरू झाल्या. संध्याकाळची तीनचार वाजण्याची वेळ आली, तरी आमच्या ऑफिसच्या मंडळींनीं स्नान किंवा जेवण केलें नाहीं. सखू लहान, एक वर्षाचीही नव्हती. तिला आमच्या शिरस्तेदारांनीं बाहेरच्या बाहेर मोलकरणीकडून दूध घालून संभाळली, माझ्याकडे येऊं दिलें नाहीं. माझ्या विवंचनेपुढें मलाही तिची आठवण झाली नाहीं म्हटलें तरी चालेल.

सकाळपासून तीन वाजेपर्यंत डॉक्टर बसून होते; ते मग जेवावयास घरीं गेले. "मध्यें मी एकदां संध्याकाळीं प्रकृति पाहण्यास येईन, पण रात्रीं आठ

वाजण्याचे पुढें माझी खानेसुमारीकडे नेमणूक झाली असल्यामुळें मला येतां येणार नाहीं," असें सांगून ते गेले. पण मला फार काळजी पडली व मीं आमच्या शिरस्तेदारांस म्हटलें "तुम्ही मामलेदारांना जाऊन भेटा व प्रकृतीची ही सर्व हकीकत कळवून मेहरबानीनें आजची रात्र डॉक्टरांना आमच्याकडे राहूं द्या, त्यांच्याबद्दल आमच्या ऑफिसांतून दोन कारकून आम्ही कामाकरितां तुमच्याकडे पाठवितों, असा माझा निरोप सांगा."

याप्रमाणें सांगून मी आंत पडद्यांत आलें व पहातें तों आतां स्वतःच्या प्रकृतीचें मान अधिक काळजी वाटण्यासारखें दिसलें आणि तोंडाची कळा पालटली. अंगास घाम फार सुटूं लागला, हाताचे पंजे व नखें अगदीं काळीं पडलीं. हीं सर्व लक्षणें पाहून माझ्या काळजानें तर आतां अगदींच ठाव सोडला. मला काळजी व भीति वाटत होती, ती स्वतःच्या लक्षांत येऊं नये म्हणून दिवसभर उसनें आणलेलें धैर्य सुटलें; इतक्यांत डॉक्टर आले.

मीं अत्यंत घाबरून म्हटलें "आतां मला धीर निघत नाहीं. पुण्यास डॉक्टर विश्रामजींस तार करतें. ते सकाळीं येईपर्यंत तुम्ही मात्र अशा स्थितींत आम्हांला सोडून जाऊं नका. मीं मामलेदारांकडे निरोप पाठविला आहे व तुमच्याबद्दल काम करण्यास दोन कारकून पाठवीत आहें." याप्रमाणें बोलून मीं पुण्यास डॉक्टर विश्रामजी व वन्सं यांना तार लिहविली. करमाळ्याहून रेल्वे स्टेशन तेरा मैल दूर असल्यामुळें घोड्याची गाडी जोडवून नाना आगाशांना पाठविलें, व तुम्ही तारा करून स्टेशनावरच थांबा व पहांटे चार वाजतां डॉ० विश्रामजी व वन्सं येतील त्यांना ताबडतोब घेऊन या," असें सांगितलें.

डॉक्टर आंत बिछान्याजवळ बसूनच होते. हे जातीनें मुसलमान असून वागणुकीनें फारच सालस व सुशील होते. औषधोपचार करावयाचे ते आस्थापूर्वक व काळजीनें करीत होते, तरी प्रकृतीचें मान घटकोघटकीं अधिक होऊं लागलें. फार घाम सुटत होता व हातांचे पंजे काळे पडलेच होते, त्यांत आतां तोंडही भस्म सारविल्यासारखें कळाहीन दिसूं लागलें.

आतां पटकीचीं सर्व लक्षणें स्पष्ट दिसूं लागलीं. आवाज अतिशय खोल गेला. बोललेला शब्द तोंडाशीं कान लाविल्याखेरीज ऐकूं येत नसे. बोलावयाचें तें काय? दिवसभरांत "तूं घाबरूं नकोस, भिऊं नकोस, लक्ष लावून बाटलीवरचीं अक्षरें नीट वाचून मग औषध देत जा, घाबरेपणानें भलतेंच देशील," वगैरे धीर देण्याचें बोलणें, दिवसांतून कितीएक वेळां चाललें होतें. प्रकृतीचें मान धडधडीत उघड दिसत होतें, त्यामुळें माझा जीव अगदीं भेदरून गेला होता व वारा प्यालासारखा झाला होता.

वर लिहिल्याप्रमाणें स्वतःचें धीराचें बोलणें ऐकिलें म्हणजे माझ्या जिवांत नवीन जीव आल्यासारखें होऊन तशा स्थितींतही मला त्यांतल्या त्यांत हुषारी वाटे; पण तें बोलणेंही आतां बंद पडल्यामुळें माझा सर्वस्वी धीर सुटला. धरणी आणि आकाश यांशिवाय आपलेपाशीं आतां दुसरें कोणी नाहीं. दयाळू आणि सर्वांच्या धांवणीला धांवणारा तो कनवाळू परमेश्वर या वेळीं कोठें आहे? माझा विश्वास आजपर्यंत सर्वस्वी त्याच्यावर आहे. त्याच्यावांचून या वेळीं मला दुसरें कोणी नाहीं, हें त्याला समजत नाहीं काय? वगैरे मी आपल्या मनाशीं पुष्कळ बोलून रडलें व त्याच आवेशांत उठून नाडी पाहिली. जवळ डॉक्टर व कारकून बसले होते, त्यांना "मी जरा आंत जाऊन येतें," असें सांगून, ज्या देवळांत आम्ही उतरलों होतों, त्याच महादेवाच्या गाभाऱ्यांत देवासमोर जाऊन बसलें.

ही वेळ रात्रीची तीन वाजण्याची होती. आंत एक म्हातारी गुरवीण निजली होती, तिला बाहेर जाण्यास सांगितलें. पणतींतील नंदादीप अगदीं मंद जळत होता, तेंही मला बरेंच वाटलें. कारण, या वेळेस मनाची वृत्ति अशी झाली होती, कीं देव आणि आपण यांशिवाय तिसरें येथें कोणी नको, दिवासुद्धां नसता तर बरें झालें असतें, असें वाटलें. होता तो मात्र मालविण्यास हात धजेना. तसें मनांतसुद्धां आणणें अशुभ आहे, असें वाटून मी देवापुढें थोडी भ्रमिष्टासारखी बसलें. तोंडांतून कसला उच्चार होईना म्हणून डोकें टेंकून हळूच पण पुष्कळ मन मोकळें करून

रडलें. पुष्कळ रडून मनाचा भार थोडा कमी झाल्यावर मनाला वाटेल तितकें बोललें, प्रार्थना केली व शेवटीं मनाला सर्व प्रकारें दीनपणा आला होता तरी त्यांतल्यात्यांत त्राग्यानें " आम्ही दीन तुझ्या दारीं संकटांत येऊन पडलों आहों; तुला वाटेल त्या रीतीनें आम्हांला बाहेर काढ; तूं सर्वांतर्यामीं म्हणवितोस त्या तुला माझी करुणा आली नाहीं तर ह्या बाहेरच्या मोठ्या विहिरीला तरी खचित करुणा येऊन ती मला पोटांत घेईल, वगैरे काय हवें तें वडबडलें ! " सर्व रीतीनें श्रांत झाल्या-मुळें कीं काय कोण जाणे, दुखण्याची इतकी भयंकर स्थिति झाली असतांही कांहीं सेकंदें तेथेंच माझा डोळा लागला.

तेवढ्यांत मला एक स्वप्न पडलें, कीं, मी कोठें तरी उंच डोंगरांत देव-स्थान आहे तेथें गेलें आहे. देवळाखालींच कृष्णेचें पात्र आहे. तिचे कांठीं वटपिंपळाचे वृक्ष जागोजाग असून त्यांना मजबूत पार बांधिले आहेत व मधून मधून मोठे घाट आहेत. अशा एका उंच घाटाजवळच पारावरील वट-वृक्षाला दोन्ही हात टेंकून खालील मजा पहात मी उभी आहें. त्या दिवशीं विशेष कांहीं तरी मोठी पर्वणी होती म्हणून हजारों स्त्रिया व पुरुष कृष्णा-बाईंत स्नान करीत होतीं. मी ज्या उंच व विस्तृत वटवृक्षाला दोन्ही हात टेंकून धरून उभी होतें, तो एवढा मोठा वृक्ष पडतोच कीं काय, असा पुढें पुढें वांकूं लागला व त्यामुळें पाराचे चिरेच्या चिरे उखळूं लागले. हें पाहून मी अतिशय घाबरलें व दोन्ही हातांनीं त्या वटवृक्षाला कवटाळून धरून मोठ्या आक्रोशानें खालील ब्राह्मणांना हांका मारून व ओरडून सांगूं लागलें " अहो ! पहा ! हा वृक्ष पडत आहे, कोणी खालून याला हात लावा, धिरा द्या, हा पडला तर हजारों माणसांचे प्राण जातील. " असें म्हणून माझ्यामध्यें होतें तितकें सामर्थ्य खर्चून मी तो वृक्ष आपल्याकडे ओढीत आहें. माझा जीव घामाघूम होऊन तोंडाला कोरड पडली आहे, इतक्यांत खालील मंडळी नदींतून ओलेत्यानें धांवून येऊन हजारों माणसांनीं त्या वटवृक्षाला खालून आपापल्या हातचा टेंका दिला. असें झाल्यावर

एकदोन मिनिटांत तो वृक्ष अधिक न वांकतां तितक्याचा तितका घट्ट राहिला. आतां तो वृक्ष खालीं येत नाहीं अशी खात्री झाल्यावर खालच्या माणसांनीं हात सोडले व मलाही आनंद झाला. अजून माझा विळखा वृक्षाला आहे तोंच आमच्या शिस्तेदारांनीं येऊन मला हांक मारली.

मी घाबरून एकदम उठलें व तडक तशीच अंथरुणापाशीं गेलें खरी, पण मला कां बोलावलें ! काय स्थिति आहे ? वगैरेचा मला कांहींच समज पडेना. मी वेड्यासारखी चोहोंकडे पाहूं लागलें, इतक्यांत डॉक्टर मला म्हणाले " खालीं वांका, कांहीं बोलण्याची इच्छा आहे असें दिसतें. "

मीं लागलींच खालीं वांकून स्वतःच्या तोंडाजवळ कान नेला. तेव्हां खोल शब्दांनीं हळूच म्हटलें, "मला बसता करा. मला उलटी होत आहे."

तें ऐकून मीं व डॉक्टर मिळून हळूच बसतें केलें तोंच मोठ्या जोरानें उलटी झाली. अवसान सुटलें व एकदम मान टाकली. उसें उंच करून व हळूच टेंकून ठेवल्यावर डाक्टरांनीं नाडी पाहिली. संध्याकाळपासून जो गार घाम सुटला होता, तो आतां अगदीं बंद झाला. पण अंगाचा विशविशीतपणा व गारवा मात्र तसाच कायम होता. म्हणून डॉक्टर मला म्हणाले " रात्रीपासून विचारीत होतां ती मात्रा आतां द्या. "

मीं तुळशीच्या रसांत हेमगर्भाची मात्रा उगाळून दोनतीन बोटें चाटविलीं. नाडींत चलबिचल होती व ती असावी तशी नव्हती. तशांत आणखी एकदां आजाराचा जास्त जोर झाला. आतां मात्र स्वतःचा धीर सुटला व मला सांगितलें " आतां माझें बरें नाहीं. कोठें पुणें आणि कोठें मी ? तूं अगदीं एकटी आहेस ! " असें म्हटल्यावर एकदम हुंदका आला. "भिऊं नको. देव तुला आहे ! घरीं तार करून दुर्गाला बोलाव. "

मीं पुनः हेमगर्भाची मात्रा चाटविली व डॉक्टरांनीं दिलें तें औषध पाजून वर थोडी कांजी पाजिली आणि मोठा धीर करून म्हटलें " डॉक्टर म्हणतात रात्रीपेक्षां आतां बरें आहे, धीर सोडूं नये, घरीं तार केली आहे. डॉ. विश्रामजी व वन्सं आतां सकाळीं लवकर येतील. "

ही वेळ सकाळचे पांच वाजण्याची होती. डॉक्टर व मी अशीं दोहों बाजूला नाडी धरून बसलों होतों. मीं नांवाला हात धरला होता पण चित्त जाग्यावर नसल्यामुळें नाडींत होणारी चलबिचल मला कांहींच समजत नव्हती. उलट, नाडी बंद झाली असें वाटून मी स्वतःच्या तोंडाकडे पाहून डॉक्टरांकडे पाहीं, तेव्हां ते घाबरूं नका अशी हातानें खूण करीत.

अशीं पांचसात मिनिटें गेल्यावर आतां मात्र नाडी खचित बंद झाली असें माझ्या मनानें घेतलें, व कदाचित् मी मोठ्यानें ओरडलेंही असतें; इतक्यांत डॉक्टरांच्या लक्षांत येऊन ते म्हणाले "झोंप लागली आहे, भिऊं नका, ओरडूं नका, मी खोटें बोलत नाहीं. झोंप मोडली तर मात्र घात होईल. ही पहा झोंप लागली आहे व अंगांत ऊब येत आहे," हें त्यांचें बोलणें संपलें नाहीं तोंच स्वतःचा नेहमींच्या घोरण्याचा आवाज मला ऐकूं आला व माझें मन स्थिरावलें.

यापुढें सुमारें वीस मिनिटें चांगली झोंप लागली. रात्रीपासून थंडगार पडलेलीं सर्व इंद्रियें व अंगे आतां ताप आल्यासारखें कढत झालें. नाडीचे ठोके अधिक जोरानें व लवकर पडूं लागले. तरी पण झोंप लागलीच होती. अशा स्थितींत एक तास पक्की झोंप लागल्यावर सुमारें सात वाजतां डॉ. विश्रामजींची गाडी आली. त्यांना व वन्संना पाहून मला धीर आला.

डॉक्टर विश्रामजी हे बिछान्याजवळ आल्याबरोबर, हे आपले आप्त किंवा गुरु नाहींत याचें भान बिलकूल न राहून मीं एकदम पुढें जाऊन त्यांचे पाय धरले व पायावर डोकें ठेवून म्हणालें " आतांपर्यंत या डॉक्टरांनीं मेहेरबानी करून प्रकृति सांभाळून तुमच्या हातीं दिली आहे. आतां तुम्ही सांभाळा. तुमच्या रूपानें देवच मला साह्य करण्यास आला आहे, असें मी समजतें."

विश्रामजींनीं जवळ जाऊन नाडी पाहिली. त्या वेळीं अर्धवट झोंपच होती, म्हणून डॉक्टरला घेऊन ते जरासे पलीकडे गेले व आतांपर्यंत औषधपाणी वगैरे काय दिलें याची चौकशी करूं लागले. वन्सं आंथरुणाजवळ बसल्या होत्या. बराच वेळ गेल्यावर स्वतः डोळे उघडून वर पाहिलें.

वन्सं व विश्रामजी यांच्याकडे पाहून व त्यांना ओळखून म्हटलें " तुम्ही आलांत! काय ही माझी स्थिति! " आणि जो गहिंवर आला, त्याबरोबर अशक्तपणामुळें क्षणभर मूर्च्छा आली.

विश्रामजींनीं थोडा वारा घालून सावध केल्यावर सांगितलें "मी आलों आहें, आतां कांहीं भ्यावयाला नको; जें काय संकट होतें तें काल होतें. आतां त टळलं. "

असें म्हणून त्यांनीं आपल्या ब्यागमधून एक बाटली काढून तींतील औषध एका ग्लासांत ओतलें व थोडेंसें पाणी घालून तें पिण्याकरितां पुढें केलें. तेव्हां " मला बसतं करा, " असें हळूच म्हटलें.

आम्हीं दोघींनीं बसतें केल्यावर डॉक्टरांनीं पुढें केलेला ग्लास आपल्या हातांत घेऊन " पिऊं का? " असें विचारलें. त्यांनींही होय म्हटल्याबरोबर ग्लास तोंडाकडे नेला; पण काय वाटलें कोण जाणे ग्लास तसाच पलीकडे ठेवून एकदम अंग अंथरुणावर टाकलें. "असें का?" म्हणून डॉक्टरांनीं विचारल्यावर जरा चिडल्यासारख्या स्वरानें म्हटलें "अशी कोणी माझी थट्टा करूं नका; माझा एवढा नियम चालवा; याशिवाय मला कसलेंही औषध दिलेंत तरी मी घेईन. "

यावर डॉ. विश्राम यानीं पुष्कळ तऱ्हेनें समजूत घालून सांगितलें, मी "हें औषध अगदीं निरुपायाशिवाय वापरीत नाहीं. मला आपला स्वभाव ठाऊक आहे. पण अंगांतील गारठा व वेळोवेळीं येणारी मूर्च्छा कमी होण्यास दर दोन तासांनीं वीसपासून तीस थेंब घेतले पाहिजेत व पुण्यास जाईपर्यंत हें माझें बोलणें ऐकलें पाहिजे. तेथें गेल्यावर याच्या जागीं दुसऱ्या औषधाची योजना करीन. " याप्रमाणें ऐकल्यावर मुकाट्यानें पण " राम राम " असे शब्द उच्चारून मोठ्या कष्टानें औषध घेतलें.

याप्रमाणें तो दिवस तेथेंच काढून दुसरे दिवशीं आम्ही करमाळ्याहून निघून बैलगाडींतून जेऊरच्या स्टेशनवर आलों. स्वतःला बैलगाडींतच मऊ गाद्या घालून ठेविलें होतें, व गाडीला थोडासुद्धां धक्का न बसेल इतकी हळू

नी चालविली होती. गाडीबरोबर डॉ. विश्राम, मी, वन्सं वगैरे पायींच चालत होतों. दर वीस मिनिटांनीं किंवा अर्ध्या तासानें डॉक्टर नाडी पाहून औषध देत. याप्रमाणें अकरा वाजण्याच्या सुमारास आम्ही जेऊर स्टेशनावर येऊन पोहोंचलों. तेथें संध्याकाळपर्यंत मुक्काम करून संध्याकाळच्या गाडीनें सेकंडक्लासचा रिझर्व डबा करून रात्रीं दहा वाजतां पुण्यास येऊन पोहोंचलों. मुंबईस चि. बाबाभावोजी शिकत होते त्यांना आदले दिवशीं तार केली होती; त्याप्रमाणें ते व प्रिन्सिपाल वामन आबाजी मोडक असे जेऊरच्या स्टेशनावर येऊन मिळाले. त्याचप्रमाणें पुण्याहून कीर्तने व दुसरी मंडळी जेऊरासच आली होती. यांसकट आम्ही पुण्यास येऊन पोहोंचलों.

आजारीपणाची बातमी अगोदर दोन दिवस शहरभर पसरली होती, त्यामुळें सर्व मंडळी काळजींत होती. आम्ही "आज रात्रीं पुण्यास स्टेशनावर चांगला मेणा घेऊन या," अशी तार घरीं केली होती. त्याप्रमाणें आमच्या घरचीं माणसें मेणा घेऊन स्टेशनावर आलीं. त्या वेळीं दुसरी मित्रमंडळी स्टेशनावर भेटण्याकरितां आली होती. गाडी स्टेशनांत आल्याबरोबर मेणा आणून डब्याशीं लावला व धक्का न लावतां स्वतःला हळूच उचलून मेण्यांत ठेविलें व कोणाचीच प्रत्यक्ष भेट होऊं न देतां दारें बंद करून मेणा हळूहळू घराकडे रवाना केला.

ह्या दुखण्यांत अशक्तपणा इतका आला होता, कीं मनाला आनंद किंवा दुःख थोडें जरी वाटलें, तरी लागलीच मूर्च्छा येई. त्यामुळेंही पुढें भेटावयास येणाऱ्या मित्रांस व आप्तांस बरेच दिवस भेटू देऊं नये अशी डॉ. विश्राम यांनीं ताकीद दिली.

हें दुखणें चांगलें बरें होऊन कामावर जाऊं लागण्यास सुमारें दोन महिने लागले.

---

## भाग अठरावा.

# पांच हौद मिशनमधील चहाप्रकरण व ग्रामण्य.



सन १८९० सालीं आक्टोबरच्या चवदाव्या तारखेस संध्याकाळीं सेन्ट मेरीज कॉनव्हेंटमध्यें कांहीं समारंभ होता. त्यासंबंधानें मिशनरी लोकांनीं शहरांतील पन्नासपाऊणशें गृहस्थांना आमत्रंण केलें होतें. त्याप्रमाणेंच कांहीं बायकांनाही आमंत्रणें होतीं. आम्ही बायका व पुरुष मिळून शंभर मंडळी होतों. कांहींनीं निबंध वाचले व कांहींनीं भाषणें केलीं. हें काम आटोपल्यावर झनाना मिशनमधील सिस्टर्सनीं आपल्या हातांनींच चहा आणून मंडळीस दिला. कांहीं जणांनीं तर निव्वळ या बायकांचा मान राखण्याकरितां म्हणून त्यांनीं पुढें केलेले पेले आपल्या हातांत घेतले, व तसेच खालीं ठेवून दिले व कांहीं जण पेले हातांत घेऊन चहा प्याले. आम्ही बायका काय त्या दहाबाराजणीच होतों. आमच्याकडे चहा आला, तेव्हां आम्ही सगळयाजणींनीं तो घेण्याचें नाकारलें.

असो. हा समारंभ आटोपल्यावर आम्ही आपल्या घरीं निघून आलों. पुढें दोनतीन दिवसांनीं 'पुणें वैभवांत' गोपाळ विनायक जोशी यांच्या सहीनें ही कॉनव्हेंटमधील सर्व हकीकत प्रसिद्ध झाली व शेवटीं पत्रकारानें नेहमींच्या स्वभावाप्रमाणें वस्तुस्थितीला सोडून पुष्कळ कुत्सित टीका केली होती, आणि म्हटलें होतें, कीं, "हे रावसाहेब आणि रावबहादूर सुधारक लोक प्रत्यक्ष महारांनीं बनविलेल्या पण गोऱ्या मडमांच्या लुसलुशीत हातांनीं आपल्या हातांत आलेला चहा पिऊन मिटक्या मारीत व ढेंकरा देत आपापल्या घरीं निघून गेले. ही गोष्ट आमच्या पुणेंकर सनातन धर्माभिमान्यांस आणि ब्रह्मवृंदांस रुचते तरी कशी! हे रावसाहेब व रावबहादूर मोठमोठे हुद्देदार आहेत म्हणून कीं काय, ह्यांच्या घरीं जाऊन वर्षांतून दहापांच वेळां पक्वान्नें झोडण्यास आणि भरपूर दक्षणा घेण्यास मिळते,

तेव्हां त्यांचें नांव ही भिक्षुक मंडळी कशाला काढतात! गप्पच बसावयाची. गोपाळराव जोशांसारखा एखादा निर्धन मनुष्य अमेरिकेंतून किंवा विलायतेहून जाऊन आला, कीं, लागले त्याच्या पाठीस. त्याच्या पंगतीला बसण्याचा शब्द काढला-तरी पाप लागतें. तें तर नांवच नको. पण त्याला प्रायश्चित्त देऊन मोकळें करण्यासही कबूल होणार नाहींत. त्यांना दुरून प्यावयाला पाणी घातलें किंवा त्यांच्याशीं नुसतें भाषण केलें, तरी ही गोष्ट धर्मबाह्य झाली असें म्हणण्यास तयार होणारी आमची भिक्षुक मंडळी तोंडपुजी, लुबरी झाल्यामुळें आजकाल सुधारक शेफारून गेले आहेत," वगैरे वगैरे पुष्कळ लिहिलें होतें.

याच सुमारास आमच्या घरीं एक मेजवानी झाली, तेव्हां चाळीसपन्नास गृहस्थ जेवावयास आले होते. ते सर्व ब्राह्मणच होते; पण त्यांत डॉक्टर विश्राम रामजी घोले, रा. ब. नारायणभाई दांडेकर व रा. ब. गणपतराव मानकर येवढेच काय ते ब्राह्मणेतर होते. या दिवशीं गोपाळराव जोशीही आले होते. त्यांनीं दुसरेच दिवशीं पुन्हां 'पुणें वैभवां'त आमच्या घरच्या मेजवानीची सर्व हकीकत लिहून, जेवावयास बसलेली मंडळी कोणकोणत्या पंक्तीला बसली होती व पंक्ती कशा मांडल्या होत्या, त्याचा नीट नकाशाही काढून दिला होता. गोपाळरावांचा स्वभाव जात्या उद्योगी असल्यामुळें दुसरा विशेष कांहीं उद्योग नसेल, तेव्हां अशा तऱ्हेचीं कामें करण्याकडे त्यांची वृत्ति लागलीच वळे. त्यामध्यें त्यांची बुद्धि अति शीघ्र चाले. अशा गोष्टींची त्यांना जातीनें आवड असल्यामुळें ती करण्यांत त्यांना समाधान वाटे व करमणूकही होई, येवढाच काय तो फायदा. बाकी, त्यांना सनातन धर्माभिमानी काय व सुधारक काय, दोन्ही सारखेच. कारण, ते जातीनें धड हिंदु ना मुसलमान असेच बनले आहेत. असो.

हें छापून आल्याबरोबर पुण्यांतील भिक्षुक व गृहस्थ मंडळींत जी चळवळ झाली, त्यांत पुण्यांतील प्रसिद्ध घराण्यांतील श्री. बळवंत रामचंद्र नातू यांनीं या कामाचा पुढाकार घेऊन श्रीशंकराचार्यांकडे गाऱ्हाणें केलें. मग

'पुणेंवैभवां'तील लिहिण्यावर या मंडळीकडून कांहीं नकारार्थी उत्तर आलें नाहीं तर या सर्व ( चहापान करणाऱ्या ) मंडळींना बहिष्कृत करावयाचें असा भिक्षुक व गृहस्थ मंडळींनीं सभा भरवून ठराव केला. आमच्याकडून यासंबंधानें कांहीं नकारार्थी मजकूर प्रसिद्ध होईल म्हणून दोन आठवडे वाट पाहिली; पण तसें कांहींच न झाल्यामुळें वरील मंडळींनीं ' अमुक दिवशीं सभा भरवून पांच हौद मिशनमध्यें चहा प्यालेल्या बावन्न मंडळींना बहिष्कृत करावयाचें आहे,' वगैरे मजकुराचीं हस्तपत्रकें वांटून नेमलेल्या दिवशीं सभा भरविली व बावन्न मंडळींपैकीं बेचाळीस मंडळीस बहिष्कृत केलें. बाकीच्या दहा मंडळींनीं वरील ब्रह्मवृंदाला खाजगी पत्रें लिहून आपण हातांत पेले घेतले होते खरे, पण चहा प्यालों नाहीं, असें कळवून आपली दिलगिरी प्रदर्शित करून सुटका करून घेतली.

पुढें कांहीं दिवसांनीं श्रींनीं फिर्यादींतील मजकूर मनावर घेऊन आपल्याकडील एका शास्त्रीबोवांची योजना न्यायाधिशाचे कामीं करून त्यांना पुण्यास पाठविलें. ते पुण्यास आल्यावर त्यांनीं आरोपी (चहापान करणारे) यांस नोटिसा केल्या व त्यांत तुमचें काय म्हणणें आहे तें कळवावें, असें फर्माविलें.

याबद्दल सदरहु मंडळीकडून कैफियत घेऊन चौकशीस सुरुवात झाली. त्या चौकशीचे कामीं बाळ गंगाधर टिळक व रघुनाथ दाजी नगरकर हे चहावाल्यांच्या तर्फेनें वकील होते. फिर्यादीतर्फेनें पुण्यांतील दुसऱ्या पक्षाचे अभिमानी प्रसिद्ध वकील नारायण बापूजी कानिटकर हे होते. याप्रमाणें या चहाप्रकरणाच्या चौकशीस आरंभ झाला. गांवांत शुक्लपक्ष व कृष्णपक्ष असे दोन तट उत्पन्न झाले. त्यामुळें भिक्षुकांची व त्यांच्याहीपेक्षां अधिक आमच्या सासुरवासिनी व माहेरवासिनी मुलींची त्रेधा उडाली.

. असें झाल्यावर एके दिवशीं आमच्या वन्संनीं स्वतःला विचारलें "या दहा मंडळींनीं जशीं पत्रें लिहिलीं, तसें आपणसुद्धां कां लिहू नये? तुम्हीं तर हातांत पेला घेतल्याबरोबर खालीं ठेवला. चहा तोंडालासुद्धां लाविला नाहीं हें आपण समक्ष पाहिलें असें यमुना परवां म्हणत होती. मग ही

खरी गोष्ट लिहिण्यास काय हरकत आहे ! न करितां लोकांकडून दोष व अपवाद कां घ्यावा ? ”

तेव्हां स्वतः म्हटलें “ वेडी आहेस, असें कसें करतां येईल ! मी जर मंडळींतला आहें, त्यांच्यापैकींच एक आहें असें म्हणवितों, तर त्यांनीं जी काय गोष्ट केली, ती मीं केली नसली तरी केल्यासारखेंच आहे. चहा पिणें किंवा न पिणें यांत कांहीं पापपुण्य आहे, असें मला वाटत नाहीं; पण ज्यामध्यें आपल्याबरोबर उठणारी बसणारी चार मंडळी गुंतली आहे, त्यांतून एकटें सुटून जाणें मला कधींच आवडणार नाहीं. जें झालें तें झालें, त्याबद्दल इतकें काय मोठें आहे ! ”

यावर वन्सं म्हणाल्या “ तुम्हाला याबद्दल कांहीं वाटावयाचें नाहीं; पण आम्हांला घटकोघटकीं अडचण पडेल. उद्यां श्राद्धपक्षाससुद्धां ब्राह्मण मिळण्यास अडचण पडणार आहे. त्याला काय करावें ? ”

यावर स्वतः म्हटलें “याबद्दल तूं काळजी करूं नकोस. मनुष्य सर्व बाजूंनीं विचार केल्यावांचून कोणत्याहि गोष्टीला प्रवृत्त होत नाहीं. येऊन-जाऊन भिक्षुक मंडळींचीच अडचण ना ! तुम्हांला किती माणसें पाहिजेत तितक्यांची तजवीज होईल, मग कांहीं कुरकूर नाहींना ! यासंबंधानें बराच खर्च ठेवावा लागेल; पण त्याला कांहीं उपाय नाहीं. ”

हें ऐकून वन्सं गप्प बसल्या. पण स्वतःला मात्र ही तजवीज लौकर करण्याची विवंचना लागली. कारण, आपल्या कुटुंबांतील कोणत्याही मनुष्यास, त्यांत वडील बायकांना असंतुष्ट ठेवणें स्वतःच्या मनाला कधीं आवडलें नाहीं. घरांतील माणसें असंतुष्ट असणें हा घर चालविणाऱ्या मुख्य माणसाला कमीपणा आहे, अशी स्वतःची समजूत असे. क्वचित् वेळीं अशी गोष्ट घडून आलीच तर तिचा बोल आपल्याला लावून घेण्याची चाल असे.

यावेळीं आमच्या घरांत वासुदेवशास्त्री अभ्यंकर, श्रीपतीबोवा भिंगारकर, घरचे कुलोपाध्याय व पुराणिक याप्रमाणें चार आश्रित तर कायमचे होतेच. याशिवाय आणखी दोन वैदिक ब्राह्मण सालिना शंभर रुपये देऊं

करून ठेवून घेतले. हेतु हा, कीं, ग्रामण्यामुळें भिक्षुकांची अडचण आपल्या घरांतील माणसांना जशी केव्हांही वाटूं नये, तशीच आपल्या पक्षांतील इतर सर्व मंडळींचीही अडचण दूर व्हावी. यांपैकीं कोणत्याही गृहस्थाच्या घरीं होमहवनादि संस्कार, व्रतेंवैकल्यें व मुंजलग्नादि कार्यप्रस्थ निघालें असतां या आमच्या ब्राह्मणांनीं तेथें जाऊन तें चालवावें, पण कोणाचें अडूं देऊं नये.

याप्रमाणें या दोन वर्षांत बऱ्याच लोकांच्या घरीं या आमच्या आश्रित मंडळींचा पुष्कळ उपयोग झाला. ही ब्राह्मणांची तजवीज झाली, म्हणून आमच्या घरांतील वडील बायकांना या ग्रामण्यासंबंधानें कुरकुर करण्यास फारशी जागा राहिली नव्हती.

पुढें या बेचाळीसजणांपैकीं कांहींनीं अशी तक्रार सांगावी, कीं, " या ग्रामण्यापासून आम्हां पुरुषांना तादृश त्रास होत नाहीं,पण आमच्या बायका-मंडळींना विशेष त्रास झाला आहे. पहिल्यापहिल्यानें वर्ष सहा महिने कांहीं न बोलतां त्यांनीं मोठ्या धीरानें काढले; पण अलीकडे मात्र त्या त्रासल्या-सारख्या झाल्या आहेत. त्या म्हणतात, जे चहा प्याले ते मोकळेच राहिले, आणि शिक्षा काय ती आमच्या मुलींना भोगावी लागत आहे. असें म्हणून प्रत्येक सण आला कीं त्या असंतुष्ट असतात, व त्यांच्या डोळयांला पाणी आल्याशिवाय रहात नाहीं. आज दोन वर्षांत गांवांत दिलेल्या आमच्या मुलींचें एकदांसुद्धां माहेरीं येणें झालें नाहीं. त्या कंटाळून वरचेवर निरोप पाठवितात, तें ऐकून आमच्या बायकामंडळींना फार वाईट वाटतें. ही गोष्ट एखादे वेळेस आम्हीं प्रत्यक्ष पाहिली म्हणजे याबद्दल आतां पुढें काय करावें असें वाटून कांहीं सुचेनासें होतें. "

अशा गोष्टी वारंवार कानांवर येऊं लागल्यामुळें याबद्दलचा स्वतःचा कांहीं विचार चाललाच होता. तशांत सन १८९२ सालच्या वैशाख मासीं आमचे एक मित्र बाहेरगांवाहून मे महिन्याच्या सुट्टीमध्यें आपल्या घरीं पुण्यास आले होते. त्यांच्या घरांत वडील मातोश्री, चुलता, चुलती, चारपांचजण भाऊ, भाऊजया, बहिणी, त्यांचीं सर्वांचीं मुलें व आमच्या

मित्रांचीं मुलें असा मोठा परिवार होता. हे गृहस्थ चहाप्रकरणापैकीं एक असून त्यांनीं प्रायश्चित्त घेतलें नव्हतें.

याच वैशाखांत यांचे घरीं एकदोन लग्नें व्हावयाचीं होतीं. यांचे एक चुलते यांच्या बरोबरीचे होते, पण मतानें यांच्या अगदीं उलट होते. यांचे वडील घरांतील मुख्य, कुटुंब चालविणारे व मायाळू असल्यामुळें, वडील चिरंजीव व धाकटे बंधु हे दोघेही मतानें परस्पर अगदीं विरुद्ध होते, तरी या दोघांनाही समेटून धरून शांततेनें त्यांनीं घर चालविलें होतें. अशा वेळीं वडील चिरंजीवांचें घरीं येणें आणि प्रायश्चित्त घेतल्यावांचून घरांत राहणें ही गोष्ट त्यांच्या ( मित्रांच्या ) वडिलांना फार संकटाची वाटून "आपल्या घरांत कार्य आहे, तेव्हां शंकराचार्यांच्या निकालाची वाट न पाहतां प्रायश्चित्त घेऊन मोकळे व्हा," वगैरे म्हणून त्यांनीं प्रायश्चित्त घेण्याकरितां आपल्या चिरंजीवांची परोपरीनें समजूत केली; पण ही गोष्ट चिरंजीवांना किंवा त्यांच्या पत्नीला म्हणजे वडील सूनबाईंना रुचेना- त्यांना वाटलें, कीं, "आम्हीं जें कांहीं केलें, त्यांत कांहीं पाप केलें नाहीं, अशी आमची समजूत असून, नुसतें या मंडळींना खूष करण्याकरितां किंवा लग्नामध्यें चार दिवस मिरविण्याकरितां प्रायश्चित्त घ्यावें, हें कांहीं ठीक नाहीं." असा विचार ह्या दंपत्यानें ठरवून या कामीं स्वतःचें मत काय आहे तें विचारलें.

तेव्हां स्वतः सांगितलें "त्यांची व तुमची दोघांची अडचण निघण्यास एक उपाय आहे. तो हा, कीं, तुम्ही आपलीं मुलेंमाणसें घेऊन सुटी संपेपर्यंत लोणावळ्यास आमच्या बरोबर राहण्यास या."

त्याप्रमाणें घरच्या माणसांचा विचार घेऊन मुलांसुद्धां हें दंपत्य आमच्या बरोबर लोणावळ्यास राहण्यास आलें. संकटामुळें कां होईना, या त्यांच्या येण्यानें मला मात्र फार आनंद झाला. कारण, त्यांचें कुटुंब व मी जुन्या मैत्रिणी आहों, व त्यांची आणि माझी जरी वर्षांतून दोनतीन दिवस गांठ पडत असे, तरी पण आम्हां दोघींना कांहीं दिवस तरी एके ठिकाणीं रहावयास

मिळावें, असें मला फार वाटत होतें. तो योग यामुळें घडून आला व आम्हां दोघींचें महिना दीडमहिना एका घरांत राहणें झालें.

अर्थात्, ही गोष्ट त्याच्या वडिलांच्या जिवाला फार लागली. वडील चिरंजीव सुट्टीमध्यें मुलेंमाणसें घेऊन घरीं आले असतांना, आपल्या येवढ्या मोठ्या कुटुंबांतून चिरंजीव, सूनबाई व तीन नातवंडें यांना बाहेर जावें लागलें, ही गोष्ट त्यांना चैन पडूं देईना, त्यांनीं चिरंजीवांना वारंवार पत्रें लिहावीं, कीं, "तूं प्रायश्चित्त घेऊन घरीं ये व मला म्हातारपणीं संतुष्ट कर."

चिरंजीव जरी सुधारक मताचे अभिमानी होते, तरी मनाचे कोंवळे व प्रेमळ असल्यामुळें हीं पत्रें वाचून त्यांना कसेंसेंच होऊन जाई. असे आठपंधरा दिवस गेल्यावर वडिलांचीं एकदोन पत्रें त्यांनीं जवळ दाखविलीं व तोंड गोरेंमोरें केलें. तें पाहून **स्वतः**ला बरें वाटलें नाहीं. थोडा वेळ विचार करून म्हटलें "मी जर तुमच्या जागीं असतों, तर सर्व मानहानि व कमीपणा सोसून आपल्या वडिलांना संतोषित केलें असतें."

हें ऐकून ते म्हणाले "मग अशा तऱ्हेच्या अडचणींत आमच्यापैकीं पुष्कळजण आहेत, तेव्हां सगळ्यांच्या बरोबर आपणच जर प्रायश्चित्त घेतलें, तर आम्हांला घेण्यास बरें वाटेल."

यानंतर पुण्याहून आणखी दहापंधरा मंडळी आली. तेव्हां प्रायश्चित्त घेण्याबद्दल पुष्कळ भवति न भवति होऊन शेवटीं नगरकरांनीं सगळ्यांच्या तर्फेनें म्हणून सांगितलें, कीं, "आम्हां सर्व मंडळींच्या सुटके-करितां आपण प्रायश्चित्त घ्यावें, असें आमचें म्हणणें आहे."

हें ऐकून **स्वतः** म्हटलें "असें असेल तर मीही प्रायश्चित्त घेईन. त्याबद्दल माझी कांहीं अट नाहीं. तुम्ही पुण्याला जाऊन दिवस नक्की ठरवा व मला कळवा म्हणजे एक दिवसाकरितां मी पुण्यास येईन."

याप्रमाणें ठरल्यावर, ही पुण्याहून भेटण्यास आलेली मंडळी परत गेली आणि चारपांच दिवसांनीं 'अमुक दिवशीं प्रायश्चित्त घेण्याचें ठरलें आहे, आपण पहांटेचे गाडीनें येथें यावें,' असें नगरकरांचें पत्र आल्यावर दुसरे

दिवशीं पहांटेच्या पांचाच्या गाडीनें स्वतः व आमच्या घरीं राहण्यास आलेले मित्र, असे दोघे पुण्यास गेले.

हें स्वतःचें जाणें मला अतिशय दुःसह वाटलें. कांहीं तरी विशेष गुन्हा केला असून कोणीं तरी शिक्षा करण्यास घेऊन जात असावें, अशा वेळीं जें काय मला वाटलें असतें, त्यापेक्षां या वेळीं थोडेंसें जास्त दुःख नव्हे, पण मानहानि माझ्या मनाला वाटून मला रडूं आलें. वेळ पहांटेची असल्यामुळें मी तशीच बिछान्यांत पडून राहून दहावीस मिनिटें आपल्या मनाला यथास्थित मोकळीक दिली. पहिला वेग थोडा कमी झाल्यावर मग यासंबंधानें मी विचार करीत पडलें. कोणत्याही रीतीनें मनाला समाधान वाटेना. ज्यांना अडचण पडली होती त्यांनीं पाहिजे तर प्रायश्चित्त घ्यावयाचें होतें; पण आम्हांला यामध्यें गुंतवून सर्वस्वीं मानहानि कां केली ? आमचें प्रायश्चित्तावांचून काय अडलें होतें व स्वतःच्या भिडस्थ स्वभावाचा अशा रीतीनें फायदा घेणारी ही मित्रमंडळी का म्हणावयाची ! बरें, स्वतः तरी अशा गोष्टींत लोकांचें कां बरें ऐकलें ? या मंडळीकरितां काय हवें तें करावयास तयार व्हावयाचें, व लोकांकडून नांवें ठेवून घ्यावयाचीं, अशी पहिल्यापासून संवयच आहे. अशा तऱ्हेचे उद्वेगजनक व कांहीं त्रासाचे विचार सगळा दिवसभर माझ्या मनांत घोळत होते, त्यामुळें माझा तो दिवस अगदीं उदास व खिन्नपणाचा गेला.

या वेळीं माझी दुसरी एक मैत्रीण आमच्या घरीं कांहीं दिवस राहण्यास लोणावळ्यास आली ती घरांतच होती; पण साऱ्या दिवसांत दहा शब्दसुद्धां आम्ही एकमेकींशीं बोललों नाहीं. कारण, या वरील विचारानें माझें मन उद्वेगलेलें असल्यामुळें कांहीं काम करण्यास किंवा कोणाशीं बोलण्यास सुचेना.

संध्याकाळच्या गाडीनें स्वतः परत आल्यावर मला एकदम संमोर जाववेना.कारण,मला वाटलें,कीं,सकाळच्या गोष्टीबद्दल स्वतःला फार वाईट वाटलें असावें व मी समोर गेल्याबरोबर कदाचित् अधिक वाईट वाटेल व मग

मला तर समोर उभेंसुद्धां राहवणार नाहीं. त्यापेक्षां होईल तितकें करून एव्हां समोर जाऊं नये हेंच बरें. असा विचार करून मी कांहीं कामांत गुंतलेली असल्यासारखी आंत आंतच राहिलें; पण बाहेर काय चाललें आहे म्हणून दोनतीन वेळ कानोसा घेतला व डोकावून पाहिलें, तों माझ्या नजरेस असें आलें, कीं, **स्वतः**ची वृत्ति अगदीं रोजच्यासारखी शांत असून, टपाल पाहणें व वर्तमानपत्रें वाचणें हीं रोजचीं कामें एका-मागून एक स्वस्थ मनानें चाललीं आहेत. **स्वतः**च्या मनाला कोणत्याही रीतीनें उद्वेग किंवा तळमळ दिसेना. हें पाहून मला फार आश्चर्य वाटलें.

पुढें जेवणाची वेळ झाल्यावर सर्व मंडळी जेवावयास बसली. जेवते वेळींही अगदीं शांत वृत्तीनें रोजच्याप्रमाणें बोलत व हंसत जेवण झालें. मग तासभर तेथेंच बसून नित्याप्रमाणें बोलून व विचारपूस करून निजावयास जाणें झालें.

जों जों मी अशा गोष्टी पाहीं, तों तों मला फार नवल वाटे व असें होतें कसें; सकाळच्या गोष्टीबद्दल कांहींच त्रास झाला नसेल कीं काय; असें तर होणारच नाहीं; त्रास तर झालाच पाहिजे; पण तो बाहेर न दाखवितां मनांतल्या मनांत ठेवून पुन्हा वृत्ति रोजच्यासारखी शांत व साधी राखणें आणि नित्यक्रमांत यत्किंचित्‌ही अंतर न पडूं देणें या गोष्टी सहज साधतात तरी कशा, याबद्दल माझें मलाच मोठें गूढ वाटूं लागलें.

आज घरीं आल्यावर आपण **स्वतः**ला अमुक अमुक विचारूं, अमुक बोलूं वगैरे करून ठेवलेला माझा विचार जागच्या जागींच विरघळला. "पुण्यांतील सर्व माणसें बरीं आहेतना ?" येवढें मात्र मीं विचारलें. या-शिवाय कांहीं बोललें नाहीं. बोलण्याचें माझ्या मनांत होतें, पण शब्दच निघेना. स्वतः सांगितलें नाहीं, पण मी गड्याला तूप लावण्यास बोला-वून नित्यासारखी आलेल्या मराठी पुस्तकांपैकीं एक पुस्तक घेऊन वाचीत बसलें; तरीही स्वतः कांहीं 'नको, होय' म्हटलें नाहीं. झोंप लागेपर्यंत लक्ष देऊन शांतपणें ऐकणें चाललें होतें. ऐकतां ऐकतां झोंप

लागली असें पाहून मीं पुस्तक मिटलें व दिवा लांब ठेवून गड्याला "पुरे आतां, तूं जा," असें सांगून अंथरुणावर पडलें आणि बऱ्याच वेळानें झोंपीं गेलें. नित्याप्रमाणें आम्ही पहांटे जागीं झालों, पण यासंबंधीं कोणी कोणाशीं बोललों नाहीं. नेहमींसारखें **स्वतः** श्लोक म्हणून भजनास आरंभ केला व तें संपतांच उठून आपल्या नित्य क्रमाला जाणें झालें.

माझ्या मनांत मात्र इतका वेळ आपण होऊनच आतां कालच्याबद्दल कांहीं तरी विचारावें असा विचार घोळत होता, तो तसाच राहून गेला. पुढें आठनऊ वाजतां आमच्यासारखे, सुट्टीमध्यें लोणावळयास रहावयास आलेल्या मित्रांपैकीं दोनतीन मित्र भेटावयास आले, व आदले दिवसाच्या संबंधानें बोलणें सुरू होऊन बोलतां बोलतां ती मंडळी जरा जोरांत आली, तरी **स्वतः**च्या वृत्तींत यत्किंचितही पालट पडला नाहीं. त्यांच्याशीं उलट अगदीं शांतपणानें व समजूत घालण्याच्या स्वरांत बोलणें चाललें होतें; पण या तापलेल्या मंडळींना तें कांहीं रुचलें नाहीं. तिसरे दिवशीं टाइम्समध्यें एकदोघां मित्रांनीं आपल्या सहीनें खूप कडक टीका करून आमच्या या प्रायश्चित्तासंबंधानें पत्रें लिहिलीं होतीं. तीं पाहिल्यावर **स्वतः** आरंभापासून शेवटपर्यंत वाचलीं तरी स्वतःला थोडा उद्वेग वाटला नाहीं किंवा तोंडाबाहेर ब्र काढला नाहीं.

या गोष्टीला आणखी एकदोन दिवस झाले. **स्वतः**ची इतकी शांत वागणूक पाहून मला मोठा चमत्कार वाटला, व राग आणि उद्वेग अगदीं नाहींसा होऊन माझी वृत्ति अगदीं थंड झाली. मग मीं एकदां सहज विचारलें "हें प्रायश्चित्त कशाला घेतलें बरें ? चोहोंकडून आतां किती त्रास होत आहे. विरुद्ध बाजूच्या लोकांनीं कितीही नांवें ठेविलीं तरी त्याबद्दल मन तयार असतें म्हणून तितकें वाईट वाटत नाहीं; पण परवां सकाळीं इतक्या जुन्या व आपल्या म्हणविणाऱ्या मित्रांचे उद्गार ऐकून मला अतिशय वाईट वाटलें. दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न झाल्यामुळें आंतून धडधड होऊन अशा एखाद्या संधीची ते वाटच पहात होते कीं काय, असें मला त्यांच्या उद्गारांवरून व बोलण्याच्या स्वरावरून वाटलें."

तेव्हां स्वतः म्हटलें "आपण असा गैरसमज कां करून घ्यावा? ज्याचें त्यानें करीत असावें. कोणीं कांहीं म्हटलें म्हणून आपण आपल्याचकरितां हें केलें, असें तर होत नाहींना ? खरी स्थिति आपल्या मनाला माहीत असली म्हणजे झालें. जी मंडळी आपली म्हणावयाची व ज्यांना आपल्या बरोबर घेऊन वागावयाचें, त्यांच्याकरितां लोकांकडून थोडा वाईटपणा आला म्हणून काय झालें ? "

मीं म्हटलें " खरीं कारणें जीं आहेत तीं आपलीं आपल्याला माहीत; पण तीं परक्यांना कशीं समजावींत ? लोकांत उगीच गैरसमज माजून राहतो कीं नाहीं ? काल सकाळीं......कुत्सितपणानें व अशा रागानें बोलत होते, कीं, जशी काय ही गोष्ट आम्हीं आपल्या स्वार्थाकरितांच केली आहे ! ज्यांना इतक्या वर्षांच्या सहवासानें स्वतःच्या स्वभावाची खरी ओळख होऊं नये, ते आपल्याला मित्र तरी कसे म्हणून घेतात ! मित्रत्व म्हणजे एकमेकांच्या अंतःकरणाची योग्यता व किंमत समजली पाहिजे. तसें झालें नाहीं तोंपर्यंत हें नुसतें शब्दांतच राहतें. '

तेव्हां स्वतः म्हटलें "त्यांचा स्वभाव जरा तसाच आहे. त्यांनीं कांहीं म्हटलें म्हणून काय झालें ? त्यांना खरें काय आहे, हें समजत नाहीं कीं काय ? पण मनुष्य एकदां अभिमानाला पडलें म्हणजे या आवेशामध्यें तें तसेंच बोलत असतें; हा मनुष्यस्वभाव आहे. अशा वेळीं त्याला दुसऱ्या बाजूचा विचार रहात नाहीं. याच लोकांनीं शांत मनानें अधिक विचार केला तर आज जशा जोरानें ते आमचेवर प्रहार करीत आहेत, तितका पुढें करणार नाहींत. त्यांना नांवें ठेवतेस, पण कालपर्यंत तूंच किती आठरल्या-सारखी झाली होतीस बरें! त्यांच्यापेक्षां तुला हें अधिक समजावयाला नको होतें का? आमचे मुलगे किंवा मुली मुंजीलग्नाला खोळंबल्या नव्हत्या, किंवा घरांतील कोणतेंही कृत्य ब्राह्मणाकरितां अडलें नव्हतें. ग्रामण्य झालें म्हणून तुमच्या घरांत कधीं काय अडलें होतें काय ? तुमचें जें चालावयाचें तें पहिल्यासारखें सर्व नीट चाललें होतें. असें असून प्रायश्चित्त घेतलें हा

आमचाच दोष आहे, असें तुलाही वाटलें. ही विकारवशता नव्हे काय ? अशा तऱ्हेचे समज कांहीं दिवस राहून ज्याला जसें वाटेल, तसें तो बोलेल, हें आम्ही समजून आहों. मनुष्य जी गोष्ट करतो ती पूर्ण विचारानें करतो, घाईनें कोणतीही गोष्ट करीत नाहीं, अशी मनाची खात्री ठेवावी. एखाद्या गोष्टीची असावी तितकी माहिती नसली तर विचारून घ्यावी. यासंबंधानें मागील अनुभवावरून तरी मन शांत ठेवावें. उगीच आपल्याला त्रास करून घेण्यांत तरी काय फायदा आहे ? ”

हें ऐकिल्याबरोबर मला अगदींच ओशाळल्यासारखें झालें आणि माहिती करून घेण्याच्या बुद्धीनें, आधीं विचारून न घेतां एकदम दोष देण्यासारखें मी कां बरें बोललें, याचा मला पश्चात्ताप होऊन पुनः पुनः फार वाईट वाटलें. असो.

मे महिन्याच्या सुट्टीमध्यें आमचे एक मित्र व त्यांची पत्नी आपल्या तीन मुलांसह आमच्याबरोबर लोणावळयास रहावयास आल्याचें मीं वर लिहिलें आहे. ते प्रायश्चित्त घेऊन लोणावळयास आले. त्या वेळेस **स्वतः** व्हरांड्यांत एका आरामखुर्चीवर बसून भावोजी वर्तमानपत्रें वाचीत होते, तें ऐकणें चाललें होतें. सद्रहू गृहस्थ पाहिरीजवळ आलेले पाहून व हंसून **स्वतः** त्यांना विचारलें “ कां कसें काय झालें ? ”

त्याबरोबर लागलीच ते म्हणाले “आपण म्हटल्याप्रमाणेंच मला दाखला आला. वडिलांच्या खऱ्या प्रेमाचा व त्यामुळें होणाऱ्या सुखाचा अनुभव मला या वेळेस आला. प्रायश्चित्त घेऊन मी उठल्याबरोबर आतां वडिलांना नमस्कार करा असें ब्राह्मणांनीं मला सांगितलें, म्हणून मी दादाजवळ जाऊन नमस्कार करण्यास खालीं वांकलों व नमस्कार केला. तोंच दादांनीं मला पोटाशीं धरून अगदीं मिठी घातली, आणि ते गहिंवरून म्हणाले ‘इतक्या माणसांत तूं आज मला धन्य केलेंस’ असें म्हणतांना त्यांच्या डोळयांतून पाणी येऊं लागलें व तें पाहून माझ्याही डोळयांतून पाणी आल्यावांचून राहिलें नाहीं. यापूर्वीं दादा इतक्या प्रेमानें वागल्याचें किंवा त्यांच्या डोळयां-

तून अश्रु आल्याचें मीं कधीं पाहिलें नव्हतें. अगदीं प्रायश्चित्त घेण्याच्या वेळेपर्यंत आपण करतों हें बरें नाहीं असें मलाही वाटत होतें; पण ही दादांची वागणूक पाहून आपण केलें तें चांगलें केलें, असें मला वाटलें. "

## भाग एकोणिसावा.

## सोलापूरचें दुखणें.

सन १८९३ सालीं जेव्हां आम्ही सोलापूरच्या स्वारीस जाण्यास निघालों, तेव्हां पहिला मुक्काम माढ्यास झाला. दोनतीन दिवस तेथें मुक्काम होता. त्या अवधींत एखादें व्याख्यान व्हावें असा कांहीं मंडळींनीं येऊन आग्रह केला. तेव्हां होय म्हणून दुसरे दिवशीं माढ्यास सुमारें तास सव्वा तास व्याख्यान दिलें. तेथून आम्ही सोलापुरास गेलों. तेथेंही या खेपेला मंडळींनीं व्याख्यान देण्याविषयीं इतका आग्रह कां केला कोण जाणे! त्या वेळीं कसलीशी चळवळ होती व मंडळींचे डोळे कोणत्या विषयाकडे लागले होते हें मला बरोबर आठवत नाहीं; पण हिंदुस्थानांतील औद्योगिक प्रगति व व्यापार विषय असावा, असें वाटतें. कारण, सोलापुरास उघड्या मैदानांत तीन दिवस एकसारखीं याच विषयावर व्याख्यानें होत होतीं. प्रत्येक दिवशीं तास दीड तास व्याख्यान चाले व शेवटच्या दिवशीं तर तें व्याख्यान दोन सव्वा दोन तास एकसारखें आवेशानें झालें.

शेवटचें व्याख्यान झालें, त्या रात्रींच एक झोंप झाल्यावर पोटांत एकसारख्या कळा येऊं लागल्या. मीं पोट ऊन पाण्याच्या पिशवीनें शेकलें, चोळलें व नेहमींचीं माहीत होतीं तीं औषधें दिलीं, तरी पोट दुखणें राहीना. कळा एकसारख्या अतिशय येऊं लागल्यामुळें पहांटे चार वाजेपर्यंत अतिशय त्रास झाला. सकाळीं डॉ० किर्लोस्कर यांना बोलाविलें. त्यांनीं येऊन अवश्य ते उपाय केल्यावर मग पोट दुखणें थोडें कमी झालें, पण अजीबात

थांबलें नव्हतें; तथापि एक वाजल्यापासून पांच वाजेपर्यंत असह्य पोटदुखी-च्या वेदना सोसल्यानें शरीर व जीव अतिशय गळून गेला होता, म्हणून थकल्यामुळें ग्लानि आलेली होती. त्यांत झोंपही येऊं लागली, म्हणून थोडी कण्हेरी खावयास घालून व औषध देऊन मी तेथेंच उशाशीं स्वतःला हळूहळू थोपटीत बसलें व 'आतां जितकी झोंप येईल तितकी चांगली; कारण, विश्रांतीची फार गरज आहे; कोणी गडबड न करितां स्वस्थ पडूं द्या,—मीं औषधही झोंपेचें दिलें आहे; तेव्हां झोंप लागली तरी काळजी करण्याचें कारण नाहीं. विश्रांति मिळूं द्या,' असें सांगून डॉक्टर निघून गेले. त्याप्रमाणें तो सर्व दिवस बहुतेक विश्रांतींतच गेला. दर दोन किंवा तीन तासांनीं थोडीशी कण्हेरी व औषध मात्र घालावयाचें. असा सर्व दिवस जाऊन त्या रात्रीं झोंपही बरी आली. दिवसभर अंगांत जो थोडासा ताप होता, तोही उत्तररात्रीला दोनतीन वाजतां उतरून उजाडतां अगदीं बरें वाटलें, तरी उठून बाहेर जाण्याची शक्ति नव्हती, म्हणून जवळच पडदा लावला होता तेथें मुखमार्जनादि उरकून पुनः येऊन अंथरुणावर बसणें झालें. मीं थोडीशी साबुदाण्याची खीर व औषध दिल्यावर जवळ हवालदार उभा होता, त्याला स्वतः सांगितलें "शिरस्तेदारांना बोलाव व कालचे सह्यांचे कागद मागव."

त्याप्रमाणें त्यानें केलें. शिरस्तेदार व इतर कारकून सह्यांकरितां आपापले कागद घेऊन आले. त्या सर्व कागदांवर स्वतः नेहमींप्रमाणें सह्या केल्या व टाइम्स उघडून स्वतः टेलिग्राम्स वाचले. पहांटे प्रकृतीस बरें वाटलें, अशा समजुतीवर पांच वाजल्यापासून नऊ वाजेपर्यंत हे एकदम केलेले श्रम सोसले नाहींत. पाठ दुखूं लागली. पायाच्या पोटऱ्या वळूं लागल्या व एक-दम थंडी भरून आली; त्यामुळें पांघरूण घेऊन स्वस्थ पडावें लागलें. दोन तासपर्यंत थंडी वाजल्यावर खूप सपाटून १०५।८ डिग्री ताप भरला, तो संध्याकाळीं सहा वाजेपर्यंत उतरला नाहीं. मध्यंतरीं दोन वाजतां मुंबईस हायकोर्ट जज्जाच्या जागीं आपली नेमणूक केली आहे असा गव्हर्नरसाहेबां-

कडून लखोटा आला; तो शिरस्तेदारांनीं फाडून माझ्याकडे आणून मला वाचून दाखविला व ही बातमी जवळ सांगावी अशा विचारानें ते दोन-तीन वेळ येऊन पडद्याशीं डोकावून गेले; पण मीं त्यांना नको म्हणून हातानें खूण केली. मला अशी भीति वाटली, कीं, इतक्या तापांत अशा आनंदाची बातमी स्वतःला कळविली तर आनंद होऊन तापांत कदाचित् या आनंदाच्या बातमीमुळेंच झटका होईल. म्हणून मीं तो हुकूम तसाच ठेवण्यास सांगितलें. मग रात्रीं अकरा वाजतां ताप उतरला व रात्रीं झोंप चांगली लागली.

सकाळीं हुषारी चांगली वाटूं लागली, म्हणून शिरस्तेदारास मीं हुकूम आणून दाखविण्यास सांगितलें. हुकूम पाहिल्यावर स्वतःचे मनास कांहींच विशेष वाटलेंसें दिसलें नाहीं. अगदीं सहज वृत्तीनें शिरस्तेदाराकडे पाहून म्हटलें “ तर मग आपल्याला येथील काम आटोपून पुण्यास लवकर जावें लागेल असें दिसतें. ”

शिरस्तेदार निघून गेल्यावर माझ्याशींही त्यासंबंधाचे कांहीं उद्गार निघाले नाहींत, हें पाहून मला माझे ठिकाणींच आश्चर्य वाटलें व आदले दिवशीं वाटलेल्या भीतीचें माझें मलाच हंसूं आलें. किती तरी मी वेडी? कीं, अहोरात्र, तपेंच्या तपें जवळ असून मला स्वतःच्या स्वभावाची व त्यांत असलेल्या सद्गुणांची परीक्षा होऊं नये व अशी क्षुल्लक भीति वाटावी! ज्या ठिकाणीं दुःखाचा डोंगर कोसळला तरी डगमगावयाचें नाहीं, किंवा सुखाच्या लाटा येऊन आदळल्या तरी हर्षातिरेक व्हावयाचा नाहीं, दुःख किंवा आनंद विशेष बारीक रीतीनें निरीक्षण करून पाहणाऱ्या जवळच्या माणसास मात्र समजावयाचें, बाकीच्या सहज पाहणाऱ्या माणसांच्या लक्षांत यावयाचें नाहीं, असा स्वतःचा स्वभाव असतां व तो मला माहीत असतांना याच वेळीं अशी वेड्यासारखी भीति कां वाटली कोण जाणे. असो.

पुढें दोन दिवसांनीं आम्हीं सोलापुराहून पुण्यास येण्याचा बेत केला. दुसरे दिवशींच सोलापूरची मंडळी डेप्युटेशन घेऊन आली, कीं, “आमच्या

गांवीं या नेमणुकीचा हुकूम आला आहे, तेव्हां याबद्दल पानसुपारी करण्याचा मान आमच्या गांवास पहिल्यानें मिळाला पाहिजे. पानसुपारी घेतल्याशिवाय आम्ही जाऊं देणार नाहीं. ”

स्वतः आजारी असल्यामुळें हा निरोप त्यांनीं मला सांगितला व “ कोणत्या वेळीं बेत करूं याबद्दल स्वतःचा विचार घेऊन आम्हांस सांगा ” असें म्हणाले. त्यावेळीं मी स्वतःस या बाबतींत विचारिलें, तेव्हां सांगितलें, “ मला अद्याप बसवत नाहीं व बोलण्याची शक्ति नाहीं, तोंपर्यंत कोणाचीच पानसुपारी घ्यावयाची नाहीं. ”

हा निरोप मीं मंडळींना सांगितला, तरी त्यांनीं आपला हट्ट सोडला नाहीं. मंडळी म्हणाली “आम्ही बोलण्याचे श्रम देणारच नाहीं. स्टेशनावर पोहोंचवावयास येऊं, त्या वेळीं आगगाडी चालू व्हावयाचे आधीं आम्ही आपला पहिला हार घालूं, म्हणजे झालें,” त्याप्रमाणेंच त्यांनीं केलें.

दुसरी मंडळी स्टेशनावर आली. बरोबर त्यांनीं हार, विडे, फुलें यांच्या पाट्या भरून आणल्या होत्या. स्वतःला हें कांहीं माहीत नव्हतें. स्वतः सेकंड क्लासांत स्वस्थ पडून रहाणें झालें होतें. गाडी निघण्याच्या आधीं दोन मिनिटें श्रीमंत अप्पासाहेब वारद, नागपुरकर वकील, डॉ० किर्लोस्कर वगैरे मंडळी डब्यांत आली व विडा पुढें ठेवून स्वतःच्या गळ्यांत हार घातला. गाडी निघण्याची वेळ झाली, आम्ही जातों, असें म्हणून मंडळी खालीं उतरली, तोंच शिटी झाली व मंडळींनीं पाट्यांतून फुलें घेऊन डब्याच्या आंत फेंकून मोठ्यानें स्वतःच्या नांवाचा त्रिवार जयघोष केला आणि गाडी स्टेशनमधून निघून गेली.

सोलापुराहून पुण्यास आल्यावर पुढें आठदहा दिवसपर्यंत स्वतःची प्रकृति अशक्त असल्यामुळें घरांतल्या घरांतच पडून रहावें लागलें. बाहेर कोठें जातां आलें नाहीं. तथापि मंडळींची गर्दी सकाळ संध्याकाळ जवळ असावयाचीच व या मुंबईच्या बदलीबद्दल आपण पुणेकरांनीं काय काय करावें याबद्दल हळूहळू आपसांत स्वतःला ऐकूं न जाईल अशा रीतीनें बेत

करीत बसावयाची. या पुणेंकर मंडळींना इतका आनंद झाला होता कीं, प्रत्येकाला असें वाटे, कीं, जसा कांहीं हा अधिकार, हें वैभव आपल्यालाच प्राप्त झालें आहे. इतक्या रीतीनें स्वतःबद्दल अंतःकरणाची एकता व प्रेम दृढ झालें होतें.

जरा बरें वाटूं लागल्यावर एके दिवशीं सकाळीं पंधरावीस मंडळी डेप्युटेशन घेऊन आली व म्हणाली " उद्यांपासून आठ दिवसपर्यंत पानसुपारी वगैरे करण्याची आमच्या मनाप्रमाणें आम्हांला परवानगी असावी,यावेळीं आम्ही करूं तें चालावयाचें; एवढ्या कामांत आपण कांहीं नाहीं होय म्हणावयाचें नाहीं, आम्ही करूं त्याला रुकार असावा, एवढीच आमची विनंति आहे. "

हें ऐकून स्वतः म्हटलें " एवढा तुमचा आठ दिवसांचा काय कार्यक्रम ठरला आहे तो तर एकदां दाखवा, मग पाहूं. "

तेव्हां मंडळी म्हणाली "यासंबंधानें आपल्याला कांहीं दाखवावयाचें नाहीं किंवा कांहीं विचारावयाचें नाहीं, असा तर आमचा निश्चय आहे. अगदींच कळविल्यावांचून चालावयाचें नाहीं, म्हणून कळविण्यास आलों आहों."

पुनः स्वतः म्हटलें "नका दाखवूं, माझा कांहीं आग्रह नाहीं, पण तुम्हां पुणेंकर मंडळींचें मला असें भय वाटतें, कीं तुम्ही जें करूं लागाल तें अतिरेकाला नेतां, त्यांत तुम्हांला विचार म्हणून रहात नाहीं. मग ती गोष्ट बरी असो किंवा वाईट असो. एकदां करावयाची म्हटली, कीं, करावयाची. हें मला रुचत नाहीं. तेव्हां आतांच्या संबंधांत जें तुम्हांला करावयाचें असेल तें बेतानें व विचार करून करा, एवढेंच मी सांगतों. " हें ऐकून मंडळी बरें म्हणाली व आपापल्यांत हंसून उठून गेली.

मग दुसरे दिवसापासून या पानसुपाऱ्यांस व मेजवान्यांस आरंभ झाला. सर्वांहून हिराबागेंत केलेल्या समारंभाला मंडळींनीं जो खर्च केला व दारूकाम उडविण्यामध्यें जो पैशाचा व्यय झाला, तो स्वतःला पसंत पडला नाहीं. कारण, या ठिकाणीं मंडळींनीं पैशाचा अपव्यय केला असें स्वतःला वाटलें

व आणखी जें काय आपलें येथें रहाणें होईल, त्यामध्यें ही मंडळी एक एक गोष्ट अधिकच करीत जातील, तेव्हां जमेल तितक्या लवकर मुंबईस जावें,असा बेत ठरवून सोमवारीं रात्रींचे गाडीनें आम्ही मुंबईस निघून गेलों.

मंडळींच्या कार्यक्रमाप्रमाणें आमचा जाण्याचा दिवस बुधवारचा ठरला होता व त्या दिवशीं असेच कांहीं स्टेशनावर व प्लॅटफॉर्मवर फुलांचा रस्ता करून, शहरांतील व लष्करांतील सर्व जातींची मंडळी जमवून, बँड वगैरे आणवून मोठ्या थाटानें पोहोंचविण्याचा मंडळींनीं बेत केला होता. ही कुणकुण स्वतःच्या कानावर आली असावी व म्हणून एकाएकीं सोमवारीं जाण्याचा स्वतः विचार केला. संध्याकाळीं बाहेर जातेवेळीं सांगितलें “ फक्त दोन पेट्यांत राहील इतकेंच सामान बरोबर घ्या व आज रात्रीं अकराच्या गाडीनें जाण्याची तयारी करा. बोभाटा मात्र बिलकूल करावयाचा नाहीं. मी क्लबांतून जेवून आल्याबरोबर आपण स्टेशनवर जाऊं. राहिलेलें सामान व पेट्या उद्यां कोणी तरी घेऊन येईल. ”

त्याप्रमाणें आम्हीं तयारी केली व त्याच रात्रीं अकरा वाजतां स्टेशनवर गेलों. तरी तेवढ्यांतल्या तेवढ्यांत तीसचाळीस मंडळी स्टेशनवर आली व त्यांनीं फुलें, हार वगैरे आणून शक्य तितकी धामधूम केलीच. आमची ऑफिसची मंडळी पोंचविण्यास आली होती, त्यांना मात्र निरोप घेतांना अतिशय वाईट वाटलें व आम्हांलाही तितकेंच अवघड झालें. यासंबंधाची सर्व हकीकत त्या वेळच्या ज्ञानप्रकाशांत वेळोवेळीं आलीच आहे.

या ठिकाणीं हें सांगितलें पाहिजे, कीं, मुंबईस जातेवेळीं पुण्यांतील व इतर ठिकाणच्या संस्थांना मदत देण्याकरितां स्वतः रु० २५,००० ची रक्कम धर्मार्थ काढून ठेविली व तिची व्यवस्था राघोपंत नगरकर व आबासाहेब साठे यांजकडे सोंपविली. असो.

आम्ही मुंबईस गेल्यावर पहिला महिना एकंदर सर्व जुन्या व नव्या मित्रमंडळींच्या भेटी घेण्यांत व घरांतील व्यवस्था लावण्यांत तेव्हांच निघून गेला. मग जानेवारीच्या अखेर स्वतःचे जुने जिवलग मित्र रा. ब. शंकर

पांडुरंग पंडित आजारी पडून मुलांमाणसांसह पोरबंदराहून मुंबईस औष-धोपचाराकरितां आले. मुंबईच्या डॉक्टरांनीं त्यांची प्रकृति पाहिल्यावर सांगितलें, कीं, "यांनीं चारसहा महिन्यांची रजा घेऊन येथेंच राहून औषधोपचार केला पाहिजे," म्हणून पंडितांचा मुंबईस रहाण्याचा विचार ठरला व कायमचें बिऱ्हाड करून रहाण्यासाठीं ते बंगले पाहूं लागले. पण त्यांना कोणताच पसंत पडेना. एक दिवशीं सकाळीं असेच एकदोन बंगले पाहून ते आमच्या घरीं आले व म्हणाले " मीं गेल्या आठवड्यांत पुष्कळ बंगले पाहिले, पण सोइस्कर व आपल्याजवळ असा बंगला मला अजूनही मिळत नाहीं, त्यामुळें कंटाळा आला आहे. मुंबईस राहून आल्या-पासून दूर राहणें मला आवडत नाहीं. दिवसांतून एकदोन वेळ तरी आपल्याला एकमेकांना भेटतां येईल इतकें जवळ मिळालें तर मी वेगळें बिऱ्हाड करीन, नाहीं तर मी आपल्या मंडळींना घेऊन येथेंच येऊन राहीन. हा बंगला पुष्कळ मोठा आहे. "

हें ऐकल्याबरोबर स्वतः म्हटलें " वा ! असें झालें तर उत्तमच झालें. मींच तुमच्याजवळ याबद्दल गोष्ट काढावी असें कित्येक वेळां माझ्या मनांत आलें, पण म्हटलें, कीं तुम्हांला आमच्यासारखी चालढकल किंवा थोडीशी अडचण सोसण्याची कधीं संवयच नाहीं. त्यांत पहिल्यापासून तुम्हांला सर्व गोष्टी व्यवस्थित व वेळच्या वेळीं झाल्याच पाहिजेत, अशी संवय आहे. आजपर्यंत स्वतंत्रपणें वागलेले आहांत, तेव्हां आमच्या घरीं रहावयास या म्हटलें तर तुम्हीं भिडेनें होय म्हणाल, पण तुमच्या मंडळींना तें कितपत रुचेल कोण जाणे, असें मनांत येऊन मी आतांपर्यंत कांहीं बोललों नाहीं."

हें ऐकून पंडित म्हणाले "छे, छे, तसें कांहीं नाहीं. माझी मंडळी फार आहेत, आपल्याला अडचण होईल म्हणून मी दुसरें घर पहात होतों; पण आतां विचार नक्की ठरला. मी उद्यांच येथें रहावयास येणार. " याप्रमाणें बोलून ते घरीं गेले व चारदोन दिवसांतच सर्व मुलें व वहिनीबाई यांच्यासह रहाण्यास आले.

आमच्या घरीं आल्यापासून सकाळसंध्याकाळ स्वतःला पंडितांच्या-जवळ बसण्याबोलण्याला वेळ मिळूं लागला, यामुळें पंडितांना बरीच हुषारी वाटूं लागली असें दिसूं लागलें; पण ही हुषारी केवळ मनाची होती. शरीराला आंतून जो रोगरूपी भुंगा पोखरीत होता त्याचें काम सपाट्यानें चालू होतेंच. त्यापुढें ही मनाची हुषारी किती दिवस टिकणार ? आंतील दुखण्याच्या वेदना वाटूं लागल्यामुळें त्यांना अधिक अशक्तता येऊं लागली व मनही अधिक अस्वस्थ वाटूं लागलें. ते एकटे असत त्या वेळेस या वेदनेनें कण्हत व अगदीं अस्वस्थ असत; पण स्वतःची त्यांच्याकडे जाऊन बसण्याची वेळ आली, कीं, ते लागलींच हुषार होत. स्वतःबरोबर बोलत असतांना आपल्याला दुखणें आहे असें स्मरणसुद्धां पंडितांना नाहीं असें पाहणाराला दिसे. स्वतःची स्थिति मात्र अगदीं उलट झाली. पंडितांशीं बोलतांना मोठ्या धीरानें बोलावयाचें, पण त्यांच्याजवळून उठून आपल्या हॉलमध्यें आल्यावर सर्व वेळ त्यांच्या प्रकृतीचीच काळजी मनाला वाटे. घरीं सरकारी काम करतेवेळेस, जेवतेखातेवेळेसही सहजीं मोठाले सुस्कारे टाकलेले व 'राम राम' असे उदासपणानें उच्चारलेले शब्द वारंवार ऐकूं येऊं लागले. रात्रीं कितीतरी वेळ आमचा यांच्यासंबंधानें बोलण्यांत जाई. अशा वेळीं मध्येंच एखादे वेळीं उठून पंडितांच्या खोलींत जाऊन त्यांना झोंप लागली आहे कीं नाहीं, आज त्यांच्या प्रकृतीचें मान कसें आहे, हें मुकाट्यानें स्वतः पहावयाचें असे. कधीं कधीं तर या विवंचनेनें स्वतःला सगळया रात्रींत झोंप येत नसे.

अशा रीतीनें दिवस जातां जातां पंडितांना ता. १८ मार्च १८९४ रोजीं सकाळीं सहा वाजतां देवाज्ञा झाली! बिचाऱ्या उषाबाईवर तर सर्वस्वीं दुःखाचा डोंगर कोसळल्यामुळें त्यांच्या दुःखाला पारावारच राहिला नव्हता. पण स्वतःलासुद्धां या पंडितांच्या वियोगानें आपला प्रत्यक्ष मुलगा अगर भाऊ जावा इतक्या तऱ्हेचें दुःख झालें! पंडितांच्यासारखा मानी, तेजस्वी, हुषार व निरलस मनुष्य मिळणें फार दुरापास्त आहे, असे स्वतःच्या तोंडून

वारंवार उद्गार निघत. त्यांचें ( पंडितांचें ) स्वतःच्या ठिकाणीं इतकें निस्सीम प्रेम होतें, कीं, पुष्कळ दिवसांनीं ते भेटण्यास आले म्हणजे अत्यंत सलगीनें, प्रेमानें लडिवाळ मुलासारखे स्वतःशीं वागत. जितके दिवस लांब राहिले असतील, तितक्या दिवसांच्या लहानमोठ्या सर्व गोष्टी सांगावयाच्या व विचारून घ्यावयाच्या नादांत दोघेही तासच्या तास गढून गेलेले असत. ते बसले असतील त्याठिकाणीं मध्यें मी जर कांहीं कामाला गेलें तर पंडितांना खपत नसे. यावरून मी स्वतःला कधीं तरी विचारीं, कीं, "सारखे स्वभाव असल्यावांचून स्नेह जमत नाहीं असें म्हणतात, तर पंडितांचा स्नेह स्वतःशीं इतका कसा जमला ? दोघांच्या स्वभावांत अग्नि व पाणी इतकें साम्य आहे. त्यांचें तर नेहमींचें वाक्य असें आहे, कीं, I would sooner break than bend आणि स्वतःचें तत्त्ववाक्य व वागणूक पंडितांच्या वागण्याच्या अगदीं उलट आहे."

तेव्हां सांगितलें "यावरून ते अधिक चांगले आहेत असेंच घ्यावयाचें. चांगल्या माणसांत तेजस्विता जास्त प्रमाणानें नजरेस येते. तुम्ही टीका करणारी मंडळी काय हवी ती टीका करा, पण आम्ही दोघे 'शिवस्य हृदये विष्णुर्विष्णोश्च हृदये शिवः' अशा तऱ्हेनेंच आजपर्यंत वागत आलों.

याच मार्च महिन्यांत माघ वद्य १३ला चि.नानूचा जन्म पुण्यास झाला.

एके दिवशीं आमच्या आचाऱ्याचा भात कच्चा राहिला म्हणून ह्या त्याच्या हलगर्जीपणाबद्दल मी त्याला पुष्कळ बोललें व रागें भरलें. तें ऐकून मुखशुद्धीच्या वेळेस स्वतः राग घालविण्याकरितां विनोदानें म्हटलें " अंः ! थोडा भात किंवा पोळी कच्ची राहिली, म्हणून त्या आचाऱ्याला इतकें काय बोललीस? नुसतें धान्य जसेंच्या तसेंच खाऊन पचविणारीं जीं माणसें त्या आम्हांला भात किंवा पोळी थोडी कच्ची राहिली म्हणून बाधते कीं काय!! आह्मी लढाई केलेलीं माणसें आहों. हातावर हिरवा लिंबू चोळून तोच खाऊन नुसते त्याच्यावर महिनेच्या महिने काढिले आहेत. त्या आम्हांला भात पोळी थोडीशी कच्ची राहिली तर त्याची पर्वा काय ! ! तूं

आचाऱ्याला बोलत होतीस तेव्हांच मी म्हणणार होतों; पण तूं आधींच रागावलेली! त्यांत यजमानीणपणाच्या डौलानें बोलत होतीस, तेव्हां आपण कांहीं मध्येंच बोलून तुझा विरस करूं नये, असें वाटूनच त्या वेळीं मी बोललों नाहीं. बाकी, स्वयंपाक बिघडला तर त्याचा दोष स्वयंपाक्याला देत बसण्यापेक्षां जेवणाची सर्व व्यवस्था पहाणारालाच मी अधिक दोष देईन. नोकरांचीं कामें इतपतच व्हावयाचीं. त्यांच्यावर पाहणी करणारांनींही लक्ष ठेविलें पाहिजे."

"लिंबूर खाऊन दिवस काढणारीं आम्ही लढाईंतील माणसें," असें म्हटल्याबद्दल मीं म्हटलें "रोजच्या जेवणांत एक घास अधिक झाला तर तेवढा पलीकडे राखून ठेवावयाचा असतो; तोलून खाणारांनीं लढाई कसली करावयाची!! आतां लेखणींत मात्र लढाई उरली आहे. खरोखरीच लढाईची वेळ आली तर सगळ्यांची केवढी धांदल उडेल!! छाती दुखत असली म्हणजे त्यावर मोहरा वाटून घातली किंवा टर्पेंटाईन चोळलें, तर तेवढ्या जागेभर पुरळ उठतो व फोड येतात, त्या शरीराला लढाईच्या जखमा सोसल्या तरी कशा!"

तेव्हां म्हटलें "सोसल्या कशा! जागोजाग जखमांच्या खुणा आहेत. ह्या पहा खांद्यावरील जखमा!! छातीवर तर इतक्या जखमा आहेत कीं, त्या सर्व जखमांच्या ओरखड्यांचा एक हिंदुस्थानचा नकाशाच बनून राहिला आहे. मी उगीच नाहीं म्हणत, नीट बघून घे खरें आहे कीं नाहीं तें!!" असें म्हणून सद्रा वर करून मला छाती दाखविली.

मींही हंसतहंसत केवळ थट्टा करण्याच्या बुद्धीनेंच जवळ जाऊन नीट न्याहाळून पाहिलें, (ह्यापूर्वीं माझें तिकडे कधींच लक्ष गेलें नव्हतें,) तों, खरोखरीच छातीच्या डाव्या भागावर हिंदुस्थानच्या नकाशासारखी अगदीं हुबेहुब ओरखड्यांची आकृति होती. हे ओरखडे पूर्वीं झालेल्या कसल्या जखमांचे नसून साफ गुळगुळीत कागदावर वॉटरलाइन्स असतात, तसे तेवढ्या जागेवर अंगचेच ओरखडे होते. हें पाहून बाहेरून जरी मीं हें

सारें थट्टेवारी घालविलें, तरी पण माझ्या मनावर एक प्रकारचा विलक्षण परिणाम झाला खरा. तो काय हें जरी मला आतां नीट शब्दांनीं सांगतां येणार नाहीं, तरी मला मनांतल्या मनांत अतिशय नवल वाटलें.

प्रार्थनासमाजांत **स्वतः**ची उपासना असेल त्या दिवशीं मीं बरोबर असावें असें **स्वतः**च्या मनांतून फार असे; व खरें म्हटलें तर मला याच उपासनेच्या वेळीं मात्र विशेष काम असलें तरीही त्यांतल्या त्यांत सवड करून समाजांत जावेंसें वाटे. याबद्दल कित्येक वेळां माझ्या मैत्रिणी मला विनोदानें म्हणत " दर आदितवारीं उपासना असते, तेव्हां कांहीं तरी अडचणी येतात, त्यामुळें येण्यास फावत नाहीं; पण आज बरें फावलें ? ही उपासना असेल त्या दिवशीं कोणी पाहुणे येत नाहींत, कांहीं अधिक-उणें काम निघत नाहीं; येवढें बरें आहे ! "

उपासना झाल्यावर घरीं परत येतांना आम्हीं गाडींत बसलों म्हणजे **स्वतः** विचारावयाचें, कीं, " आज तुला काय काय समजलें तें सांग. "

मीं ऐकिलेली सर्व उपासना नीट सांगितली तर म्हणावयाचें " तर मग आजची उपासना बरी झाली असावी, असें वाटतें. "

तीच, एखादे वेळेस प्रतिपादनाचा विषय जरा अवघड असला म्हणजे उपासना कशी झाली तें मला सांगतां येत नसे. त्यामुळें **स्वतः** म्हणावयाचें " तर मग आजची उपासनाच चांगली झाली नाहीं म्हणावयाची. उपासने-संबंधानें आम्हीं असें प्रमाण बसविलें आहे, कीं तुला समजली म्हणजे ती उपासना चांगली झाली, व तुला समजली नाहीं ती उपासनाच चांगली झाली नाहीं, दुर्बोध झाली, असें मी समजतों. "

हें **स्वतः**चें बोलणें कसेंही असलें, तरी खरें पाहिलें तर **स्वतः**ची उपासना इतकी अर्थपूर्ण, प्रेमळ व गंभीर होत असे, कीं ती ऐकणाराला धन्य धन्य वाटावी, क्षणमात्र देहभान विसरून जावें व आपण प्रत्यक्ष देवाशींच बोलत आहों व तो आपली प्रार्थना ऐकत आहे असें वाटून वृत्ति तन्मय व्हावी. केव्हां केव्हां त्या शांत व भक्तीनें परिप्लुत झालेल्या वृत्ती-

मुळें स्वतःच्या चेहऱ्यावर जें एक प्रकारचें तेज दिसे, त्या तेजानें शोभणाऱ्या मुखाकडे एकसारखें पहात रहावें, दृष्टि काढूंच नये, असें मला वाटे व मी वेड्यासारखी कित्येक मिनिटें तोंडाकडे सारखी पहात राहीं. भोंवतालीं बसलेली मंडळी काय म्हणतील, असें क्वचित् मनांत येऊन दृष्टि खालीं झाली तरी ती पुनः लागलीच वर होई व आपलें काम करूं लागे. आतां अशा सर्वस्वीं निराशेच्या स्थितींत सुद्धां ती वेळ, तो चेहरा मनांत आला म्हणजे हल्लीं जी दीनावस्था प्राप्त झाली आहे, तिचा विसर पडून आपण त्या वेळचा अनुभव आज घेत आहों असें वाटून क्षणभर आनंद होतो व कितीवेळ तरी त्याच मूर्तीचें ध्यान व चिंतन करीत स्वस्थ बसावेंसें वाटतें. कांहीं कारणानें यांत व्यत्यय आला तर दिवसभर चुकल्याचुकल्यासारखें वाटून मनास तळमळ लागते.

दररोज रात्रीं जेवण झाल्यावर घरांतील मुलांची अभ्यासाची चवकशी करावयाची; तसेंच वडील माणसांशीं तास अर्धातास बोलत बसून मग माडीवर जावयाचें आणि कांहीं तरी वाचन सुरू असावयाचें. वाचनाच्या नादांत झोंप लागावयाची. एरव्हीं झोंप यावयाची नाहीं, अशी संवय झाली होती. साडेदहा किंवा अकरा वाजतां झोंप लागल्यावर तीन सवातीन वाजतांच झोंप पुरी होई. मग अंथरुणांतच पडल्या पडल्या ईश्वरासंबंधीं विचार अगर मनन चाले. हें झाल्यावर अंथरुणावरच उठून चारपासून पांचपर्यंत आपण स्वतः तुकारामाचे अभंग म्हणून टाळ्या अगर चुटक्या वाजवून भजन करावयाचें. त्यांत अत्यंत भक्तिपर व देवाशीं लडिवाळपणाची सलगी केलेले नामदेवाचे अभंग घोळूनघोळून पुनः पुनः म्हणावयाचे. पुष्कळ वेळां म्हणत असतांना कंठ दाटून गहिंवर येई. अशा वेळीं तोंडानें म्हणणें बंद पडून कांहीं वेळ अश्रुधारा चालत असत. कांहीं वेळां आपल्याशींच तल्लीनतेनें अभंग म्हणत असतांना आपण म्हणत आहों त्या अभंगाचा दुसरा चरण जुळत आहे कीं नाहीं इकडे लक्ष नसे. प्रथम एका अभंगाचा चरण म्हणावयाचा व दुसऱ्यांदा दुसऱ्याच अभंगाचा चरण म्हणावयाचा. हे

अभंग गाथ्यांतील नसून त्या वेळीं आपल्या मनाची स्थिति असेल तसे जुळवून म्हणावयाचे. त्यांचें यमक जुळतें कीं नाहीं, याकडे लक्षही नसे. अशा वेळीं मला फार हंसूं येई व मी म्हणें "ह्या सगळया नवीन अभंगांची एक गाथा करून ठेवूं या. मी कल्याण शिष्यासारखें लिहिण्याचें काम पतकरून हे सगळे अभंग लिहून काढतें, म्हणजे बरें होईल."

हें ऐकून असें उत्तर येई, कीं, "आम्ही आपलीं भाबडीं माणसें. आम्हांला यमकें व तालसूर यांची माहिती नाहीं व त्यांची गरजही वाटत नाहीं. ज्याच्याकरितां आम्ही ते म्हणतों त्याला ते सर्व समजतात. त्याचें लक्ष ह्या इतर गोष्टींत कधीं जात नाहीं."

याप्रमाणें पांच वाजेपर्यंत अभंग व भजन झाल्यावर कांहीं संस्कृत श्लोक व स्तोत्रें म्हणून साडेपांच वाजतां अंथरुणांतून उठून मुखमार्जनादि प्रातर्विधि अर्ध्या तासांत उरकून सहा वाजतां दिवाणखान्यांत आपल्या कोचावर बसून कामाला सुरुवात व्हावयाची. प्रथम दैनिक पत्रांतील तारा वाचून मग टपाल पहावयाचें व तें झाल्यावर साडेनऊ वाजतां स्नानास उठावयाचें. स्नान व जेवण झाल्यावर सुमारें १५ मिनिटें बोलत बसून मग उठून पोषाख करून साडेदहा वाजतां कोर्टांत जाण्याकरितां गाडींत बसावयाचें. अकरापासून पांचपावेतों हायकोर्टाचें काम चाले; पण मध्यंतरीं उपाहाराची सुट्टी असे, तव्हां घरून फराळाचें घेऊन आगगाडींतून बजाबा ब्राह्मण वेळेवर जाई व डब्यांतून ऊन ऊन पदार्थ काढून खाण्यास देई. त्यांतील थोडेसे खाऊन व पाणी पिऊन तेथेंच ईझीचेअरवर थोडी विश्रांति घेऊन पुन: जाऊन कामाला सुरुवात करावयाची. पांच वाजतां काम संपवून उठल्यावर गाडी नुसती बरोबर ठेवून दोनतीन मैल पायीं चालावयाचें म्हणजे पुन: फिरावयास जाण्याचा वेळ वांचे. सहा वाजतां घरीं आल्यावर सुमारें अर्धा तास बोलत बसून मग पुन: आपल्या नित्याच्या कामास म्हणजे सकाळीं आलेल्या टपालांचीं उत्तरें लिहिणें व तें झाल्यावर वाचनास सुरुवात होई. रोजचीं पत्रें येतील त्यांचीं उत्तरें त्याच दिवशीं पाठविण्याकडे विशेष लक्ष असे.

ेच्या दिवशीं सकाळीं व केव्हां केव्हां दुपारीं भेटावयास येण्याऱ्या मंडळीची गर्दी होई. ज्या तऱ्हेची जी मंडळी येईल, त्या त्या तऱ्हेची त्यांना माहिती विचारांयची, सांगावयाची व ज्यांच्याकडून जीं कामें घेण्यासारखीं असतील तीं कामें त्यांच्याकडून करून घ्यावयाचीं. कोणी मोठ्या घराण्यांतील जुनी मंडळी, ब्राह्मण, मराठे, गुजराथी, भाटे वगैरे कोणत्याही दर्जाचे गृहस्थ भेटावयास आले, तरी त्यांच्याशीं त्यांच्या दर्जाप्रमाणें मानमान्यतेनें बोलावयाचें. त्यांच्या हातून व मार्फत एखादी सार्वजनिक लोकोपयोगाची गोष्ट झाली असली तर त्याबद्दल त्यांचा गौरव करावयाचा, त्यांना हौस व जास्त उत्तेजन वाटेल अशा शब्दांनीं त्यांची वाखाणणी करावयाची वगैरे पाहून मला केव्हां केव्हां हंसूं येई व करमणुकही वाटे. या गृहस्थांशीं बोलतांना त्यांच्या गांवीं अगर जातींत ज्या संस्थेची उणीव असेल; तशी एखादी संस्था आपण पुढें होऊन काढा व त्या संस्थेला तुमच्यासारख्या कळकळीच्या गृस्थाचें नांव द्या, म्हणजे अनायासानें स्मारक होऊन ही संस्था लोकोपयोगी होईल, असें उत्तेजनपर शब्दांनीं त्यांच्या मनांत भरवावयाचें.

ही आलेली मंडळी जाऊं लागली म्हणजे आज कांहीं आपल्याला नवीन दिशा समजली, अशा उल्हासानें जात व आपल्या कामाला लागत. ही मंडळी उठून गेल्यावर मी मात्र मुद्दाम दिवाणखान्यांत जाऊन विचारीं, कीं, " आज आलेल्या मंडळीच्यावर काय काय कामें लादलीं ? काम लादण्याची हातोटी पक्की साधली आहे. पुनः चमत्कार असा, कीं ज्यांच्यावर काम लादलें जातें तीं माणसें त्याबद्दल कंटाळत नाहींत, उलट आज आपल्याला कांहीं विशेष समजलें असें मानतात."

जून सन १८९५त आम्ही महाबळेश्वराहून वाठारास येत असतां, वांईच्या पुढें व वाठाराच्या अलीकडे एक रडतोंडीचा घाट लागतो. त्या घाटाजवळ आम्ही आलों. पूर्वीं स्वारींत फिरत असतांना स्वतःची चाल अशी असे, कीं, रोज बारा कोसांच्यावर बैलांना किंवा घोड्यांना जास्त मजल द्यावयाचीच नाहीं, व वाटेंत घाट लागला तर घाट संपेपर्यंत स्वतः पायीं

चालावयाचें, गाडींत बसावयाचें नाहीं, व घोड्यांना हळूहळू पाऊंडावर चालवीत आण, अशी कोचमनाला निक्षून ताकीद असे. या वहिवाटीला अनुसरून भाड्याची गाडी होती तरी घाट जवळ येतांच स्वतः खालीं उतरून चालण्यास आरंभ केला. चि. सखु व नानू हीं दोन्हीं मुलें सात व दोनअडीच वर्षांच्या वयांचीं होतीं. या दोघांना गाडींत ठेवून व शिपायाला त्यांच्याजवळ बसवून गाडी जपून घेऊन ये असें कोचमनाला बजावून मी बरोबर चालण्याकरितां खालीं उतरलें; पण आम्ही तुझ्याबरोबर चालतों असें दोन्हीं मुलें म्हणूं लागलीं व खालीं उतरण्याची गडबड करूं लागलीं. त्यांची कशा तरी समजूत घालून मी पुढें चालूं लागण्याच्या पूर्वी दहा मिनिटें सहज निघून गेलीं. स्वतः तर गाडींतून उतरल्याबरोबर चालूं लागण्यास आरंभ केल्यामुळें इतक्या अवधींत नजर पोहोंचत नव्हती इतकें लांब जाणें झालें होतें; म्हणून लवकर जाऊन गांठण्याकरितां मी होईल तितक्या जलदीनें चालत होतें व रस्त्यावर मनुष्य नसेल तेव्हां मधून मधून थोडीशी धांवतही असें. इतकी घाई करण्याचें कारण, संध्याकाळची वेळ, आधींच स्वतःला दूरचें कमी न्याहाळतें, बरोबर कोणी मनुष्य नाहीं, अशांत समोरून एखादी गाडी आली तर कदाचित् गाडीचा धक्का स्वतःला लागेल, या भीतीनें माझी एवढी सर्व घाई चालली होती.

जवळ येऊन ठेपल्यावर जरा स्वस्थपणानें चालणं होऊं लागलें. जात्याच स्वतःची उंची जास्त असल्यामुळें सहज पाऊल लांब पडे व ठेंगण्या माणसानें आपल्याकडून बरोबर चालण्याची कितीही घाई केली तरी निभाव लागत नसे. त्यामुळें दोघांत थोडेसें तरी अंतर पडे. या नेहमींच्या अनुभवाप्रमाणें आतांही आम्हां दोघांत सहजीं दहाबारा पावलांचें अंतर पडलें. एरव्हीं मी जवळ आलेली पाहून रोजच्याप्रमाणें उभें राहून माझ्याकरितां हळूहळू चालण्यास आरंभ झाला असता; पण आजची वृत्ति वेगळी होती. संध्याकाळची वेळ, सूर्य नुकताच मावळल्यामुळें संधिप्रकाश पडला होता, व उंच घाटावरून खालच्या सभोंवतालच्या चित्रविचित्र

देखाव्याकडे **स्वतः**ची दृष्टि लागून राहिली होती. अशा गंभीर वेळीं "**ऐसें भाग्य कई लाहता होईन। अवघें देखे जन ब्रह्मरूप**" हा अभंग अगदीं तल्लीनतेनें घोळून घोळून म्हणणें चाललें होतें. यामुळें मी जवळ आलें हें **स्वतः**च्या लक्षांत आलें नाहीं.

अशा रीतीनें, आम्ही थोड्या अंतरानें चालत असतां घाटाच्या माथ्या-वर आलों. तेथें एका पुलाच्या जवळच दोन मोठ्या इंगळ्या सुमारें चार साडेचार इंच लांबीच्या व एक दीड इंच रुंदीच्या असाव्या, त्यांनीं आपल्या नांग्या पाठीकडे वळविल्या असून त्या करंगळीएवढ्या जाड होत्या. त्यांचा रंग काळसर गुळाच्या पक्क्या पाकासारखा होता. त्या दोन्ही इंगळ्या स्वैरपणानें एकमेकींच्या मागें चालल्या होत्या.

**स्वतः**च्या पावलाकडे माझी सहजीं नजर लागलेली असल्यामुळें त्या माझ्या दृष्टीस पडल्या. त्याबरोबर दुसरें किंवा तिसरें पाऊल त्यांच्यावर पडेल अशी मला भीति वाटून मी अतिशय घाबरलें व कदाचित् मोठ्यानें ओरडलें असतें; पण काय झालें कोण जाणें, इंगळ्यावर पाऊल पडण्या-पूर्वीं आपण जाऊन गांठावें व हातानें पलीकडे करावें, अशा हेतूनें मी जोरानें धांवत सुटलें; पण तेथपर्यंत जाऊन पोहोंचण्याच्या आधींच **स्वतः**चें जाणें त्या इंगळ्या ओलांडून दोनतीन पावलें. पुढें झालें होतें.

हा सर्व मजकूर लिहिण्यास पांचदहा मिनिटें लागलीं, पण ही गोष्ट प्रत्यक्ष घडण्यास दहापांच सेकंदही वेळ लागला नाहीं. धांवत असतांना वाटेंत इंगळ्या आहेत, पाय पडेल, असें हांक मारून किंवा मोठ्यानें ओरडून मला सांगतां येईना. इकडे तर, आतां इंगळ्यांवर पाय पडणार असें मनांत येऊन माझा जीव आंतल्या आंत गोळा होऊन अगदीं कासा-वीस झाला. निमिषार्ध माझे डोळे आपोआप मिटले. पण लागलींच डोळे उघडून पहातें तों इंगळ्या ओलांडून पुढें गेलेलें पाऊल पहिल्यासारखें जोरानें पडत आहे हें पाहून मला अत्यानंद झाला व एवढें मोठें अरिष्ट टळल्यांबद्दल मीं देवाचे उपकार मानिले. हें सर्व किती वेळांत घडलें हें

सांगतां येणें कठिण आहे. मीं जवळ जाऊन घाबरेपणानें विचारिलें "पायाला कांहीं टोंचलें नाहींना ?"

हें माझें विचारणें जरा चमत्कारिक वाटलें व लागलींच थांबून माझ्याकडे पाहून म्हटलें "काय; काय विचारतेस; काय झालें आहे; इतका दम कशानें लागला; गाडी कोठें आहे;" वगैरे एकामागून एक प्रश्न भराभर विचारिले.

गाडीला कांहीं तरी अपाय झाला, किंवा घोडे उधळले असें कांहीं तरी स्वतःच्या मनांत येऊन हें इतकें विचारलें असावें, हें माझ्या लक्षांत आल्यावरोबर मीं एकदम म्हटलें "कांहीं नाहीं. मागून गाडी सुरक्षित येत आहे. मी जरा घाईनें चाललें व चढ आहे म्हणून दम लागला; जरा वेळ बसावें तरी. तोंवर गाडी येईल. आतां चढ सगळा संपला. आतां गाडींत बसण्यास काय हरकत आहे ?"

इतकें बोलणें झालें तरी खालीं बसणें झालें नाहीं. तेव्हां मीं आर्जवानें म्हटलें "थोडा वेळ खालीं बसावयाचें नाहीं का ? किती तरी दम लागला आहे."

तेव्हां म्हटलें "कोणाला दम लागला आहे ? मला ? मी बिलकूल दमलों नाहीं. मुळीं पुरुषांचा जन्म श्रमाचीं कामें व कष्ट करण्याकरितांच आहे. आम्हांला दम लागून कसें चालेल; दऱ्याखोऱ्यांतून व डोंगरकठारींतून हिंडणारीं आम्ही माणसें. तूं दमली आहेस म्हणून रदबदली करीत आहेस. मग मी दमलें आहें असें स्पष्ट म्हण, म्हणजे तुझ्याकरितां मी खालीं बसतों."

मीं लागलींच म्हटलें "होय, मी खरीच दमलें आहें. माझ्याकरितां का होईना, पण खालीं बसावें."

मग सडकेच्या कडेला पांढरे दगड ओळीनें लाविलेले असतात त्यांजवर आम्ही उभयतां बसलों. गाडी येण्याला पुष्कळ अवकाश होता, म्हणून त्या दोन इंगळ्यांची गोष्ट मीं सांगितली, ती ऐकून म्हटलें "आतां तुझा घाबरलेला आवाज व भ्यालेली मुद्रा पाहून मला चमत्कारिक वाटलें, व गाडीबद्दल काळजी वाटली."

मी म्हणालें " केवढें तरी आज अरिष्ट टळलें ! इंगळयांना नुसत्या पायाचा स्पर्श झाला असता तरी त्या चावल्या असत्या; मग काय वाट झाली असती ? अशा ऐन तिन्हीसांजच्या वेळीं आडरानांत औषध कोठून मिळणार होतें ? अशा वेळीं कोण सहाय झालें असतें ? " असें बोलत असतांना मला गहिंवर आला व एकदम रडेंहि आलें.

तेव्हां स्वत: थोडा वेळ अगदीं स्तब्ध राहून मग मला म्हटलें "आतां अरिष्ट टळलें आहे ना ? आतां भिण्याचें कारण काय आहे ? यावरून असें पहा, कीं, परमेश्वर सदोदित आपल्या सन्निध आहे व पावलोपावलीं आपल्याला संभाळीत आहे. इंगळयांवर पाय न पडतां जें पाऊल सहज पलीकडे गेलें असें तुला वाटलें, तें कसेंही असलें, तरी ही योजना त्याचीच आहे, यांत संशय नाहीं. त्यानें रक्षण करण्याचें मनांत आणिल्यावर कोणाकडूनही अपाय होणें शक्य नाहीं. मात्र आपण तसा भाव ठेवला पाहिजे. हें शिकण्यासारखें नाहीं काय ? तुकारामबुवांचा एक अभंग आहे " **जेथें जातों तेथें तूं माझा सांगातीं । चालविशी हातीं धरूनीयां**" हा अभंग किती सत्य आहे बरें ? धन्य ते पुरुष आणि त्यांचा निःसीम भाव. आपल्याला जेव्हां अनुभव येतो, तेव्हांच ही उक्ति पटते. आपण दुर्बळ माणसांनीं त्यांच्यासारखा दृढ भाव मनांत धरला तर तें एक अत्यंत मोठें सामर्थ्य आहे व त्यांत आपलें कल्याण आहे. "

इतकें बोलणें होत आहे तों गाडी आली. रात्रीं आठ वाजण्याची पुण्याची गाडी साधली पाहिजे, म्हणून आम्ही गाडींत बसून वाठारावर आलों व तेथून रेल्वेनें पुण्यास आलों.

## भाग विसावा.

# आजारी माणसांची काळजी.

कितीही दूरचे नातलग अगर चाकरमाणूस घरांत आजारी आहे अशी बातमी कानावर गेली, कीं, लागलींच तें आजारी माणूस ज्या खोलींत निजलें असेल त्या खोलींत **स्वतः** जाऊन त्याचा समाचार घ्यावयाचा व "डाक्टर बोलावून त्याच्या औषधपाण्याची व्यवस्था तूं आपल्या देखरेखी-खालीं कर, दुसऱ्याकडे सोंपवूं नको," असें मला बजावून सांगणें होई; इतकेंच नाहीं, तर तो मनुष्य चांगला बरा होऊन समोर येऊन हिंडूं फिरूं लागेपर्यंत दररोज दोन वेळां जेवतांना चौकशी व्हावयाचीच, विसर पडावयाचा नाहीं. याबद्दल मला फार नवल वाटे व मी एखादे वेळीं म्हणें "या इतक्या कामांत व अनेक तऱ्हेच्या विचारांत मन गढलेलें असतांना, एखादे वेळेस घरच्या माणसांशीं देखील बोलण्याला फुरसत होत नाहीं, पण अशा बारीकसारीक गोष्टींविषयीं दररोज दोन वेळां चौकशी करण्याची आठवण मुद्दाम ठेवीन म्हटलें तरी मला ती रहात नाहीं. त्यांतून कामाची धांदल असली तर मुळींच रहात नाहीं. याबद्दल माझा मला देखील केव्हां केव्हां राग येतो. शिवाय, या विसराळूपणाबद्दल रागें भरून घ्यावें लागतें तें निराळेंच. जें काम करावयाचें असेल ती वस्तु अगर तो मनुष्य डोळ्यांसमोर दिसल्यावांचून आपोआप आठवणच होत नाहीं."

तेव्हां म्हटलें "आठवण राहणें हें त्या कामाची काळजी वाटण्यावर व आपणावरच्या जबाबदारीवर फार अवलंबून असतें. या दोन गोष्टींबद्दल मनाचा शिथिलपणा असला म्हणजे प्रत्येक कामाचा विसर पडावयाचाच. जी गोष्ट अंतःकरणापावेतों जाऊन पोंहचते, म्हणजे काळजाला लागते, तिचेंच नांव काळजी. तिचा विसर बहुधा पडत नाहीं, जेव्हां आपलें मन

विशेष दुःखानें, काळजीनें किंवा तीव्र वेदनेनें व्याप्त असतें, तेव्हां मात्र याला अपवाद येतो; पण अशी वेळ क्वचितच येते व आली तरी तिला कोणी दोषांत गणीत नाहीं."

सन १८९६।९७ सालीं जेव्हां मुंबईस पहिला प्लेग झाला, तेव्हां प्लेग या रोगाची माहिती कोणाला ऐकूनसुद्धां नव्हती, मग त्याच्या इतक्या उग्र स्वरूपाची कल्पना कशी येणार? पहिल्यापहिल्यानें तर या रोगाची बातमी आम्हांला खरीच वाटली नाहीं. नीळ रापत नसली म्हणजे अशा कांहीं तरी अद्भुत व असंभाव्य कंड्या निराळी लोक उठवितात, असें जुनीं वृद्ध माणसें म्हणत असत. त्या गोष्टीची आठवण होऊन मानमोडी, गुडघेमोडी, हाक-मारी वगैरे रोगांबद्दल ज्या कंड्या उठत, त्यांपैकींच ही एक आहे असें वाटे; पण टाइम्स, गॅझेट, ॲडव्होकेटमध्यें जेव्हां या रोगाच्या उग्रतेबद्दल काल-मच्या कालम भरून येऊं लागले, तेव्हां आमचें तिकडे लक्ष गेलें. पुढें कांहीं दिवसांनीं कोठींत, स्नानगृहांत, तळगजल्यावरच्या मोठमोठ्या मोऱ्यांतून, तसेंच बाहेर बागेच्या मोकळ्या जागेंत मोठमोठे उंदीरही उगीचच्या उगीच बाहेर येऊन बसतात व थोडीशी धाप लागलीशी होऊन तेथल्या तेथेंच मरतात, असें तीनचार नोकरांनीं मला येऊन सांगितलें; पण दैनिक पत्रांत हा मजकूर वाचीपर्यंत मला त्याचें कांहींच वाटलें नाहीं व मीं जवळसुद्धां हा मजकूर सांगितला नाहीं. उलट नोकरांना म्हटलें, "बरें झालें उंदीर आपोआप मरतात तर! आतांशा उंदीरच चोहोंकडे फार झाले. त्यांना मारण्यासाठीं कमिटीच्या लोकांनीं गटारांत विष घातलें असेल, तें खातात व घाबरून मरतात."

असे सातआठ दिवस गेल्यावर एक दिवस टाइम्समध्यें असा मजकूर आला, कीं, प्लेगचें विष आपल्या घरांत आलें हें समजण्याची मुख्य खूण म्हटली म्हणजे उंदीर आपोआप मरूं लागतात व असे उंदीर मरूं लागले, कीं, त्या घरांत राहणें सुरक्षित नाहीं. एकदम तें घर सोडून दुसरीकडे राहण्यास गेलें पाहिजे. हा मजकूर स्वतः पाहिल्याबरोबर मला मुद्दाम हांक

मारून सांगितलें " हा मजकूर तूं मुद्दाम वाचून पाहून त्याची खबरदारी घेत जा. आपल्यालाही केव्हां बाहेर जावें लागेल याचा नेम नाहीं. " मी सर्व ऐकून घेऊन गप्प राहिलें.

सकाळची वेळ नेहमीं धांदलीची असे, म्हणून मीं पत्र दुपारीं वाचीन म्हणून उचलून ठेवलें व दुपारीं सवड होतांच वाचून पाहिलें तों त्यांत लिहिल्याप्रमाणें प्लेगचें विष आपल्या घरांत आलें आहे असें माझ्या लक्षांत आलें. तेव्हां आतां या घरांत रहाणें सुरक्षित नाहीं, घरांत आल्यावर हा मजकूर जवळ सांगून उद्यांच्या उद्यांच दुसरीकडे राहण्यास जावें, असा बेत करून घरीं आल्याबरोबर मीं सर्व मजकूर सांगितला. तो ऐकून घेतल्यावर दुसरे दिवशीं सकाळीं वाळकेश्वर, महालक्ष्मी, चौपाटी वगैरे ठिकाणीं आम्हीं पांचसहा घरें पाहिलीं, पण त्यांपैकीं कोणतेंच घर आम्हांला पटेना. प्लेगचें वर्ष पहिलेंच असल्यामुळें हायकोर्टांतील वकील लोकांनीं कोर्टास अर्ज केला, कीं, " प्लेगसाठीं स्थलांतर करणें आम्हांला जरूर आहे व तसें झालें म्हणजे कोर्टांत अकरा वाजतां हजर होणें अशक्य होईल. याकरितां कोर्टानें आमची कांहीं तरी तजवीज करावी." हा अर्ज कोर्टानें ऐकून अकराची वेळ होती ती साडेबाराची केली व आठवड्यांतून चारच दिवस काम चालेल व तीन दिवस सुट्टी मिळेल, असें ठरविलें. सोमवार, मंगळवार, बुधवार व गुरुवार असे चार दिवस कोर्ट चाले. गुरुवारीं दोन वाजल्यापासून सोमवारीं बारा वाजेपर्यंत सुट्टी असल्यामुळें मुंबई सोडून ज्या लोकांना बाहेर रहावयास जावें लागे त्या लोकांना ही सुट्टी फार सोयीची व सुखाची झाली. असो.

आम्हांला घर न मिळाल्यामुळें आम्ही अजून पहिल्याच बंगल्यांत होतों. एक दिवस सकाळीं उठून मी खालीं आलें, तों आमच्या स्वयंपाकीणबाईचा मुलगा चालतांना थोडासा लंगडतो आहे, असें माझ्या दृष्टीस पडलें, हा वयानें सोळासतरा वर्षांचा होता, तरी स्वभावानें अगदीं भोळवट असे, तो दोन्ही मुलांबरोबर खेळत होता. त्याला हांक मारून विचारलें " कायरे केशव, लंगडतोस कां ? "

हें ऐकून तो म्हणाला " मला ताप नाहीं आला, कांहीं दुखत नाहीं," असें म्हणून घाबरेपणानें तो इकडे तिकडे बघूं लागला.

हें त्यांचें पहाणें व घाबरलेली मुद्रा पाहून मला संशय आला, आणि सखू व नानू उभयतां मुलें त्याच्याजवळच होतीं त्यांना " माडीवर घेऊन जा आणि तेथेंच खेळीव, खालीं येऊं देऊं नको; पण मला वरचा थर्मामिटर तेवढा आणून दे, " असें मीं एका नोकराला सांगितलें.

त्याप्रमाणें तो मुलांना घेऊन गेला व थर्मामिटर मला खालीं आणून दिल्यावर मीं तो केशवास लावावयास दिला व विचारलें " तुला कोठें दुखत आहे का ? गांठबीठ कोठें आली आहे काय ? "

त्यानें साफ नाहीं म्हणून सांगून जागोजाग सांधे दाबून दाखवून गांठ आली नाहीं अशी खात्री करण्याचा प्रयत्न केला; पण त्याच्या ह्या करण्यानें माझा संशय अधिकच बळावला व कांहीं युक्तीनें खरें काय तें काढण्याच्या विचारास मी लागलें. त्याच्याकडून थर्मामिटर परत घेऊन मीं पाहिला तों पारा एकशेंदोन डिग्रीवर चढला होता. तेव्हां थर्मामिटरकडे व केशवाकडे पहात दोनतीन मिनिटें मी तशीच स्तब्ध बसलें. केशवानें घाबरून म्हटलें " काय पाहतां ! नळींत तापबीप कांहीं नाहीं ना ? "

तेव्हां मीं त्याच्याकडे पाहून लागलींच म्हटलें " काय केशव, तूं भोळा आहेस पण मलाही फसवावयाला पाहतोस ? अरे मूर्खा, ताप काय, पण तुला गांठ आलेली या नळींत दिसत आहे; आणि तूं मला नाहीं म्हणतोस?" या वेळीं तो अगदीं रडकुंडीस येऊन घाबरून म्हणाला " अहो खरोखरींच अगदीं सुपारी एवढी गांठ आहे; पण ती दुखत नाहीं. मला काय ठाऊक ती तुम्हाला नळींत दिसेल म्हणून ? "

हा सर्व प्रकार पाहून खरें काय तें समजल्यामुळें मला थोडेसें जरी बरें वाटलें, तरी एकंदरींत काळजी व भीति फार वाटली. " त्या पलीकडल्या खोलींत जाऊन नीज बाहेर येऊं नको, व घरभर हिंडूं नको, " असें मीं त्याला बजावून पाठवून दिलें, व पुढें काय करावें या विवंचनेंत पडलें.

स्वयंपाक अगदीं तयार झाला होता. जेवून कोर्टांत जाण्याची वेळ झाली होती. या वेळीं हा प्रकार सांगूं कीं नको, सांगितला तर जेवण जाणार नाहीं व उपासमार होईल, पण न सांगून तर चालणार नाहीं, कारण, संध्याकाळीं या बंगल्यांत जेवावयाचें किंवा निजावयाचें नाहीं असें माझ्या मनानें घेतलें. म्हणून रोजच्या जागीं पानें न मांडतां मोठ्या दिवाणखान्यांत सर्व खिडक्या उघडून व फिनेल टाकून मग मांडविलीं. रोजच्यापेक्षां थोडा उशीर झाला होता, त्यामुळें जेवणाकडे किंवा आज जागा कां बदलली याजकडे पहिल्यानें लक्ष नव्हतें; पण मागला भात घेतला त्या वेळीं विचारलें " आज जेवणाची जागा कां बदलली ? "

तेव्हां मीं म्हटलें " आज घरांत उंदीर निघाले आहेत. संध्याकाळची सोय कोठें करावयाची ? "

तेव्हां सांगितलें "आजपासून तीन दिवस कोर्टाला सुटी आहे. दुपारच्या गाडीनें आपण लोणावळ्यासच जाऊं. जरूर लागतील तेवढेच जिन्नस व मुलांना घेऊन तूं बोरीबंदरावर ये. मी कोर्टांतून परभारें स्टेशनावर येईन व मग आपण पुढें जाऊं. "

तीन वाजेपर्यंत मी घरांतील सर्व व्यवस्था लावून व बंदोबस्त करून त्या आजारी मुलाला व त्याच्या आईला इस्पितळांत पाठविलें. पहारेवाल्याला व शिपायाला " उघड्या देवडीवर होईल तितकें करून वेळ काढा, होईल तोंवर बंगल्यांत जाऊं नका, संभाळा मात्र," असें सांगून मीं घरांतील जोखमेच्या मालाच्या पेट्या भरून बरोबर घेतल्या. पहारेवाला व शिपाई यांशिवाय स्वतःचा रीडर, सखूचा मास्तर व चारपांच विद्यार्थी मिळून सहासात जणांची जेवणाची, निजण्याची व राहाण्याची सोय चार पांच दिवसांकरितां आमच्या समोरच्या शेट वीरचंद दीपचंद यांच्या तबेल्याच्या माडीवरच करून दिली व त्यांना लागणारें सामानसुमान आणण्यास पैसे देऊन मी स्टेशनावर गेलें, तों नुकतेंच येणें झालें होतें व गाडीचीही वेळ झाली होती म्हणून आम्ही सर्व जाऊन डब्यांत बसलों. आणि रात्रीं दहा वाजतां लोणावळ्यास उतरलों.

इकडे मुंबईस त्याच रात्रीं बंगल्यांत पहारा करणारा परदेशी पहारेवाला व आम्हीं लोणावळ्यास आणलेल्या शिपायाचा मातादीन नांवाचा भाऊ असे दोघेही प्लेगनें एकदम लागले अशी मुंबईहून लोणावळ्यास दुसरे दिवशीं नऊदहा वाजतां तार आली. माझा भाचा लोणावळ्यास आला होता. त्याला व दुर्गाप्रसाद शिपाई या दोघांना मीं परत मुंबईस पाठवून तेथील बंदोबस्त करण्यास सांगितलें. ही बातमी तांत्रिक जवळ कळविली होती, पण काळजी वाटण्यासारखा किंवा तिकडे लक्ष वेधण्यासारखा मजकूर सांगितलाच नाहीं. या दोघांना मात्र मीं एकीकडे बोलावून सांगितलें "तुम्ही आपल्याला जपा. तेथें गेल्याबरोबर आजारी माणसांना इस्पितळांत पोहोंचवा. मॅजिस्ट्रेटला चिठी दिली आहे, त्याप्रमाणें ते पेन्शनर पोलीस पाठवितील, त्याला बंगल्याचा पाहरा करण्यास सांगून तुम्ही बाहेर विद्यार्थी रहात आहेत त्या बंगल्यांत रहा."

ही सर्व व्यवस्था मी स्वतःला न कळवितां परस्पर करवीत असें. ह्याचें कारण, कोणीही आजारी असलें, तरी स्वतः वास्तपुस्त घेऊन त्याची नीट व्यवस्था लागेपर्यंत चैन पडावयाचेंच नाहीं, असा स्वभाव होता. इतर आजारांची गोष्ट वेगळी; ही स्पर्शजन्य सांथ आहे, हिच्यापासून स्वतःला जितकें दूर राहतां येईल तितक्या तऱ्हेनें आपणच व्यवस्था केली पाहिजे. स्वतःकडून अशा वेळीं आपल्याला जपण्याकरितां दूर रहाणें होणार नाहीं, हें मला माहीत होतें, म्हणून होतां होईल तों या आजारी माणसांची बातमीच कळूं देऊं नये; आपल्याला समजेल तितक्या काळजीनें योग्य बंदोबस्त करावा म्हणजे झालें; त्यांत मात्र हयगय करतां कामा नये, इतकें माझ्या मनानें घेतलें होतें व त्याच धोरणानें मी हें सर्व करीत होतें.

आम्ही मुंबईहून निघण्यापूर्वी आमच्या स्वयंपाकीणबाईचा मुलगा लागला आहे अशी बातमी जर स्वतःच्या कानावर गेली असती तर त्या दिवशीं घरांतून लोणावळ्यास येणें झालें नसतें; इतकेंच नव्हे, तर त्याला इस्पितळांत पाठवितेवेळीं इतकी ती रडत होती व आर्जव करीत होती, कीं, तें स्वतः

पाहिलें असतें तर त्या स्पर्शजन्य रोगाची पर्वा न करतां त्या मायलेंकरांना इस्पितळांत पाठवूं नको, घरांतच राहूं दे, असें साफ सांगितलें असतें व एकदां असें सांगितल्यावर ती गोष्ट करणें आम्हांला भागच होतें, अशी माझी पक्की खात्री होती म्हणून लोणावळ्यास पोहोंचून दुसरे दिवशीं तार येईपर्यंत ही बातमी मीं जवळ कळविली नाहीं. पण तार आल्यावर हें गुप्त भांडवळ फुटलें व मला पुष्कळ रागें भरून घ्यावें लागलें, पण कळलें तर किती राग येईल हें मला आधींच माहीत होतें व सगळ्या गोष्टी जाणूनबुजून केल्या असल्यामुळें रागें भरून घेतल्याचें फारसें वाईट वाटलें नाहीं. आतां हीं दोन्हीं माणसें (वासुदेव व दुर्गाप्रसाद) पाठविण्याची व्यवस्था स्वतःला साधारण कळवून केली होती, तरी ते मुंबईला रवाना झाल्यावर संध्याकाळपर्यंत "अशा वेळीं आपण मुंबईस असतों तर फार बरें झालें असतें," असे तीनचार वेळ माझ्याजवळ उद्गार निघालेच. यावरून मला वाटलें कीं, बाहेरून शांतपणें जरी रोजच्यासारखे सर्व व्यवहार चाललेले दिसत आहेत, तरी मन मुंबईस आहे.

इकडे ते दोघे मुंबईस जाऊन ट्रममध्यें बसले, तेव्हां दुर्गाप्रसाद म्हणाला "वासुदेवराव! माझ्या जांघेंत थोडेंसें दुखत आहे व थंडी वाजत आहे."

हें ऐकून वासुदेवाला वाटलें, कीं, मुंबईस पाठविल्यानें भिऊन जाऊन ह्याला हा उगीच भास होत आहे. म्हणून त्याचें बोलणें त्यानें थट्टेवारी नेलें. घरीं जातां जातां त्यांनीं कमिटीची गाडी बोलाविली व बंगल्यांत असलेले दोघे आजारी इसम इस्पितळांत पाठवून देऊन हे दोघे विद्यार्थ्यांचे माडींतच राहिले. ज्याच्या जांघेंत दुखत होतें, त्या दुर्गाप्रसाद शिपायाला त्याच रात्रीं बारा वाजतां थंडी वाजून येऊन ताप भरला व पहांटे चारपांच वाजेपर्यंत त्याच्या दोन्ही कानशिलांखालीं बेलफळाएवढाल्या दोन गांठी आल्या. हें आम्हांला तिसरे दिवशीं शनिवारीं दुपारीं बारा वाजतां तार आल्यावरून समजलें. तार स्वतःच्या हातीं पडली तेव्हां जेवावयास बसावयाची वेळ होती. पण तार वाचल्याबरोबर अतिशय काळजी वाटली व तोंड अगदीं

लहान होऊन एकदम म्हटलें "मी आज दोन वाजतांच्या गाडीनें मुंबईस जातों व तेथील सर्व बंदोबस्त करून येतों."

मीं म्हटलें "**स्वतः** जावयाचें आणखी बंदोबस्त तो काय करावयाचा?"

तें ऐकून व त्रास येऊन म्हटलें "असें वेड्यासारखें काय विचारतेस? वेळ समजावी कीं नाहीं? या वेळेस दुसरी व्यवस्था ती काय करावयाची असते? एखादी चांगली जागा पहावयाची आणि तेथें लागणारें सामान व विद्यार्थी यांना ठेवावयाचें, म्हणून मला आजच्या आज गेलें पाहिजे."

ती काळजीची व त्यामुळेंच रागाची वेळ होती तरीही हें बोलणें ऐकून मला हंसूं आलें; पण मी वाढीत होतें, म्हणून मला चटकन् स्वयंपाकघरांत जातां आलें. नाहीं तर अशा वेळीं मला हंसूं आलेलें पाहून अतिशय राग आला असता. मला तरी ह्या वेळीं **स्वतः**चें बोलणेंच हंसूं येण्याला कारणीभूत झालें. स्वभाव इतका मायाळू व काळजीखोर असल्यामुळें या आजारी माणसांच्या बातमीनें मनाची अगदीं इतकी खळबळ उडून गेली होती, कीं, आपण जी गोष्ट करण्याचें मनांत आणिलें आहे ती आपल्या हातून कितपत होईल, अशा जातीची किंवा घरासंबंधीं कोणत्याही तऱ्हेची गोष्ट आजपर्यंत आपण **स्वतः**वर घेऊन कधीं केली आहे काय, ह्याचा विचारसुद्धां **स्वतः**च्या मनाला शिवला नाहीं, याचेंच मला हंसूं आलें; दुसरें कांहीं नाहीं. तरी तें मीं आवरून धरून कांहीं उत्तर दिलें नाहीं. जेवण होईपर्यंत जितकें बोलणें झालें, तितकें मीं ऐकून घेतलें व **स्वतः**चें जेवण झाल्यावर त्याच ताटांत मीं आपलें वाढून घेऊन जवळच पण थोडीशी पलीकडे जेवावयास बसलें.

नेहमीं सुट्टीच्या दिवसांत माझें जेवण होईपर्यंत मुखशुद्धि करीत व इकडल्यातिकडल्या गोष्टी बोलत तेथेंच बसावयाचें असे. त्याप्रमाणें मीं जेवावयास बसल्यावर मुंबईच्या गोष्टी निघाल्या. त्यावरून मघाच्यापेक्षां **स्वतः**च्या मनाला जरा शांतता आली आहे असें पाहून मीं हळूच विचारलें,

"मग आज मुंबईचें काय ठरलें?"

स्वतः कांहींच उत्तर दिलें नाहीं. विचार चालला आहे असें दिसलें. म्हणून पुनः मींच म्हटलें "मला सांगितलें तर आज मी पुढें जातें. मघांशीं म्हटलेलें सगळें काम करतें. जागा पाहून बिऱ्हाड बदलून विद्यार्थ्यांची व आपली सर्वांची सोय करून जमल्यास रात्रीच्या गाडीनें परत येईन, नाहीं तर तार करीन. मुलांना मात्र मी बरोबर नेत नाहीं. तीं तेथेंच जवळ राहूं देत.त्यांच्या येण्यानें माझ्या कामाचा घोंटाळा होऊन त्यांचेही हाल होतील. कल्याणास एक जागा आहे; व दुसरी भांडुपास आहेना? मी दोन्ही जागा जाऊन पहातें व कोणती तरी एक पसंत करून स्वतःच्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं करतें. त्याची कांहीं काळजी नको. अशा गोष्टी आजपर्यंत स्वतः कधींच केल्या नाहींत; त्या आतां कशा बरें होतील? याकरितां मलाच जा म्हणावें म्हणजे मी जातें."

असें माझें अर्जवाचें बोलणें ऐकल्यावर जरा विचार करून म्हटलें "बरें, तूं म्हणतेस तसेंच कर. पण तूं एकटी जाऊन काय करशील, व तुझ्या-शिवाय मुलें येथें कशीं रहातील?"

मीं म्हटलें "त्याला काय उपाय? कराव्या लागत आहेत त्याच गोष्टी आपण करीत आहों. शिवाय, दोन्ही ठिकाणीं आपल्या ओळखीचीं बरींच माणसें आहेत तीं मदत करतील. मुलांच्या राहण्याबद्दलची काळजी नको. तीं माझ्यापेक्षां जवळच अधिक आनंदानें राहतील." हें ऐकून घेतल्यावर दोहोंच्या गाडीनें मला जाण्याची परवानगी दिली.

वेळ थोडा राहिला होता, व आतां माझें मुख्य काम म्हणजे सखूची व नानूची समजूत करण्याचें होतें. त्यांचें आर्जव करून त्यांना खेळ काय पाहिजे, खाऊ काय पाहिजे, हें विचारून "येतेवेळां तुमचे सर्व जिन्नस आणीन, विसणार नाहीं," असें मीं कबूल केल्यावर मोठ्या मिनतवारीनें त्यांनीं एकदांचें होय म्हटलें.पण पुनः मला मुलांनीं बजावून सांगितलें, कीं, "तूं उद्यां दुपारपर्यंत आली नाहींस तर आम्ही जेवणार नाहीं व तुझ्याशीं बोलणार नाहीं व पुनः तुला एकटीला कुठें जाऊं देणार नाहीं!"

हें त्यांचें बोलणें सर्व कबूल करून मीं एकदांचें पाऊल बाहेर काढलें. प्रथम कल्याणास गेलें. तेथें दोनतीन बंगले पाहिले; पण ते मला पसंत पडले नाहींत. तेथें तुरळक प्लेगकेसीस होत होत्या असेंही ऐकलें. म्हणून तशीच पुढें भांडुपास गेलें. स्टेशनपासून पायांनीं सुमारें सात मिनिटांच्या वाटेवर धुळ्याचे श्री. बाबासाहेब गरुड यांचा मोठा बाग व बंगला आहे, तो मीं जाऊन पाहिला. बंगला फार मोठा व हवाशीर होता, पण अगदीं नादुरुस्त व ओसाड दिसत होता, तरी कंपौंड मोठें, बाग चांगली व हवा मोकळी असल्यानें तीच जागा पसंत केली व "आतांच्या आतां कोणी मनुष्य मुंबईस पाठवून सारवणारे मजूर व चुना लावणाऱ्या लोकांना बोलावून कामाला लावा, जास्त पैसे पडले तरी हरकत नाहीं; पण रात्रींतून सर्व जागा झाडून, सारवून व चुना लावून सकाळीं रहण्याजोगी झाली पाहिजे," असें त्या बंगाल्यांत रहाणाऱ्या कारकुनाला सांगितलें. त्यानें "सकाळला सर्व तयारी करतों," असें कबूल केल्यावर मीं काशीनाथाला एक चिठ्ठी लिहिली, कीं, "मीं भांडुपास गरुडांचा बंगला पसंत केला आहे. उद्यां सकाळच्या गाडीनें वासुदेव मास्तर व बाळकोबा यांना सर्व सामान घेऊन भांडुपास पाठीव व तूं संध्याकाळीं कोर्टांतून आल्यावर लिहिण्यावाचण्याचें सर्व सामान व अवश्य लागणारीं तेवढीं बुकें भांडुपास घेऊन ये. उद्यां आदितवार आहे. संध्याकाळपर्यंत ही सर्व व्यवस्था लागल्यावर तुम्ही आम्हांला तार करा, म्हणजे आम्ही गडी ब्राह्मण घेऊन सोमवारीं सकाळीं परस्पर भांडुपासच येऊं."

हें सर्व झाल्यावर रात्रीं दहाच्या गाडीनें निघून एक वाजतां लोणावळ्यास येऊन उतरलें. घरीं आल्यावर दिवसभर जीं कामें केलीं, तीं सर्व सांगितलीं. तेव्हां सर्व हकीकत ऐकून फार बरें वाटलें असावें असें दोनचार वेळ निघालेल्या उद्गारांवरून मला वाटलें.

दुसरे दिवशीं संध्याकाळीं "सर्व तयारी आहे," अशी भांडुपाहून तार आली, तेव्हां त्याच रात्रीं बाराच्या गाडीनें गडी व बजाबा यांस पुढें रवाना करून आम्ही दुसऱ्या गाडीनें भांडुपास आलों. ह्या दिवसांत लोणावळ्यास

व भांडुपास भांडीं, बिछाने, कपडे, साहित्य व नोकर ह्यांची दोहींकडे सारखी व्यवस्था ठेविली असल्यामुळें आम्ही जाऊं त्या वेळेस ओझें घेण्याचा वगैरे त्रास बिलकूल पडत नसे. नुसतें इकडून तिकडे फिरावयास गेल्यासारखेंच जावयाचें. सोमवारीं सकाळीं नऊ वाजतां भांडुपास येऊन पोहोंचलों. स्टेशनावर वासुदेव व मास्तर आले होते. आम्ही बिऱ्हाडीं गेल्यावर "काशीनाथाला बाचावयास बोलाव," असें सांगितलें; पण तो मुंबईला गेला आहे असें कळलें.

आम्ही आज येथें यावयाचीं आहों असें माहीत असून काल संध्याकाळीं येथें आलेला मुलगा आज पुनः मुंबईला कां गेला? आज स्वतःचा खोळंबा होईल ह्याची काळजी त्याला असूं नये का! असें वाटून मला त्याचा राग आला; पण स्वतःला याबद्दल कांहीं वाटलें नाहीं. उलट विचारलें "मुंबईस गेला असला तर जाऊं दे, पण प्रकृतीनें बरा आहेना?"

इतकें झाल्यावर मग स्नान व जेवण होऊन कोर्टांत जाण्याकरितां स्टेशनावर जाणें झालें. त्या दिवशीं काशीनाथ दुपारीं जेवावयला देखील आला नाहीं. दोन वाजतां आमचा बजाबा फराळाचा डबा घेऊन नित्याप्रमाणें कोर्टांत गेला, तों त्याला शिरस्तेदारांनीं सांगितलें कीं, "काशीनाथाची चिठ्ठी आली आहे, व त्यानें लिहिलें आहे कीं, 'मी आदितवारीं भांडुपला गेलों होतों, पण सोमवारीं पहांटेस ताप येऊन गोळा उठला म्हणून ही गोष्ट तेथें कोणास न कळवितां मी मुकाट्यानें उठून लंगडत लंगडत स्टेशनावर येऊन गाडींत बसलों व भायखळयावर उतरून हॉस्पिटलमध्यें आलों आहें. मी बरा आहें. देसाई डॉक्टर मला चांगलें औषध देतील असें बजाबाबरोबर वहिनीबाईस कळवा. ही चिठ्ठी मीं स्वतःला (रावसाहेबांस) लिहिली असती, पण विनाकारण फार काळजी लागेल व माझी प्रकृति तितकी काळजी करण्यासारखी नाहीं. तीनचार दिवसांत मला बरें वाटेल, वगैरे" व ही चिठ्ठी त्यांनीं बजाबाजवळ दिली.

बजाबा संध्याकाळीं सुमारें सहा वाजतां भांडुपला आला. त्यानें ही सर्व हकीकत मला सांगितली. ती ऐकून मी अतिशय काळजींत पडलें. मन अगदीं गोंधळल्यासारखें होऊन कांहींच सुचेनासें झालें. कारण, ही बातमी आतां रात्रींच जवळ कळली तर जेवण जाणार नाहीं. रात्रभर झोंप येणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर आतां रात्रींच, उजाडण्याची वाट न पाहतां इस्पितळांत जाऊन त्याला पाहण्याचा बेत होईल. सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत प्लेगचा संसर्ग दुसऱ्याला फार बाधतो, असें मीं ऐकलें होतें. तेव्हां अशा वेळीं प्लेगच्या रोग्याजवळ स्वतःचें जाणें होऊं नये अशी माझी इच्छा होती, म्हणून अशा संकटांत पडलें. बरें, न कळवावें, तर माझ्यावर नुसता दोषच राहणार नाहीं, पण रागसुद्धां होईल. कारण, हा मुलगा आमचा दूरचा (सासूबाईच्या माहेराकडून) आप्त होता. शिवाय, इंग्रजी लिहिणें व वाचन चांगलें असून समजूतही चांगली असे. हा एकदां काम करावयास बसला म्हणजे पांचपांच सहासहा तास मांडी हालवीत नसे, कीं, कंटाळत नसे. याची वागणूक इतरांशीं दांडगाईची असून स्वभावानें बेपर्वाई होता. एक स्वतःवर त्याची भक्ति असल्यामुळें स्वतः-शिवाय आपल्याला हुकूम करणारें दुसरें कोणी नाहीं असें तो समजत असे. इतकें होतें, तरी तो कामांत हुषार असल्यामुळें त्याच्यावर स्वतःची फार मर्जी असे. एखादे वेळेस मींही त्याच्याविरुद्ध रागानें कांहीं सांगितलें, तर लागलीच म्हणणें होई, कीं, " तो अजून पोर आहे, हिरवट आहे, त्याचें इतकें मनावर तें काय घ्यावयाचें आहे? त्याला काम पडतें म्हणून तो रागावत असेल, बोलत असेल, तिकडे दुर्लक्ष केलें म्हणजे झालें. काम करणारीं माणसें बहुधा रागीटच असतात. "

या गोष्टी मला माहीत होत्या म्हणून काशीनाथ आजारी झाल्याचें त्या रात्रीं मीं मुद्दाम कानावर जाऊं दिलें नाहीं. खरें म्हटलें म्हणजे आल्याबरोबर वाचनाकरितां त्याला बोलवावयाचें; पण गुरुवारपासून या माणसांच्या आजाराच्या बातमीनें स्वतःची झोंप नाहींशी झाली होती. त्यांत आदित-

चारीं रात्रीं दोन वाजतां लोणावळयास गाडींत बसावें लागल्यामुळें आधींच झोंप घेतां आली नाहीं व मागून गाडींत बसल्यावरही लागली नाहीं, म्हणून ती सर्व रात्र झोंपेवांचून गेली होती; त्यामुळें घरीं आल्यावर फार थकवा आल्यामुळें वाचनाचें नांव काढलें नाहीं.

घरीं आल्याबरोबर जेवण झालें, पण अगदींच थोडें खाल्लें व बिछान्यावर पडून मला सांगितलें " आज माझें डोकें व अंग फार दुखत आहे. जरा वेळ अंग चेप आणि बदामाचें तेल डोक्याला चोळ म्हणजे झोंप लागली तर लागेल."

मग गड्याला बोलावून पायांला लोणी चोळण्यास बसवून मी अंग चेपूं लागलें. बराच वेळ अंग चेपल्यावर डोक्याला व कानशिलाला बदामाचें तेल चोळीत बसलें. त्या चोळण्याच्या नादानें सुमारें दहा वाजतां स्वतःला चांगली झोंप लागली व मला किती तरी बरें वाटलें. त्या रात्रीं मला मात्र झोंप आली नाहीं म्हटलें तरी चालेल. मी पहांटेस चार वाजतां उठलें. वेणी अंगधुणें उरकून घेऊन स्वयंपाकाचें सर्व साहित्य चुलीपाशीं काढून ठेविलें व स्वयंपाक काय करावयाचा तें आचाऱ्याला सांगितलें. तोंपर्यंत फटफटण्याचा सुमार झाला, म्हणून हळूच जाऊन मुलांना उठवून आणिलें. सखूची वेणी व अंगधुणें उरकून घेऊन परकर पोलका नेसविला व " तुला आज वासुदेव शिकवील. तुझ्या मास्तरांना मी मुंबईस नेणार आहें. लवकर परत येईन बरें! नानू व तूं खेळा, भांडूं नका, " असें सांगितलें. तें ऐकून घेऊन ती आपल्या उद्योगाला लागली. इकडे नानूलाही कपडे बदलून दुसरा पोषाख घालून कोको पाजून फिरावयास नेण्याकरितां शिपायाच्या स्वाधीन केलें. इतकें झाल्यावर स्वतःची चहाची वेळ झाली म्हणून चहा देऊन मींही घेतला आणि बाकी राहिलेला विद्यार्थी मुलांना देऊन " तुम्ही सर्वजण घ्या, मला उशीर होतो, मी जातें, नऊसाडेनवाला परत येईन," असें सांगून मुलीच्या मास्तराला बरोबर घेऊन मी स्टेशनावर गेलें व भायखळयावर उतरलें. तेथें भाड्याची गाडी करून हिंदुहॉस्पिटल-मध्यें गेलें.

मथूबाई व केशव पूर्वीं ह्याच हॉस्पिटलमध्यें आलीं होतीं. मीं पहिल्यांदा जाऊन केशवासच पाहिलें. त्याला सहा गोळे आले होते, पण ताप बेताचा होता व तो लवकरच बरा होण्याच्या स्थितींत होता. त्याची आई शुश्रूषेला होती, हा त्याला मोठा आधार होता. त्याला पाहून तशीच मी काशीनाथाला ठेविलें होतें तेथें आलें आणि पहातें तों त्याला खाटेला बांधून टाकलेलें होतें, जवळ चार विद्यार्थी व डॉक्टर देसाई उभे होते. त्याला ताप १०५ डिग्री असून एकसारखी तहान व भूक लागत होती. डॉ. देसाई यांनीं हळूच मला सांगितलें "तो बेफाम आहे, पण अजून शुद्धीवर आहे; तरी तो ह्यापुढें जास्त बहकेल. त्यानें उठतां कामा नये. कदाचित् हार्ट फेल होण्याची भीति आहे; पण तो कोणाचेंच ऐकत नाहीं व कोणाला आवरत नाहीं म्हणून त्याला बांधावें लागलें आहे."

माझ्याशीं डॉ. देसाई बोलत असतांना काशीनाथ एकसारखा टक लावून पहात होता, पण त्याची खात्री नव्हती. तेव्हां मीच पुढें होऊन त्याला विचारलें "काय, काशीनाथ! बरा आहेस? आतां तुला कसें वाटत आहे? डॉक्टर म्हणतात कालच्यापेक्षां आज तूं पुष्कळ बरा आहेस."

असें मी बोलत असतांना त्यानें आपले डोळे चोळून व ताठ उघडून माझ्याकडे पाहिलें. तो मोठ्यानें हंसला व म्हणाला "काय वहिनी तुम्ही आलांत? तुम्हांला माझ्या समाचारास पाठविलें?"

मीं म्हटलें "होय, आतां स्वतःसुद्धां कोर्टांत जातांना तुझ्याकडे येऊन तुला पाहून पुढें जाणें होईल."

हें ऐकून व डॉक्टर यांजकडे पाहून मोठ्या आढ्यतेनें तो म्हणाला,— "Look at my master! How kind he is specially to me. He has sent his own wife to see me, in this Plague Hospital. Besides he is coming personally to see me. He would have come even yesterday but busy as he is, gets no time, you know. He is always busy in the day and night, till he gets fast asleep. I am his reader, you know.

I read so many hours a day, I never sit still. But you have made me prisoner, don't you know who I am? I am Justice Ranade's reader. He will never do without me. You hove no business to detain me. I am his private secretary. Don't you konw whose man I am? Will he like if I sit still doing nothing? I must get up and attend to my work. I shall not listen to anybody." असें म्हणून तो मोठ्यानें ओरडावयाला लागला व उठण्यासाठीं तडफडूं लागला.

असें झाल्यावर डॉ. देसाई यांनीं मला खूण केली त्यावरून मी बाहेर निघून आलें व "जैन हॉस्पिटलकडे गाडी घे," म्हणून गाडीवाल्यास सांगितलें. त्याप्रमाणें तिकडे गेल्यावर वैद्य आडनांवाचे गुजराथी डॉक्टर होते त्यांना निरोप पाठविल्यावर ते बाहेर आले आणि आमचे आजारी नोकर जेथें होते तेथें मला घेऊन गेले. त्या हॉस्पिटलमध्यें आमचे तीन परदेशी नोकर होते. मातादीन व पहारेवाला दोघे बेशुद्धच होते, त्यांना पाहून मी दुर्गाप्रसादाकडे आलें, तों तो अर्धवट शुद्धींत असून कांहीं बोलत होता, वर्णोच्चार स्पष्ट होत नसल्यामुळें तो कांहीं बोले तें उमजत नसे. डॉ. वैद्य यांनीं मला सांगितलें "या मनुष्यानें औषध किंवा दूध बिलकूल पोटांत जाऊं दिलें नाहीं."

हें ऐकून मीं दुर्गाप्रसादाला हांक मारिली व "मी तुला येथें पहाण्याला आलें आहें, तूं मला ओळखलें काय?' असें विचारलें.

त्यानें होय म्हटलें व डोळे उघडून पहाण्याचा प्रयत्न केला. त्याचे डोळे अगदीं लाल झाले असून ताठल्यासारखे दिसत होते. मीं त्याला म्हटलें "तूं औषध किंवा दूध कां बरें घेत नाहींस? भिऊं नकोस, डॉक्टर चांगले आहेत. ते तुला वाईट औषध द्यावयाचे नाहींत. मी येथें आहेना, मग थोडें दूध घे बरें. उद्यां डॉक्टर तुला बंगल्यावर पाठविणार आहेत." हें ऐकल्यावर त्यानें आ केला व दोनतीन औंस दूध घेतलें.

मग दुसऱ्या वार्डांतील रोगी पाहून मी स्टेशनावर येऊन सुमारें साडेदहा वाजतां भांडुपास आलें. त्यावेळीं स्वतःचें स्नान होऊन पाटावर बसून मी कोठें गेलें याची चौकशी चालली होती. बाळकोबानें पानावर भात वाढला व जेवणाला आरंभ झाला. मला पाहून विचारलें "तूं कोठें गेली होतीस?"

आतां काय उत्तर द्यावें या विचारांत मी आहें, इतक्यांत दोन्ही मुलें म्हणूं लागलीं " तूं लवकर येईन म्हणालीस पण आली नाहींस !"

तेव्हां ही संधि बरी आहे असें मनांत आणून मी स्वतःला उत्तर न देतां आधीं मुलांशीं बोलूं लागलें. तोंवर अर्धें जेवण होऊन मागला भात घेण्याची वेळ आली होती. तेव्हां मीं म्हटलें " जैन हॉस्पिटलमध्यें दुर्गाप्रसाद् वगैरे मंडळीस पाहाण्यास गेलें होतें. त्यांची स्थिति म्हणण्यासारखी कांहीं चांगली नाहीं, असें डॉक्टरचे बोलण्यांत आलें.' असें बोलतां बोलतां चारदोन मिनिटांनीं म्हटलें " आपला काशीनाथसुद्धां आजारी होऊन हिंदु हॉस्पिटलमध्यें गेल्याचें बजाबानें मला रात्रीं सांगितलें होतें. त्यालाही पहावें म्हणून सकाळीं लौकर उठून गेलें होतें. डॉ. देसाई यांनीं त्याची व्यवस्था चांगली ठेविली आहे. त्याचा ताप १०५ डिग्री असून त्याला नारळाएवढा एक गोळा आला आहे. तो अर्धवट शुद्धींत असून बेफाम आहे. कोणाला आवरत नाहीं, म्हणून डॉक्टरांनीं त्याला खाटेला बांधून टाकलें आहे. "

मी काशीनाथाची हकीकत सांगूं लागेपर्यंत मागल्या भाताचे दोनतीन घास खाणें झालें होतें. काशीनाथाचें नांव घेतांक्षणींच जेवणाचा हात तसाच आंखडून धरून मी सांगत होतें ती हकीकत स्तब्धपणानें ऐकून घेतल्यावर एक मोठा सुस्कारा टाकला, डोळे भरून आले व "आपण या पंधरा दिवसांपूर्वीं बंगला सोडला असता तर अशी वेळ आली नसती. हा मुलगा चांगला होतकरू आहे, फारच कामाचा, अशीं नेटाचीं मुलें फारच थोडीं असतात," असें म्हणून पुष्कळ हळहळून जेवण एक घासही पुढें न घेतां तसेंच आंचवणें झालें.

त्या दिवशीं मुखशुद्धि, सुपारी वगैरे खाण्याकडे लक्ष नव्हतें, म्हणून तें जशाच्या तसेंच पडून राहिलें. घाईघाईनें पोषाख करीत चोपदारास सांगितलें " जातां जातां काशीनाथाला पाहून तसेंच पुढें जाऊं."

चोपदार हळूच म्हणाला " आतां जातेवेळीं भायखळयावर उतरलों तर कोर्टांत जाण्याला फार उशीर होईल."

तेव्हां त्याला स्वतः म्हटलें " बरें तर, संध्याकाळीं येतांना भायखळयावर उतरावयाचें, हें लक्षांत ठेव."

त्यानें होय म्हणून दप्तर व काठी हातांत घेतली व स्वतःही छत्री उघडून स्टेशनकडे जाणें झालें.

दुपारीं सुमारें तीन वाजतां हॉस्पिटलांतील डाक्टराकडून कोर्टांत निरोप आला, कीं, " आपल्या पांच नोकरांपैकीं तीन नोकर आज मेले आहेत. त्यांच्या मूठमातीची व्यवस्था करविणार किंवा हॉस्पिटलकडून करावयाची, तें कळवावें."

चिठ्ठी वाचून एक कारकून व चोपदार परस्पर हॉस्पिटलकडे पाठवून दिला व दुसऱ्या चोपदारास चिठ्ठी देऊन मजकडे पाठविलें. तो चोपदार माझ्याकडे आल्यावर मला सर्व वर्तमान कळलें व फार वाईट वाटलें. चिठ्ठींत लिहिल्याप्रमाणें लागलींच पन्नास रुपये देऊन त्याला रवाना केलें. काशीनाथाची व्यवस्था तुम्ही लावा व दुसऱ्या दोघांची व्यवस्था त्यांच्या जातवाल्यांकडून आपले पैसे देऊन करवा असें स्वतः सांगितलें होतें, त्याप्रमाणें त्यांनीं व्यवस्था केली.

त्या दिवशीं संध्याकाळीं कचेरींतून घरीं आल्यापासून प्रकृति अधिक अस्वस्थ झाली. झोंप बिलकूल नाहीं. आपल्या हातून कांहीं तरी चूक घडल्यासारखी मनाला रुखरुख लागून राहिली. तशांत रावबहादूर चिंतामण नारायण भट या जिवलग मित्राच्या मृत्यूची वार्ता आल्यामुळें अतिशय दुःख झालें व मनाला इतकी उद्विग्नता आली, कीं, दोनचार दिवस एकापुढें एक होणारीं नित्याचीं कामें करण्यासुद्धां सुचेनासें झालें. कित्येक वेळ

स्वतः लिहिण्यास बसणें झालें असतां लिहिणें आपोआप बंद करून तोच विचार करीत सचिंत बसावयाचें. बराच वेळ गेल्यावर आपण हें काय करीत आहों हें लक्षांत येऊन पुनः कामास लागावयाचें. “ चिंतामणराव माझे लहान भाऊ होते, माझा उजवा हात होता, माझीं सर्व कामें हातीं घेऊन खऱ्या नेटानें तेच चालवितील असा माझा भरवंसा होता, ते तसेच खरे निश्चयी व काम करणारे होते,” असे वारंवार उद्गार निघून हळहळावयाचें, सुस्कारे टाकावयाचे व डोळयांतून पाणी चालावयाचें. कामाशिवाय हात कधीं जो रिकामा रहावयाचा नाहीं, त्या ठिकाणीं काम करतांना मध्येंच दहादहा, पांचपांच मिनिटें सचिंत बसणें दिसूं लागलें. नेहमींपेक्षां बोलणें कमी झालें. अन्नावर वासना नसे. नेहमीं आवडणारीं ताजीं फळें आणि बदामपिस्ते हेंही खाण्याकडे लक्ष नाहीं, अशी स्थिति झाली. पुढें पुढें आठदहा दिवसांनीं तर अन्न अगदींच नकोसें झालें. कांहीं केलें तरी गोड लागत नसे. जेवावयास बसणें झालें म्हणजे अतिशय आंबट दहीं, चहाचे दोन किंवा तीन चमचे एवढें घेऊन तेवढ्या दह्यांत भिजेल इतकाच भात व पळीभर पिठलें एवढ्यावरच काय तें जेवण येऊन बसलें. दुसरे सर्व पदार्थ असून वर्ज्य केल्यासारखे होते. नेहमीं किती तरी तोंडीलावणीं आवडत. तिखटामिठाचे पदार्थ कितीही केले तरी ते हवे असत, त्यांचा कंटाळा म्हणून यावयाचा नाहीं. दोन्ही वेळ हरभऱ्याच्या पिठाचे पदार्थ अगर डाळीचे एक दोन पदार्थ असल्यावांचून जेवण धड व्हावयाचें नाहीं. इतर कितीही भाज्या, कोशिंबिरी व तोंडीलावणीं असलीं व त्यांत जर एक हरभऱ्याचा पदार्थ नसेल तर केलेले सर्व पदार्थ व्यर्थ वाटावयाचे व म्हणावयाचें, कीं, “ स्वयंपाक काय केला आहे ? एक जिन्नस खाण्यासारखा नाहीं.” अशी जी नेहमींची संवय, त्या ठिकाणीं नुसता पिठलें भात, व तोही थोडा ! यामुळें अशक्तता व तोंडावर पांढुरकी स्पष्ट दिसूं लागली व मला रात्रंदिवस काळजी व भीति वाटूं लागली. काय केलें म्हणजे पदार्थ गोड लागेल ! कांहीं तरी गोड लागून घासभर अन्न पोटांत गेलें तर झोंप येईल; पोटांत

अन्न नाहीं म्हणून झोंप येत नाहीं, मग आज काय बरें करूं? अशा विवंचनेंत व काळजींत आणि केव्हां मनांत योजलेले पदार्थ करण्यांत कचेरींत गेल्यापासून परत येईपर्यंत माझा सर्व वेळ जात असे. हा नाहीं तो पदार्थ गोड लागेल म्हणून दहापांच जिन्नस मीं रोज रोज करावेत, पण स्वतः ते कांहींच खावयाचे नाहींत व गोडही लागावयाचे नाहींत, असें पाहून मला फारच वाईट वाटे व काळजी दुणावे. एखादे दिवशीं हें स्वतःच्या लक्षांत येऊन म्हणावयाचें, कीं, "तूं इतके निरनिराळे पदार्थ करतेस पण मी ते खात नाहीं, त्यांचें माझ्याकडून चीज होत नाहीं, असें तुझ्या मनांत येऊन तुला वाईट वाटत असेल हें अगदीं बरोबर आहे. पण मी खरेंच सांगतों, माझ्या तोंडाला चव नाहीं, त्याला मी काय करूं? कोणताही पदार्थ तोंडांत घातला तरी नुसती राख घातल्यासारखी वाटते. तूं इतक्या मेहनतीनें केलेले पदार्थ खाल्ले नाहींत तर तुला वाईट वाटेल असें मनांत आणून मला वासना नसतांना नुसतें तुला बरें वाटावें म्हणूनच मी थोडेसे तरी पदार्थ तोंडांत घालतों, पण चवच नाहीं, त्याला माझा काय इलाज आहे? बरें तूं तर कांहीं करूं नकोस म्हटलें तर तेंही तुला बरें वाटत नाहीं, व केल्याशिवाय तूं रहात नाहींस, याला काय करावें!"

याप्रमाणें महिना सवा महिना असाच गेला. मार्च महिन्यापासून मे महिन्याच्या सुट्टीला जोडून त्या वर्षीं हायकोर्टानें चार आठवडे सुट्टी जास्त देऊन मार्चपासून कोर्ट बंद केलें, हें एक आम्हांला फार फायद्याचें झालें. "यंदां महाबळेश्वरीं जावें, प्रकृति बरी नाहीं, ती तेथें गेल्यावांचून सुधारणार नाहीं, तेथील हवा उत्तम आहे, वर्षभराचे श्रम परिहार करील व प्लेगही नाहीं, या सगळ्यापेक्षां मोठी सोय म्हणजे यंदां अडीच पावणे तीन महिन्यांची सुट्टी आहे; याकरितां कांहीं झालें तरी यंदां आम्ही महाबळेश्वरास जाऊं," असा माझा अतिशय आग्रह पडला. झोंप नाहीं, व अन्नही नकोसें झालें. याची उपेक्षा जास्त दिवस झाली तर हें दुखणें क्षयावर जाईल, अशी माझी कल्पना असल्यामुळें माझ्या मनानें अतिशय धास्ती घेतली, व कांहीं

तरी करून महाबळेश्वरीं जाण्याचा बेत होईल, असा माझा प्रयत्न सुरू झाला. पांचसहा दिवस रोज त्याच त्या गोष्टी निघून पुष्कळ खल झाल्यावर आमचा महाबळेश्वरीं जाण्याचा बेत ठरला.

मुंबईच्या माणसांला महाबळेश्वरीं पांचगणीच्या अलीकडे दहा दिवसांचें क्वारंटाईन ठेविलें होतें. महाबळेश्वरीं जाणाऱ्या गृहस्थांला आपल्याबरोबर आश्रित व नोकर किती जाणार आहेत, त्यांपैकीं पुढें किती जाणार, बंगला कोणता घेतला आहे वगैरे सर्व हकीकत कळवून महाबळेश्वरच्या बझार-मास्तरचा पास आणावा लागे, व तो पुढें जाणाऱ्या मंडळीबरोबर पाठवावा लागे. तेव्हां 'आतां महाबळेश्वरीं पुढें माणसें कोण कोण जावयाचीं तें ठरवून त्यांच्याबरोबर सामानसुमान व भांडीं जीं द्यावयाचीं असतील तीं तयार कर; हायकोर्ट बंद व्हावयास अजून दहा अकरा दिवस आहेत; तेव्हां आज उद्यांच आपलीं माणसें पाठविलीं पाहिजेत, म्हणजे तीं आपण जाऊं त्या सुमाराला मोकळीं होतील," असें स्वतः सांगितलें. महाबळेश्वरीं बंगला ठरविण्याबद्दल तेथील हाउस एजंट दत्तोपंत दीक्षित यांना पत्र लिहिलें होतें. त्यांचें उत्तर दुसरे दिवशीं आलें, कीं, "आपण लिहिल्याप्रमाणें बंगला नक्की केला आहे. मनुष्यें लवकर पाठवा. मी येथील सर्व व्यवस्था करतों."

त्याप्रमाणें दुसरे दिवशीं संध्याकाळीं एक ब्राह्मण, गडी व कारकून यांच्या बरोबर अवश्य लागणारें तेवढें सामान देऊन त्यांस भांडुपाहून रवाना केलें. पुढें मंडळी तेथें पोहोंचून तेथील सर्व व्यवस्था झाली आहे असें आठदहा दिवसांनीं दीक्षितांनीं पत्र पाठविलें. नंतर आम्हीं दुसरे दिवशीं महाबळेश्वरीं जाण्याचें ठरविल्यावर मीं मुद्दाम अतिशय विनवून व आर्जवानें सांगितलें, कीं, "या वेळीं केवळ काळजीनें व दगदगीनेंच प्रकृति इतकी थकली आहे व बरीच ढकललेली आहे, तर हे दोन महिने लिहिण्यावाचण्याचें कांहीं एक काम बरोबर न घेतां महाबळेश्वरच्या ताज्या व थंड हवेंत दोन्ही वेळां फिरून येऊन स्वस्थ मनानें विश्रांति घ्यावी, म्हणजे अंगांत नवें रक्त येईल व सर्व दुखणें जाऊन अधिक शक्ति येईल." तेव्हां नुसतें "होय," म्हणून कबूल

केलें. पण तें कबूल करणें निश्चयाचें वाटलें नाहीं, म्हणून मीं पुनः म्हटलें "असें काय बरें! माझ्या समजुतीपुरतें 'होय' म्हणून आपल्याभोंवतीं चाललेली वटवट बंद करून टाकावयाची एवढा विचार मला दिसतो. खरें होय म्हटलें आहे असें मला वाटत नाहीं.

हें ऐकून मोठ्यानें हंसून म्हटलें " बरोबर बोललीस; तुझे तूंच बोललीस म्हणून ठीक झालें. आम्हीं असा एखादा शब्द काढिला असता तर तो तुला आवडला नसता. बाकी, बायकांच्या बोलण्याला वटवट कसें म्हणावें म्हणून आम्ही शब्द काढीत नाहीं. विश्रांति घ्यावयाची म्हणजे काय, हेंच मला समजत नाहीं. आम्ही जें काय रोज करतों त्यांत आमचें कामही होतें आणि विश्रांतिही यांतच मिळते, असें मी समजतों. तुझी विश्रांतीची कल्पना काय आहे ती सांग पाहूं? आम्हां पुरुषांना ती कितपत पटेल याचा संशयच आहे. तुम्ही बायका पुण्यवान् आहांत म्हणून देवानें तुमची प्रकृति आमच्या उलट पण चांगली केली आहे. सगळी दगदग, सगळा त्रास सोसण्याकरितां त्यानें आम्हां पुरुषांची जात निर्माण केली आहे आणि घरांत सावलीला बसून आराम करण्याकरितां व सुख भोगण्याकरितांच तुम्हां बायकांना जन्म दिला आहे. आम्हीं मोजूनमापून खाल्लें तरी तें आम्हांला वेगळे श्रम केल्यावांचून पचत नाहीं, व दिवसांतून निदान सहासात तासांचीं कामें एकापुढें एक असल्यावांचून आम्हांला चैन पडत नाहीं, वेळ जात नाहीं तेंच तुम्हांला पहा, कितीही व कांहींही खा, मेहनत केल्यावांचून नुसतें बसूनही पचतें. घरांतील कांहीं काम अगर लिहिणें वाचणें कांहीं नाहीं. तरी सोंगट्या, बुद्धिबळें व गंजिफा यांच्यावर तुमचा वेळ जातो व करमणूक होते. इतकेंही असून तुमच्याकडे देवानें एक मोठा अधिकार ठेविला आहे. तो हा, कीं, तुम्हीं कांहीं केलें नाहीं तरी चालेल, पण आम्हां पुरुषांशीं तुम्हीं बुद्धिवाद मात्र करावा. त्यांत तुम्ही मोठ्या कुशल आहां!"

हें सर्व बोलणें जरी हंसत व चेष्टेनें चाललें होतें, तरी मी मध्यें कांहीं बोललें नाहीं व हंसलें नाहीं. मला ठाऊक होतें, कीं, जी गोष्ट मनांत करा-

वयाची नसेल त्याबद्दल दुसऱ्याला न दुखवितां युक्तिवादानें कुंठित करून गप्प बसावयास लावावयाचें व शेवटीं आपल्या मनांत असेल तेंच करून मोकळें व्हावयाचें असा जो स्वभाव आहे, त्या धोरणावर आतांची गोष्टसुद्धां जाऊं पहात आहे. तेव्हां या वेळीं जास्त बोलूं नये हें बरें, असें वाटून थोडा वेळ गप्प बसून दुसरे दिवशीं जाण्याची घाई असल्यामुळें मी आपल्या कामाला गेलें.

इकडे स्वतः एशियाटिक सोसायटीला चिठ्ठी लिहून आपल्याला जितकीं पुस्तकें पाहिजे होतीं तितकीं पुस्तकें आणवून नीट बंदोबस्तानें बरोबर घे असें वाचणाऱ्या मुलाला सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें सर्व बांधून घेतलीं. इकडे माझीही सर्व तयारी होऊन ठरल्याप्रमाणें आम्ही भांडुप सोडून महाबळेश्वरीं येऊन पोहोंचलों.

बंगला, झाडी व पाण्याची सोय चांगली होती. तें पाहिल्याबरोबर आम्हांला बरें वाटलें. गेल्या पांचसहा दिवसांपासून बाळकोबा मात्र ताप व खोकल्यानें फार आजारी आहे, त्याला अगदीं उठवत नाहीं, डॉक्टर येऊन त्याला रोज पहातात व औषध देतात असें मला गड्यानें सांगितलें, तें ऐकल्याबरोबर मी मुकाट्यानें उठून हातपाय धुवून व संध्याकाळची वेळ असल्यामुळें वस्त्रांतर करून स्वयंपाकाच्या तयारीला लागलें. ह्या खेपेला महाबळेश्वरीं मुलांना संभाळण्याकरितां म्हणून दोघी मुली बरोबर घेतल्या होत्या. त्यांचा ह्या वेळीं मला चांगला उपयोग झाला. त्यांना भांडीं व साहित्य काढून देण्याला सांगून मी स्वयंपाकाला लागलें.

ह्या वेळेस पुण्याच्या प्लेगला व तपासणीला त्रासून माझे चुलत चुलत सासरे विठूकाका आमच्याबरोबर महाबळेश्वरीं आले होते. त्यांचें वय सत्तर-बहात्तर असून हाडकाठी फार उंच होती व बांधाही मजबूत होता. हे गेलीं वीसबावीस वर्षें पुण्यास आमच्याजवळ रहात असत. हे स्वभावानें करारी व कडक होते व श्रीपांडुरंगाचे उपासक होते. त्यांचा रात्रंदिवस ईश्वरभजनांत, चिंतनांत व मननांत वेळ जात असे. ही हकीकत पुढें ओघाओघानें येईलच.

माझा स्वयंपाक झाल्यावर मीं निरोप पाठविला, तेव्हां सर्व मंडळी जेवावयास आली. जेवण झाल्यावर विठूकाकासुद्धां सर्व मंडळी आंचवून आपापल्या ठिकाणीं गेली. स्वतः मात्र मुखशुद्धीकरितां तेथेंच बसावयाचें होतें. मीं नेहमींसारखें तेंच ताट अलीकडे घेऊन आपलें वाढून घेतलें व "मला आतां कांहीं नको, तुम्ही जेवावयास बसा," असें त्या दोघी मुलींना सांगून मी जेवावयास बसलें. बाळकोबाच्या आजारासंबंधीं बोलणें निघून मला सांगितलें "आज दुपारीं आपल्या काकांची एक गम्मत झाली. आमच्या रानड्यांचे सर्वच पुरुष मजबूत व हिंमतवान, पण त्यांचा दम आमच्यामध्यें आज नाहीं, व आमच्यापेक्षां पुढलीं मुलें कमकुवतच ठरणार. आधींच पुण्याचथा तपासणीला त्रासून काका आमच्याबरोबर महाबळेश्वरीं आले व तेथेंही तपासणी आहे हें पाहून त्यांना बरें वाटलें नाहीं. त्यांना थोडा त्रास झाला. आमची गाडी तपासणीच्या नाक्यावर उभी करून डॉक्टर आम्हांला तपासण्याला आले. मला व मुलांना तपासल्यावर डॉक्टर काकांकडे वळले व नळी लावण्याकरितां त्यांनीं त्यांच्यापुढें केली. काका म्हणाले 'काय, मी नळी लावूं? आणि नळींत तुम्हांला काय समजणार आहे? माझें आयुष्य किती आहे तें सांगतां? तुमच्या हातीं आहे काय? तुम्ही पोटाचे नोकर, मला ताप आला आहे कीं नाहीं एवढेंचना तुम्हांला पहावयाचें आहे? पहा तर मग!' असें म्हणून त्यांनीं डॉक्टरचें मनगट घट्ट धरलें. डॉक्टर जातीचा मुसलमान पण पोक्त व सभ्य होता. त्यानें त्यांच्या तोंडाकडे पाहिलें व हंसून म्हटलें 'सोडा बुवा आमचा हात! तुम्हांला तापबीप कांहीं नाहीं. आमच्याहून तुम्हीच बळकट आहांत.' इतकें ऐकल्यावर विठूकाकांनीं त्याचा हात सोडला, मग आमची गाडी चालू झाली."

याप्रमाणेंच आणखीही त्यांच्या सामर्थ्याच्या लहानपणीं स्वतः पाहिलेल्या एकदोन गोष्टी सांगितल्या. इतकें बोलणें चालतें असतांना माझें जेवण झालें व आम्ही दोघेंही उठलों.

दुसऱ्या दिवसापासून पुढें आठ दिवस दोन्ही वेळचा स्वयपाक मलाच करावा लागे. त्या वेळीं त्यांतल्या त्यांत स्वतःला आवडणारे कांहीं पदार्थ

मी मुद्दाम करीं. पण महाबळेश्वरीं येऊन पांचसहा दिवस झाले, तरी प्रकृतीला वाटावें तितकें बरें वाटलें नाहीं. झोंप थोडीशी तरी लागूं लागली, पण तोंडाला स्ट्रॉबेरीवांचून कशाचीच चव लागेना. येथें आपल्यापासून स्ट्रॉबेरीचीं फळें मात्र आठदहा तरी पोटांत जाऊं लागलीं व मुंबईपेक्षां थकवा कमी होऊन बोलण्याचालण्यांत अधिक हुषारी दिसूं लागली. असे आणखी पांच सात दिवस गेल्यावर एके दिवशीं रात्रीं मामंजी फराळ करावयाचे नव्हते म्हणून स्वयंपाक केल्यावर मीं मुलींना सांगितलें " तुम्ही सगळे वाढा, मी आज येथें बोलत बसतें."

त्याप्रमाणें मंडळी पानावर आल्यावर मुलींनीं वाढावयास घेतलें व मी तेथें जवळ पाट घेऊन बसलें. पहिल्या भाताचे पांचसहा घास खाल्ल्यावर दोनतीन तोंडीलावणीं खाऊन पाहिल्यावर मला विचारलें "आज स्वयंपाक कोणीं केला आहे? पदार्थ चांगले झाले आहेत! आज माझ्या तोंडाला थोडी चव आली आहे."

मला वाटलें, ही नेहमींसारखी चेष्टा आहे. म्हणून मीं म्हटलें " स्वयंपाक कोणी कां करीना? त्याचा उपयोग काय! तोंडाला चव लागेल तेव्हां ना? कोणताही पदार्थ केला तरी चव लागत नाहीं व जात नाहीं, तोंपर्यंत स्वयंपाक करणाराची किंमत काय!" असें म्हणून मी गप्प बसलें.

तेव्हां सांगितलें " खरोखरीच, मी तुझी थट्टा करीत नाहीं. माझी चव आज परत आलीशी वाटते; आजचे सारे पदार्थ मला बरे लागत आहेत."

असें बोलणें होत असतांना पदार्थाकडे हात जाऊन पदार्थ खाणें होत आहे, इतक्यांत दुसऱ्यांदा वाढावयास आलेल्या भाज्या व आमटीही घेतली, असें पाहून मला मनांतल्या मनांत फार आनंद झाला. गेल्या अडीच तीन महिन्यांत माझ्या मनाला हृद्रोगासारखी जी एक काळजी लागून राहिली होती ती आतां थोडीशी दूर झाली. आज आपल्यावर ईश्वरानें कृपा केली आहे असें वाटून तेथेंच क्षणभर स्तब्ध बसून मीं मनांतल्या मनांत त्याचे किती तरी आभार मानले, प्रार्थना केली व तुझ्या कृपेनें हे माझे असेच

सुखाचे दिवस जावोत, असें मागणें मागितलें. ह्या वेळेस माझ्या डोळ्याला पाणी आलें. पण दुसऱ्या कोणाचे लक्षांत येण्यापूर्वींच मीं आपले डोळे पुसून दुसरें बोलणें काढलें.

त्या रात्रीं दोन घांस जास्त गेल्यामुळें रात्रीं झोंप चांगली येऊन सकाळीं पुष्कळ हुषारी वाटली. तोंडधुणें चाललें असतांना बरोबर फिरावयास जाण्याकरितां आबासाहेब काथवटे, शिवराम हरि साठे, श्रीरामपंत जठार वगैरे मित्रमंडळी नित्याप्रमाणें आली, तेव्हां त्यांना स्वतः सांगितलें "गेल्या आठदहा दिवसांत काल रात्रीं माझ्या तोंडाला चव लागली व झोंपही चांगली लागली. तेव्हां आज आतां पुष्कळ फिरण्यास कांहीं हरकत नाहीं."

त्या दिवसापासून जेवण चवीनें जाऊं लागलें, चांगलें पचन होऊं लागलें, व झोंपही चांगली येऊं लागली, त्यामुळें दुसऱ्या पंधरा दिवसांच्या आंत स्वतःची प्रकृति उत्तम झाली व परमेश्वराच्या कृपेनें ह्या वेळची माझी मोठी काळजी व भीति दूर होऊन आम्ही आनंदानें मुंबईस परत आलों.

विठ्ठल बाबाजी रानडे ऊर्फ विठूकाका हे माझे चुलत सासरे होत. हे आमच्या सांगलीच्या घराण्यांतील चौघां भावांपैकीं एक होते. आमचे मामंजी वारल्यानंतर दोन वर्षांनीं म्हणजे १८७९ सालीं हे पुण्यास आमच्या घरीं येऊन राहिले, ते शेवटपर्यंत आमच्याजवळच होते. हे पूर्ववयांत स्वभावानें तामसी व हेकेखोर होते म्हणतात. तसेंच शरीरानें भले धिप्पाड व उंच असून बळकटही होते. हे सर्व चुलतभाऊ व त्यांचीं मुलें बहुतेक आमच्या मामंजींजवळच असत. या मंडळींना भुदरगड, पन्हाळा, गडहिंग्लज, आळतें वगैरे निरनिराळ्या ठिकाणीं मामंजींच्या दृष्टीखालींच लहान लहान नोकऱ्या असत. ते नोकरीवर राहून बायकामुलें आमच्या कोल्हापरच्या घरीं ठेवीत, त्यामुळें त्यांच्या शिक्षणाची व निर्वाहाची सर्व तजवीज आमच्या मामंजींनाच करावी लागे.

अशाचपैकीं या विठूकाकांना एक पंधरावीस रुपयांची नोकरी होती. तीं त्यांनीं त्यांचा वरिष्ठ साहेब कांहीं अपमानासारखें बोलला म्हणून एकदम

राजीनामा देऊन सोडली व वैतागानें जे तीर्थयात्रेस म्हणून निघाले ते वर सांगितल्याप्रमाणें १८७९ सालीं पुण्यास परत येऊन एका ठिकाणीं असे स्वस्थ चित्तानें राहून रात्रंदिवस आपल्या भजनपूजनांत निमग्न राहिले. या वेळीं त्यांचें वय सुमारें ६५ वर्षांचें होतें. त्यांनीं सर्व हिंदुस्थानांतील यात्रा १५ वर्षें एकसारख्या पायांनींच केल्या होत्या. या सर्व हिंडण्यामध्यें व प्रवासामध्यें जे प्रसंग आले व साधुसंतांच्या भेटीचे योग आले, त्या सर्वांवरून त्यांना सर्वांपेक्षां भक्तिमार्ग अधिक श्रेष्ठ वाटून त्यांची त्याच मार्गावर श्रद्धा बसली. नवविधाभक्तींत सांगितल्याप्रमाणें ते अहोरात्र देवाचें ध्यान, भजन, पूजन, गीतापठण व नामदेव, तुकाराम वगैरेंचे अभंग म्हणण्यांत सदा निमग्न असत. पूजेचें फारसें अवडंबर नव्हतें. ते ती केव्हांच आपल्या खोलींत करीत. एक वेळ स्नानाकरितां व दोन्ही वेळ जेवणाकरितां मात्र ते आपली खोली सोडून बाहेर येत. बाकी दार लावून आपल्या खोलींत अभंग म्हणून भजन करीत बसत किंवा तें झाल्यावर आपण आपल्याशींच दुसऱ्याशीं प्रत्यक्ष बोलल्याप्रमाणें मोठमोठ्यानें बोलत. केव्हां रागानें,लोभानें, तर केव्हां तुझी लबाडी मला कळली म्हणून आश्चर्याच्या उद्गारानें, केव्हां मोठ्यानें हंसून देवाच्या अगाध कर्तृत्वाचें व लीलेचें कौतुक करीत. केव्हां केव्हां दयाळू म्हणवून घेतोस, पण भेटत कां नाहींस, म्हणून रुसल्यासारखें बोलत व कधीं कधीं तर सद्गदित होऊन व हुंदके देऊन प्रत्यक्ष रडत देखील. अशी त्यांची स्थिति असे. घरांतील व इतर मंडळींपेक्षां मला त्यांच्या या गोष्टी एकदोन वेळ सहजीं ऐकावयास मिळाल्यामुळें मला तो ऐकण्याचा नाद लागला. सकाळीं अगर संध्याकाळच्या शांत वेळीं केव्हां केव्हां रात्रींसुद्धां त्यांच्या खोलीच्या बंद केलेल्या दाराशीं मी कान लावून ऐकत उभी राहीं व हे असें बोलतात वगैरे जवळ सांगें. ते 'देवाशीं आपण बोलतों' अशी भावना ठेवून जें भक्तिपूर्वक बोलत, तें ऐकावेंसें वाटे. एखादे वेळेस हें त्यांचें बोलणें ऐकत असतां माझें अंतःकरण सद्गदित होऊन गहिंवर येई.

त्यांच्याबद्दल महाबळेश्वरीं त्या दिवशीं ज्या एकदोन गोष्टी मला स्वतः सांगितल्या म्हणून मागें म्हटलें आहे, त्यांपैकीं एक त्यांच्या शक्तीबद्दल व

धाडसाबद्दल आहे. त्यांना नोकरी होती त्या वेळेस एक वेळ त्यांच्या कचेरीं-तील साहेबानें ज्या मराठी कारकुनाची २५ वर्षे नोकरी झाली असेल त्याला पेन्शनांत काढावें, असा हुकूम पाठविला. तो आल्यावर २५ वर्षे ज्यांची नोकरी झाली होती, तितक्या लोकांची याद केली व तुम्हांला पेन्शनांत काढणार असें तितक्यांना सांगण्यांत आलें, आणि याद साहेबाला पाठवि-ण्यांत आली. कचेरींतल्या मुख्य कामगाराला विठूकाकांनीं विचारलें " इत-क्या लोकांना इतक्यांत साहेब पेन्शन कां देत आहेत ? "

त्यांनीं उत्तर दिलें " साहेबांचें म्हणणें असें आहे कीं, २५ वर्षे ज्यांनीं नोकरी केली त्यांचें वय झालें. ते अशक्त होतात व कामाला नालायक ठरतात. याकरितां अशांना पेन्शनमध्यें काढून नवीन, तरुण, होतकरू कारकुनांची भरती करावी."

विठूकाकांनीं तें सर्व ऐकून घेतलें व ते दुसरे दिवशीं सकाळींच उठून साहेबांच्या बंगल्यावर जाऊन बाहेर उभे राहिले. आठ साडेआठ वाजतां साहेब फिरावयास जाण्याकरितां बंगल्याबाहेर आले व सडकेवर येतात तों विठूकाकांनीं त्यांना रामराम केला. साहेबांनीं "कोण ?" म्हणून विचारलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें "मी विठल बाबाजी रानडे, अमुक कचेरींतील कार-कून आहें." साहेब म्हणाला " तुमचें काय काम आहे ? या वेळेस मी बाहेर जात आहें, आणखी केव्हां तरी येऊन भेटा."

"माझें बंगल्यावर येण्यासारखें काम नाहीं व आपल्याला कांहीं सांगाव-याचेंही नाहीं. आपण दोन मिनिटें आहांत तेथेंच उभे रहा म्हणजे झालें." असें म्हणून त्यांनीं धोतराचा काचा मारला व अंगरख्याच्या बाह्या वर चढवून तेथेंच पलीकडे रस्त्यावर चार बैलांनीं ओढण्याजोगा एक दगडी रूळ पडला होता, त्याजवळ जाऊन व त्याच्या दांड्या दोन्ही हातांनीं धरून तो रूळ साहेब उभे होते तेथें दरदर ओढीत आणला.

साहेबांना जरा आश्चर्य वाटलें व त्यांनीं विचारलें " हें काय करतां ?"

त्यावर विठूकाका म्हणाले " साहेब, मीं आपल्या कचेरींत असें ऐकलें कीं, २५ वर्षें नोकरी केलेल्या चटसाऱ्या कारकुनांना आपण त्यांचें वय झालें, ते अशक्त झाले म्हणून पेन्शनांत काढीत आहांत. अर्ज करावा तर आपलेकडे माझी गरिबाची दाद कशी लागणार; लेखी अर्ज करण्याच्या भानगडींत पडण्यापेक्षां हा मीं समक्ष अर्ज केला आहे. अशक्तपणाबद्दल साहेब पेन्शन देणार असतील, तर हा रूळ साहेबांनीं वाटेल तर ओढून पहावा, म्हणजे खात्री होईल." असें म्हणून रामराम करून विठूकाका निघून गेले.

दुसरे दिवशीं पेन्शनरच्या यादींतून विठ्ठल बाबाजी रानडे यांचें नांव कमी करून त्यांना कामावर राहूं द्यावें, असें साहेबांनीं त्या कचेरींतील वरिष्ठाच्या नांवें पत्र पाठविलें. " सगळ्यांना पेन्शनांत काढण्याचा हुकूम झाला असतां तुम्हांलाच ठेवण्याचा हुकूम कसा झाला ?" म्हणून मामंजींनीं विठूकाकांना विचारिलें. तेव्हां त्यांनीं आदले दिवशींची सकाळची सर्व हकीकत सांगितली.

हे विठूकाका म्हणजे स्वतःचें वय तीन वर्षांचें असतांना जेव्हां माझ्या सासूबाई निफाडाहून आंबेगांवीं बैलगाडींतून येत होत्या, तेव्हां वाटेंत गाडींतून स्वतः खालीं पडल्यावर आईची गाडी पुष्कळ लांब गेली होती; मग मागून घोड्यावर बसून येणाऱ्या विठूकाकांना हांक मारून 'मी पडलों,' म्हणून सांगितलें, व ज्यांनीं घोड्यावर उचलून घेतलें, ते हे विठूकाका इतकें सांगितलें म्हणजे यांची ओळख पटेल.

### भाग एकविसावा.

## सन १८९९ महाबळेश्वरची स्वारी.



### सनस्ट्रोक.

सन १८९९ सालीं, आम्ही महाबळेश्वरीं जाण्याच्या आधीं, एप्रिलांत युनिव्हर्सिटीच्या दोनतीन बैठकी होऊन त्यांमध्यें युनिव्हर्सिटीच्या वरच्या

परीक्षेंत मराठी वाङ्मयाचा प्रवेश व्हावा, हा प्रश्न काढिला होता व त्याची बरीच चर्चा झाली होती, तेव्हां वेळांत वेळ करून याचसंबंधानें होईल तितकें लिहावयाचें व हा प्रश्न बहुमतानें पास करून घ्यावयाचा, अशा उद्देशानें लिहिणें चाललें होतें हें स्वतःचें काम, व दुसरें शुगर बाउंटीच्या प्रश्नासंबंधानें लिहिण्याविषयीं स्वतःला लिहून आलें होतें, तेव्हां महाबळेश्वरीं जातेवेळीं कांहीं पुस्तकें बरोबर घेण्याकरितां एशियाटिक सोसायटीकडून यादी मागवून व तिच्यावर खुणा करून तीं आणून व पार्सल करून महाबळेश्वरीं लवकर पोहोंचतील अशीं पाठवा म्हणून कारकुनाला सांगितलें आणि आम्ही महाबळेश्वरीं निघून गेलों.

वर्षभर काम करून थकलेल्या मनाला विश्रांति देण्यास, मित्रमंडळीच्या सहवासाचा लाभ घेण्यास, आणि शरीराला व मनाला सामर्थ्य व पुष्टि देणारें हवापाणी, ताजीं फळें, भाज्या वगैरेंचा उपभोग घेण्यास महाबळेश्वरीं जावयाचें, व त्या सर्वांहूनही स्वतःच्या विशेष आवडीचें सृष्टिसौंदर्य पहाण्यास सकाळ संध्याकाळचा शांत वेळ घालवावयाचा, असा निघतेवेळचा मूळ उद्देश होता. मराठी वाङ्मय व शुगर बाउंटी हीं दोन कामें बरोबर हाताच. त्याप्रमाणें सकाळीं व संध्याकाळीं दोन अडीच तास नेमानें फिरावयास जाण्याचा नित्य क्रम सुरू असे. एक हयगय व अनियमितपणा काय तो जेवणांत व विश्रांति घेण्याच्या कामांत असावयाचा. ह्या ठिकाणा कोणाचें कांहीं चालावयाचें नाहीं. एकादे दिवशीं जेवण्याला उठण्यास अधिक उशीर लागला म्हणजे मी जवळ जाऊन म्हणें " किती तरी उशीर झाला आहे! बाहेरून फिरून येण्यास आधींच दहा वाजतात. मग त्याच्यापुढें आणखी कामाला कसें बसावयाचें? उशीर झाला म्हणजे जेवण जात नाहीं, पाणी पाणी होतें, शिवाय मुलेंही भूकभूक म्हणून पुरेसें करितात. "

हें मीं म्हणण्याची व काम संपण्याची एकदम वेळ आली तर उठतां उठतां म्हणावयाचें "चला बुवा उठलों! रिकामें बसून आयतें जेवावयाचें आणि तेंही वेळेवर नाहीं? उशीर झाला म्हणजे बायकांची जात नाजूक, त्यांना पित्त होतें, हें आमच्या लक्षांतच येत नाहीं? "

काम संपलें नसेल, व उठण्याला उशीर असला, तर म्हणावयाचें "हें पहा, आम्ही आपलीं नादी माणसें ! एकदां कशाचा तरी नाद लागला म्हणजे लागला. तुम्ही आमच्या नादीं कशाला लागतां! जेवून घ्या झालें. नेहमीं आम्ही नाहीं कां आधीं जेवीत ? एखादे दिवशीं तुम्ही जेवलांत म्हणून काय झालें ? इतकी स्वतंत्रता नसेल तर राणीचें राज्य तें कसलें ! "

हें बोलणें हंसत हंसत व थट्टेनें चाले, तरी तें ऐकल्यावर पुढें बोलण्याची प्राज्ञा कोणाची व्हावयाची आहे ? मुलेंसुद्धां जागच्याजागीं गप्प बसावयाचीं.

असाच बहुतेक क्रम पहिले दोन आठवडे चालू होता. पुढें एका सकाळीं ऊन्ह फार कडक पडलें होतें व बाहेरून फिरून येण्यास अकरा वाजून गेले, म्हणून मी काळजी करीत बसलें होतें; आणि ओळखीच्या दोनतीन ठिकाणीं शोधास माणसें पाठविलीं. ह्या वेळीं महाबळेश्वरीं साठे, काथवटे, जठार आदिकरून पुण्याची व इतर ठिकाणची मित्रमंडळी बरीच होती. ही सर्व मंडळी दररोज सकाळीं पहिल्यांदा आमच्या घरीं येऊन व स्वतःला घेऊन फिरावयास जात. बोलतांचालतां वाटेंत किती वेळ गेला, हें लक्षांत न येऊन घरीं लवकर येण्याचा बेत केला असला तरी साडेदहा सहज होत. आज रोजच्या पेक्षांही फार उशीर झाल्यामुळें मला काळजी वाटली. शोधास पाठविलेल्या माणसांपैकीं एकानें येऊन मला सांगितलें, कीं, " मंडळी आतांच फिरून येऊन काथवट्यांच्या बंगल्यांत बोलत बसली आहे." हें ऐकून मी स्वस्थ राहिलें.

पुढें सुमारें अर्ध्या तासानें घरीं येणें झालें. छत्री मिटलेली हातांत तशीच, कपाळावर व तोंडावर घाम आलेला, उन्हानें तोंड नेहमींच लाल होत असे; पण आज त्या लालीवर बराच काळसरपणा आलेला होता.

घरीं येण्याबरोबर रोजच्यारखे कपडे उतरण्यासाठीं मी पुढें गेलें. वरचे कपडे काढिल्यावर आंतील बंडी अगदीं पिळून टाकण्याजोगी भिजलेली असून वरची फलाणीची बंडीही भिजून चिंब झाली होती. ओल्या

अंगावर वारा लागेल म्हणून मीं भराभर खिडक्या बंद करून घेतल्या व सगळे कपडे उतरून खरखरीत व स्वच्छ टावेलानें सर्वांग पुसून कोरडें केलें व दुसरा सदरा अंगांत घातला. हे हातानें करीत असतांना आज काय बरें होत आहे? जास्त थकवा कां दिसतो? असें माझ्या मनांत येऊन मीं दोनतीन वेळां जवळ विचारलें "आज इतका घाम कां आला? फार लांब जाणें झालें होतें का? का फार ऊन लागलें म्हणून इतका थकवा आला आहे? नेहमींप्रमाणें छत्रीही उघडली नसेल ना?"

हें ऐकून नुसतें माझ्या तोंडाकडे पाहिलें. उत्तर दिलें नाहीं. कारण, काय उत्तर द्यावें हें सुचत नसल्यासारखें व मन गोंधळल्यासारखी मला वृत्ति दिसली. डोळे उघडे होते. माझ्याकडे व इकडेतिकडे पहाणें चाललें होतें, पण आंतला पाहणारा आपल्या जागेवर नाहीं, तो आपलें काम करीत नाहीं असें केवळ शून्य दृष्टीनें पाहणें चाललें होतें.

कधींच नाहीं मग आज असें कां! हा प्रश्न माझ्या मनापुढें उभा राहून एकदम पोटांत धस्स झालें. तरी मी बाहेर कांहीं न दाखवितां बजाबाला हांक मारून "दूध कढत करून लवकर आण,' असें सांगून तेथेंच कोचावर स्वतःचे पाय हळूहळू दाबीत बसलें. हा वेळेपर्यंत घरीं येऊन सुमारें दहा मिनिटें झालीं होतीं, तरी वृत्ति जागेवर आली नव्हती. पण नेहमींच्या संवयीनेंच काय कोण जाणें, "टपाल आणारे," म्हणून रोजच्यासारखी मुलांना हांक मारली.

मुलांनीं टपाल आणिलें व ब्राह्मणानें दूध आणिलें तें मीं निववून पिण्यास दिलें. भावोजींनीं टपालापैकीं एक पत्र फोडून वाचून दाखविलें. हें पत्र पुण्याहून वन्सकडून आलें होतें. त्यांत पुण्याच्या घरांत असलेल्या विद्यार्थ्यांपैकीं रामा नातू म्हणून दूरचा आप्त होता, तो प्लेगनें लागून वारल्याची हकीकत होती. पत्र वाचावयास भावोजींनीं आरंभ केला. त्यांत रामा नातूचें नांव व दुखण्याची हकीकत माझ्या लक्षांत येतांच मीं भावोजींना पत्र पुरतें वाचूं नका, अशा दोनतीन खुणा केल्या; पण तें मोठ्यानें वाचण्याच्या भरांत असल्यामुळें

त्यांचें लक्ष तिकडे गेलें नाहीं, त्यांनीं पत्र तर सबंध वाचलेंच; पण ही सुदैवाची गोष्ट म्हणावयाची, कीं, पत्रांतील मजकूर स्वतःच्या कांहींएक ध्यानांत आला नाहीं. कारण स्वतः जरा रागानें म्हटलें, “ आबा, अरे तूं काय वाचतोस ? नीट वाच, मला कांहीं समजलें नाहीं. ”

भावोजींनीं तेंच पत्र पुनः वाचण्यास घेतलें व अर्ध्यापर्यंत आलें, तों पुनः स्वतः म्हटलें “ आज तुला झालें आहे तरी काय ? असें काय वाचतोस ? तूं वाचलेला एक शब्ददेखील समजत नाहीं. ”

आज उन्हानें डोक्याला कांहींतरी विकार झालेला आहे असें यावेळीं मात्र माझ्या स्पष्ट ध्यानांत आलें व मीं भावोजींवर रागावल्यासारखें करून म्हटलें “असें काय हो वाचतां ? एक वाक्यसुद्धां मध्यें आडल्यावांचून वाचतां येत नाहीं ! अशानें आपली धांदल होते व ऐकणारालाही त्रास होतो. तिकडे जाऊन नीट पत्र लावून या व मग वाचून दाखवा. जा, उठा. ”

असें मीं मोठ्यानें म्हणून स्वतः नको होय म्हणण्यापूर्वीं लवकर उठून जा अशा अर्थाची हातानें खूण केली. ती पाहतांच ते उठून गेले व मीं दहापंधरा मिनिटें तरी कोचावर स्वस्थ पडून विश्रांति घ्यावी म्हणून स्वतःला आग्रह केला.

मी काय म्हणतें याचा अक्षरशः जरी अर्थ मनांत आला नसला, तरी शरीर फार थकल्यामुळें विश्रांति हवीच होती, म्हणून अधिक आढेवेढे न घेतां येथेंच कोचावर अंग टाकलें, तेव्हां एक स्वच्छ हलकें पांघरूण अंगावर घालून मी मानेपासून पायांपर्यंत हळु हळू सर्व अंग चेपीत बसलें. त्या चेपण्याच्या नादांत पंधरावीस मिनिटें चांगली झोंप लागली. अंग कांहीं तापलें नव्हतें. झोंप लागल्यावर सर्वांगाला घाम आला होता, डोकें मात्र खूप तापलें होतें व तोंडावरील लाली कमी झाली नव्हती. घाम आला होता, तो मीं हळुहळू पुसून काढला, तरी झोंपमोड झाली नाहीं. आणखी दहाबारा मिनिटें झोंप होऊन आळस व जांभया देऊन डोळे उघडले. त्यावरून अंग दुखत असावें पण आतां पहिल्यापेक्षां दृष्टि मात्र चांगली झाली

आहे असें मला वाटलें. "आतां जेवावयास उठावयाचें आहेना, साडेबारा झाले," असें मीं म्हणतांच चटकन् उठून स्नानाच्या खोलींत येणें झालें.

मीं पुन: म्हटलें " आज स्नान नाहीं केलें तर बरें होईल. आजचा दिवस हातपाय धुऊन वस्त्रांतर केलें तर नाहीं का चालावयाचें ? मी हवें तर ओल्यानें अंग पुसून काढतें. "

यावर सांगितलें " छे, छे, आज ऊन लागून घाम फार आला आहे, तेव्हां आज तर स्नान केलेंच पाहिजे. "

मी अधिक कांहीं बोललें नाहीं. आंघोळीचें पाणी तयारच होतें. थंडी होऊं नये म्हणून लवकर स्नान घालून आटपतें घेतलें.

स्नान झाल्यावर पानावर बसून पहिल्या वरणभाताचे तीन चार घास घेतले नाहींत, तोंच जोरानें अंगावर शहारे उठून थंडी वाजूं लागली; तेव्हां "मी आतां जेवीत नाहीं, मला थंडी वाजत आहे," असें म्हणून हात आंखडला. लागलींच ब्राह्मणानें तस्त पुढें करून आंचविण्यास पाणी घातलें व मीं इकडे येऊन गड्याकडून बिछाना तयार करविला व खिडक्या लावून घेतल्या. स्वत: अंथरुणावर येऊन निजल्यावर हवें होतें तितकें पांघरूण घालतांच झोंप आली. ताप म्हणण्यासारखें अंग विशेष तापलें नव्हतें; पण डोकें मात्र पहिल्यापेक्षां अधिकच तापलें व इतका वेळ वाटलेला संशय दृढ झाला. आज उन्हापासून डोक्याला कांहीं तरी विकार झाला आहे खस. ताप येणें, अंग दुखणें व डोकें तापणें हे सारे विकार त्याच्या अंगभूत आहेत.

महाबळेश्वरीं येण्याच्या पूर्वी मुंबईस कोर्टाच्या वेळेशिवाय आपल्या विश्रांतीचा बहुतेक वेळ हीं नवीन हातीं धरलेलीं दोन कामें करण्यांत घालविला, त्यामुळें अवश्य तितकी विश्रांति मिळाली नव्हती. तशांत येथें आल्यापासून आज पंधरा दिवस दररोज सकाळचें दोनतीन तास ऊन लागलें, असें माझ्या मनानें पक्कें घेतल्यावर डॉक्टर पाटणकर यांना बोलावणें पाठविलें व या वेळच्या दुखण्याबद्दल माझी कल्पना काय आहे ती सारी त्यांना सांगितली. डॉक्टरांना बिछान्याजवळ जाऊन स्वत:ची प्रकृति

पाहिली व बाहेर येऊन ते मला म्हणाले " तुमची कल्पना बरोबर आहे, असें मलाही वाटतें. ह्या आजारावर पुष्कळसें ब्रोमाईड दिलें पाहिजे व मुख्य विश्रांति मिळाली पाहिजे. "

मीं म्हटलें " याची मला काळजी पडली आहे. कांहीं झालं तरी खरा प्रकार काय आहे, हें मात्र स्वतःला बिलकूल कळूं द्यावयाचें नाहीं. " ' थंडीवाऱ्याचा व हिंवाचा ताप आहे; मी डायफेटिक् पाठवितों तें आपण तीन तीन तासांनीं द्यावें व जमेल तितकें पडून रहावें. एकदोन दिवस तरी उठण्याचे श्रम करूं नयेत,' असें जवळ सांगा व डायफेटिक्मध्यें ब्रोमाईड द्या. दोहींची चव जवळ जवळ सारखी असल्यानें तें त्यांत संपादेल; शिवाय, नुसतें ब्रोमाईड दिलें तर चौकशी होईल आणि आपल्या डोक्याला कांहीं विकार झाला कीं काय, अशी मनांत शंका आली तरी तिचा परिणाम मनावर होईल, व हीच गोष्ट होऊं द्यावयाची नाहीं, असें मीं डॉक्टरांना बजावून सांगितलें.

ते होय म्हणून जवळ गेले व म्हणाले " ताप कांहीं नाहीं,हिंवाचा आहे; डायफेटिक् पाठवितों तें घ्यावें म्हणजे बरें वाटेल; होईल तितकें एकदोन दिवस बिछान्यावरच पडून रहावें. घामावर वारा लागणें बरें नाहीं," असें सांगून डॉक्टर निघून गेले.

दररोज पंचेचाळीसापासून पन्नास ग्रेनपर्यंत ब्रोमाईड देण्यांत आल्यावर पांचसहा दिवस पडसें झालें व प्रकृतीलाही बरें वाटूं लागलें. दुखणें आल्यापासून पहिल्यासारखी चांगली स्मरणशक्ति येण्यास व पूर्ववत् प्रकृति होण्यास जवळजवळ पंधरा दिवस लागले. तोंपर्यंत नित्य संवयीप्रमाणें करावयाच्या ठरलेल्या सगळ्या गोष्टी एकापुढें एक व्हावयाच्याच. फक्त पत्रें लिहावयास मजकूर सांगतेवेळीं मात्र मनाचा विसंगतपणा अजून कायम आहे असें मला समजून येई. पत्र लिहावयाचें एकाच्या नांवानें व मजकूर भलत्याचाच असावयाचा. हें पाहून नेहमींच्या पत्रें लिहिणाऱ्या मुलांना जरा चमत्कारिक वाटे. असें होऊं लागल्यावर मीं त्या मुलांना एकीकडे बोलावून

आणून बजावून सांगितलें " तुम्हीं पत्र लिहिण्यास बसलां म्हणजे जसा मजकूर सांगणें होईल तसाच अक्षरशः लिहून काढीत जा. असें कां असें जवळ विचारूं नका, किंवा लिहितांना कचरूं नका किंवा लिहिलेलीं पत्रें माझ्याजवळ आणून द्या, म्हणजे तीं कोणाला व मजकूर काय लिहावयाचा तें मी सांगेन." कारण स्वतः पत्र लिहावयास सांगतांना मुलांनीं कांहीं उलट विचारिलें आणि आपली काय चूक होत आहे हें स्वतःच्या लक्षांत आलें तर एकदम मनाला धक्का बसून त्यावर परिणाम होईल; या भीतीनें सर्व बाजूंनीं मला फार जपावें लागे.

याप्रमाणें सातआठ दिवस गेल्यावर एके दिवशीं रात्रीं सुमारें साडेदहा वाजतां स्वतःला चांगली झोंप लागली होती. मला अलीकडे बहुतेक जागरणच असे. त्यांत त्या दिवशीं मी अधिक थकलें होतें म्हणून स्वतःच्या पायाला 'आज तूं तूप चोळ' असें गड्याला सांगून मी शेजारच्या मुलांच्या पलंगावर निजलें व लागलीच झोपीं गेलें. सुमारें अर्ध्या तासानें मोठ्यानें हंसण्याचा आवाज माझ्या कानावर पडून मी खडबडून जागी झालें. दुखण्याची धास्ती मनांत असेच; पण डोळ्यावर फार झोंप आल्यानें काय प्रकार आहे याचा उमज पडेना. इतक्यांत दुसऱ्यांदा तसेंच मोठ्यानें हंसणें झालें. हंसें कोणाचें तें ओळखून मी अतिशय घाबरलें व माझी अगदीं बोबडी वळली. तरी तशी स्वतःच्या पलंगाजवळ जाऊन " काय झालें ? काय होत आहे;" म्हणत घाबरलेल्या बोबड्या शब्दांनींच विचारलें.

तेव्हां स्वतः म्हटलें " अग, भिऊं नको, मी जागा आहें, पण दिवा आणून तुझा शहाणा गडी काय करीत आहे तें एकदां पहा."

गडी तूप लावीत होता हें मला माहीत होतें. म्हणून मीं म्हटलें " हें काय ? गडी काय करणार; तो तूप चोळीत आहे."

तेव्हां म्हटलें " आधीं तूं दिवा आणून बघ तर खरी ! मग तुला हंसण्याचें कारण कळेल."

मीं बाहेरून दिवा आणला आणि पाहतें तो गणू गडी स्वतःचा एक पाय आपल्या मांडीवर घेऊन तूप चोळीत आहे व डोकें पायाला टेंकेपर्यंत पेंगत आहे. पण दोन्ही पायांत मोजे तसेच होते व मोजावरूनच तूप चोळणें चाललें होतें. हें पाहून मलाही फार हंसूं आलें, व गड्याच्या या बावळेपणाबद्दल मीं त्याला हाक मारून जागें केलें.

दुसरे दिवशीं सकाळपासून पंधरा दिवस पूर्वी गेलेली स्वतःची स्मरणशक्ति आज परत आली, अशी माझी खात्री झाली. कारण दुसरे दिवशीं सकाळीं चहाला सर्व मंडळी एकत्र जमल्यावर रात्रीं घडलेला गणू गड्याचा शहाणपणाचा प्रकार स्वतः हंसून भावोजींजवळ सांगितला व त्या दिवसापासून दिवसेंदिवस प्रकृतीला अधिक बरें वाटत चाललें. तव्हां आणखी दोनतीन दिवसांनीं मुंबईहून एशियाटिक सोसायटींतून आणलेल्या बुकांची पेटी जी पार्सलनें दहाबारा दिवसांपूर्वी आली होती व केवळ या दुखण्याकरितांच मीं आजवर लपवून ठेविली होती, ती आतां काढून दिली. दुखण्यामध्यें पेटीचें स्मरण होऊन अझून पेटी कां आली नाहीं, म्हणून पांचसहा वेळ चवकशी केली. पण भावोजींना, शिपायांना व मुलांना पेटी आल्याचें जवळ सांगावयाचें नाहीं अशी मीं ताकीद दिलेली असल्यामुळें याबद्दल कोणी कांहीं बोललें नाहीं. याबद्दल भावोजींकडून मुंबईला स्वतः पुस्तकें लवकर पाठवा अशा मजकुराचीं एकदोन पत्रें लिहविलीं होतीं; पण तीं त्यांनीं माझ्याकडे दिलीं. याप्रमाणें सर्व बाजूंनीं बंदोबस्त राहिल्यानें थोडक्यावरच तें दुखणें निभावलें, व माझें भाग्य होतें म्हणून आणखी कांहीं दिवस मला सहवासाचा लाभ मिळाला.

या सालीं संसारिक बहुतेक सर्व गोष्टींबद्दल उदासीनता जास्त दिसूं लागली. जरी संवयीप्रमाणें एकापुढें एक कामें होत असत, तरी त्यांत स्वतःचें मन गढलेलें नसे इतकेंच नव्हे, तर असावें तितकें तिकडे लक्षही लागत नसे. हें वर वर पाहणारांच्या लक्षांत येण्याचा संभव नव्हता; पण विशेष बारीक रीतीनें पाहणारांच्या मनांत आल्यावांचून रहात नसे. ह्या

वर्षांत स्वतःच्या प्रकृतीचें मान जरा नरमच होतें. शिवाय, कांहीं पारमार्थिक चिंतनांत स्वतःचें मन निमग्न असावें असें दिसे. कारण, प्रकृतीच्या अस्वस्थेतमुळें व्यवहारांत लक्ष लागत नसे, पण जे आवडते विषय-राजकीय सामाजिक, औद्योगिक, त्यांच्याही वर्तमानपत्रांतून येणाऱ्या हकीकतींकडे आतांशा पहिल्यासारखें लक्ष नाहीं असें दिसूं लागलें. पुस्तक किंवा वर्तमानपत्र वाचावयास म्हणून हातांत घेतलेलें कित्येक वेळ हातांतल्या हातांत राहून मन दुसऱ्या कांहीं विचारांत निमग्न आहे, असें दिसे. जेवावयाला बसल्यावर नेहमीं विनोदानें पुष्कळ गोष्टी बोलावयाच्या, चेष्टा करावयाच्या, मुद्दाम मीं केलेले पदार्थ असतील त्यांना बळेंच नांवें ठेवून हंसावयाचें आणि मला म्हणावयाचें "अं:, सकाळपासून वेळ घालवूनही असलेच का पदार्थ केले ? आम्ही पुरुष देखील असले पदार्थ केव्हांच करून टाकूं !"

कोणत्याही गोड पदार्थांपेक्षां हरभऱ्याच्या डाळीचे तिखटमिठाचे पदार्थ अतिशय आवडत असत; त्यांपैकीं चांगला झालेला पदार्थ असेल त्या दिवशीं मागला भात संपल्यावरसुद्धां पुनः तो पदार्थ थोडा मागून खावयाचा असे. पण हा प्रकार अलीकडे कमी झाला होता. सगळ्या गोष्टी मनानें स्वतः नियमबद्ध केलेल्या असाव्यात, असें माझ्या लक्षांत येऊं लागलें. ह्यासंबंधीं केव्हां कांहीं विचारल्यास ऐकल्या न ऐकल्यावारीच न्यावयाचें; होतां होईल तों त्याबद्दल उत्तर द्यावयाचें नाहीं. जेवण, मुखशुद्धि, चहा, फराळ वगैरे सवच आहार किती घ्यावयाचा, याबद्दल कांहीं तरी मनामध्यें ठरविलेलें असावें. त्यामुळें आवडतें फळसुद्धां जास्त खाल्लें जात नसे.

एके दिवशीं पुष्कळ दिवसांत न मिळालेलीं अशीं काळीं द्राक्षें उत्तम मिळालेलीं होतीं. स्वतःला द्राक्षें फार आवडत असत म्हणून मीं दहाबारा द्राक्षें बशींत घालून मुखशुद्धीकरतां ठेविलीं; पण जेवण झाल्यावर यांपैकीं पांचसहा द्राक्षें खाऊन बाकीचीं तशींच वगळून ठेविलीं. हें पाहून मीं म्हटलें " द्राक्षें आज फार चांगलीं मिळालीं आहेत व तीं आज किती दिवसांनी तरी मिळालीं आहेत. मग त्यांतील वगळावयाचीं काय म्हणून? तेवढीं तरी खावींत."

तेव्हां म्हटलें " तुझा स्वभाव चमत्कारिक आहे. पुष्कळ खावें, पुष्कळ प्यावें, असें तुला वाटतें; पण असें पुष्कळ खाल्याप्याल्यानें जिभेची कधीं तरी तृप्ति व्हावयाची आहे काय ? तृप्ति करण्याच्या नादीं लागलों तर तिची तृप्ति एकीकडे राहून लालसा मात्र अधिक वाढेल. ही मी माझीच गोष्ट सांगत नाहीं. पण प्रत्येक माणसानें यासंबंधीं थोडेबहुत नियम ठेवावेत, हें चांगलें" असें सहज म्हटलें.

त्यावरून आजपर्यंत जो संशय मला वाटत होता, त्याची आतां खात्री झाली, कीं, स्वतःच्या सर्व गोष्टी नियमानें बांधिल्या आहेत. त्या समजून घेण्याकडे आतां माझें मन जास्त लागलें व खरें काय तें लवकरच कळून आलें. दररोजचा चहा प्यावयाचा असे त्याचेही घोट मोजलेले असत.त्यापेक्षां अधिक घ्यावयाचे नाहींत. दररोजचा चहा जवळ नेला म्हणजे निववून बशींत घालून हातांत द्यावा लागे. मन कामांत गढलेलें असेल अशा वेळीं बशी हातांत दिली तरी मोजके घोट घ्यावयाचे,जास्त घ्यावयाचे नाहींत. बोलण्याच्या नादांत किंवा कामांत मन गुंतलें तरी, बशींत ओतलेल्या चहाचा एक घोट जास्त असला तरी तो वगळून ठेवावयाचाच. तसेंच केव्हांही एखादा आवडणारा पदार्थ मुद्दाम केला व तो चांगला साधला असला म्हणजे त्याचे दोन घास तरी पोटांत अधिक जावेत म्हणून मी तो आग्रहानें वाढीं. तेव्हां मुकाट्यानें त्यांतील थोडासा पुढें घेऊन बाकीचा एकीकडे सारून ठेवावयाचा. हें पाहून मी विचारीं "पदार्थ बरा झाला नाहीं का ?"

एकदां दोनदां जरी विचारलें तरी आपण कांहीं तरी दुसऱ्या नादांत आहोंत असें दाखवून उत्तर द्यावयाचेंच नाहीं; पण मीं पुनः पुनः विचारलें तर हंसून म्हणावयाचें "पदार्थ कोणीं केला आहे सांग. तूं केला असलास तर उत्तम झाला आहे असें म्हणतों."

" मीं केला म्हणून तो चांगला म्हणावयाला नको. पानांत वाढलेला पदार्थसुद्धां थोडासा पुढें घेऊन बाकीचा एकीकडे सारून दिला आहे. ह्यावरून पदार्थ चांगला झाला नाहीं हें दिसतच आहे," असें मी म्हणें.

ह्यावर म्हणावयाचें "खरोखर पदार्थ चांगला झाला आहे, पण पदार्थ चांगला झाला आहे म्हणून तोच खावयाचा कीं काय ? खाण्याची कांहीं मर्यादा पाहिजे."

रोजच्या मुखशुद्धीकरितां ऋतुमानाप्रमाणें उत्तम मिळणारीं फळें आणावीं लागत. मला कधीं आठवत नाहीं, कीं, आज अमुक एक फळ चांगलें म्हणून आणखी मागून घेऊन खाल्लें आहे. रोज खावयाचें तितकेंच खावयाचें. जास्त असेल तर तें वगळून ठेवायाचें. एखादे दिवशीं घाईमुळें चाखून न पाहातां मुखशुद्धीचें मीं तसेंच ठेविलें व वाईट लागलें तर बशी मुकाट्यानें सारून ठेवावयाची, कांहीं बोलावयाचें नाहीं, व पुन्हां त्या वेळीं दुसरें चांगलें फळ खाण्याविषयीं आग्रह केला तरी त्या दिवशीं तें खावयाचें नाहीं.

एक वेळ पुण्याहून नारायणभाई दांडेकर यांनीं आपल्या बागेंतील हापूस व पायरीचे आंबे पाठविले व पत्र लिहिलें, कीं, " माझ्या हातानें लाविलेल्या झाडाचे हे आंबे आहेत. यांपैकीं चारदोन तरी आपण खावे, म्हणजे मला बरें वाटेल."

या आंब्यांपैकीं एक आंबा मीं घेऊन त्याच्या सर्व फांकी बशींत घालून दिल्या. जेवण झाल्यावर बशी हातांत घेऊन या फोडींपैकीं एक फोड खाल्ली आणि " आंबा चवीला फार चांगला आहे," असें म्हणून त्याची फार वाखाणणी करून म्हटलें "तुम्ही सगळीं जणें खा व गडी माणसांनाही द्या बरें!" असें म्हणून बशींतून नियमाप्रमाणें आणखी एक फोड काढून घेऊन बशी पलीकडे सारून दिली.

हें पाहून मला नवल वाटलें आणि मी म्हणालें " जेवणांत पिठलें, फळांत आंबा, कोणाला आवडत नाहीं असें नसेल, असलें तर क्वचितच असेल नाहीं ?"

तेव्हां स्वतः म्हटलें " अग, आवडत नाहीं कोणाला ? चांगला पदार्थ असला म्हणजे कोणालाही आवडणारच ! मीसुद्धां आंब्याच्या फोडी खाल्ल्या नाहींत काय ?"

तेव्हां मीं म्हटलें "याचेंच मला नवल वाटतें, कीं, आंब्यासारखी वस्तु पचण्यास फार अवघड नाहीं. प्रकृतिही या वेळीं चांगली आहे; शिवाय, ते उत्तम असून मित्राकडून आलेले आहेत. इतक्या सगळया बाजू चांगल्या असून फक्त दोनच फोडी खाल्ल्याना ? या साऱ्या फोडी एकाच आंब्याच्या आहेत. आजचा दिवस तेवढ्या सगळया खाल्ल्या असत्या तरी चाललें असतें. मीं चाखून पाहिला, तेव्हांच माझ्या मनांत आलें कीं, आजचा आंबा फार आवडेल व कदाचित् आणखीही मागणें होईल."

तेव्हां म्हटलें "फळ खरोखरीच चांगलें आहे, म्हणून मीं मुद्दामच राखून ठेविलें आहे. तूं खा आणि मुलांना दे. आणखी एकदोन फोडी सहज खाल्ल्या असत्या; पण आज मीं माझ्या जिभेची परीक्षा पाहिली, याबद्दल एक आठवलेली गोष्ट सांगतों. लहानपणीं आम्ही मुंबईस शिकत होतों. आमच्या शेजारच्या खोलींत मायदेव नांवाचा एक मित्र व त्याची आई अशीं दोघें असत. त्यांचें घराणें पूर्वीं फार संपन्न होतें. खाऊंप्यालेलीं तीं माणसें होतीं; पण त्यांचा तो काल आतां राहिलेला नव्हता. मायदेवाचा बाप वारल्यावर त्यांचें इनाम होतें तें खालसा झाल्यानें त्याची अतिशय ओढ झाली होती व या वेळीं तर या मायलेकरांना पंचवीसतीस रुपयांच्या स्कॉलरशिपवरच निर्वाह करावा लागत होता. ही बाई पहिली श्रीमंती भोगलेली होती. तिला हे दिवस फारच कठिण वाटत. ती एखादे वेळेस मुलानें भाजी आणली नसली तर मोठ्यानें आमच्या देखत म्हणे कीं, 'ही जीभ मोठी सोकावलेली आहे. मी तिला पुष्कळ सांगतें, कीं, सातआठ भाज्या, सातआठ कोशिंबिरी, दोनतीन पक्वान्नें वाढलेलें ताट व त्याच्याच शेजारीं शिकरण, तूप, खीर, मठ्ठा वगैरेंनीं भरलेल्या वाट्यांचे दिवस आतां गेले ! त्यांची आठवण काढून आतां काय उपयोग ? पण नाहीं, चार सहा पदार्थ केल्यावांचून तिचें चालतच नाहीं, व याला तर भाजीसुद्धां आणण्याचा कंटाळा ! याचें आपलें चालतें भाजीशिवाय, पण माझें चालत नाहीं,' इत्यादि बोलावयाची. यावरून पहा, कीं, जिभेला सवड दिल्यानें

एकदां का तिची चटक वाढली म्हणजे दिवस अनुकूल नसले तरी ती अगदीं आंवरत नाहीं. याकरितां मनुष्यानें नेहमीं चालतील त्याच संवयी ठेवाव्यात. म्हणजे कोणतीही स्थिति जड जात नाहीं. नाहीं तरी प्रत्येक मनुष्यानें जसजसें वय होईल व समजूं लागेल तसतसें आपल्यामधील पशु-वृत्ति कमी करण्याकडे व दैवी गुण वाढविण्याकडे आपल्या मनाचा ओढा ठेवावा. चांगली गोष्ट साध्य करण्यास फार कष्ट लागतात म्हणून तिच्या साह्यास आपल्याला थोड्याबहुत तरी यमनियमांचें अवलंबन करावें लागतें."

मीं म्हटलें "एवढासा नियम धरला तरी याचा केवढा बोभाटा होतो."

तेव्हां म्हटलें "तुम्ही बायका मुलीं लोकांना कळण्याकरितां व भूषणा-करितांच चातुर्मासांत हे नियम करतां. अशा गोष्टी करावयाला अमुकच दिवस कशाला पाहिजे? मनांत येईल तेव्हां न बोलतां त्या कितपत साध-तात तें पहावें. ह्या गोष्टींचा बभ्रा न करतां मुकाट्यानें करतां येतात. रोज थोडथोड्या तरी या गोष्टी करावयाच्याच, असा आपण मनानें निश्चय केला म्हणजे त्या उशीरां तरी साध्य होतीलच. दैवी गुण वाढविण्याला व मनाला उन्नत करणाऱ्या गोष्टी ज्याच्या त्याला अधिक कल्याणप्रद होतील.दुसऱ्या-च्या असल्या गोष्टी कदाचित् लक्षांत आल्या तरी त्यांचा इतका बोभाटा व वाच्यता कां करावी? फार झालें तर एकीकडे विचारावें. असल्या गोष्टी सगळयांच्या देखत व सदोदित बोलण्याच्या नसतात. दिवसभर काम करून निजतेवेळीं आज आपल्या हातून चांगलीं कामें किती झालीं यांचा ताळा आपल्या मनाशीं पहावा. चांगलीं कामें वाढविण्याकडे मनाची प्रवृत्ति ठेवावी व वाईट तितकीं कामें न करण्याचा आपल्या मनाशीं निश्चय करून त्या-बद्दल देवाचें साहाय्य मागावें. प्रथम प्रथम या गोष्टी जड जातात, मन इकडे खुषीनें वळत नाहीं; पण निश्चयानें ही संवय लावून घेतली म्हणजे पुढें पुढें या गोष्टी मनाला आवडूं लागतात. आपण ईश्वराचे अंश आहों असें जर म्हणवितों, तर त्याचे गुण दिवसेंदिवस आपल्यामध्यें यावयास नकोत काय? जे अधिकारी भाग्यवान् पुरुष आहेत, ते कडकडीत यमनियम व योगसाधन

करतात, पण आमचें तितकें भाग्य नाहीं. हजारों व्यवसायांत गढून गेलेलीं आम्ही माणसें, त्यांत कानानें व डोळ्यानें अधु, तेव्हां त्यांच्याइतकें आम्हांला जरी साधणार नाहीं, तरी आपल्या अल्प सामर्थ्यांप्रमाणें बारीकसारीक कांहीं तरी गोष्टी करीत असावें, झालें. यांत विचारावयाचें काय ?"

मीं म्हटलें "या सगळया गोष्टी ऐकून मला किती तरी बरें वाटलें; पण नेहमींसारखेंच नादीं लावून मीं विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें अजीबाद टाळलेंच ! बरें, चहाचे घोट मला जसे समजले तसें जेवणाचेंही समजेल. जरा जास्त लक्ष ठेवलें म्हणजे झालें. तें तर आपल्या हातीं आहेना?"

तेव्हां स्वतः म्हटलें "पण मी तुला आधीं एक विचारतों तें सांग. तुम्ही लहानमोठ्या सर्व बायका घरांत सदोदित रिकाम्या असतां, किंवा काय खातां, काय पितां, किती वेळ झोंप घेतां, कोणी आलें तर त्यांच्याशीं कसें व काय बोलतां वगैरेबद्दल आम्हीं कधीं कांहीं चवकशी केली आहे काय ? मग आम्हां पुरुषांची चवकशी तुम्हांला कां असावी ? आम्ही काय खातों, चहा किती पितों, मंडळींशीं काय बोलतों, कसें बोलतों, रात्रीं बिछान्यावर विचार करीत आहों कीं झोंप लागली आहे, याची उठाठेव तुम्हांला कां ? पुरुष काय हवें तें करोत, तिकडे म्हणून लक्ष द्यावयाचें नाहीं, अशी पहिल्या बायकांची चाल असे; पण तुझें पहावें तो उलट. माझ्या प्रत्येक हालचालीवर तूं एक गुप्त पोलीसच होऊन बसली आहेस म्हणावयाचें !"

याप्रमाणें बोलणें झाल्यावर आम्ही आपापल्या कामाला लागलों. पण दुसरे दिवसापासून स्वतःच्या जेवणाचे घास मुकाट्यानें मोजण्याचा मला नाद लागला. कित्येक दिवस गेल्यावर नियमानें बहुतेक बत्तीस घास जेवण होत आहे, अधिक होत नाहीं, असें मला समजून आलें. या सर्व गोष्टी सहजीं वरवर पाहणाराच्या लक्षांत कधींच यावयाच्या नाहींत. मुद्दाम लक्ष लावून पाहणारालाच मात्र त्या कळावयाच्या अशा असत.

सन १९०० च्या मे महिन्यांत आम्ही महाबळेश्वरीं न जातां लोणावळ्यास च राहिलों होतों. तेथें सकाळीं संध्याकाळीं बाहेरून फिरून येण्यास

उशीर होई व अंगाला पुष्कळ घाम आलेला असे. तशांतच घरीं आल्या-बरोबर आंत येऊन कपडे बदलून पुनः लागलीच बाहेर व्हरांड्यांत स्वतः वाचीत किंवा ऐकत जेवणाची वेळ होईपर्यंत बसणें होई. जून महिन्याच्या आरंभीं एकदोन वळवाचे पाऊस पडल्यावरही, स्वतः नित्यक्रमाप्रमाणें दोन वेळ फिरून येतांच बाहेर पुनः व्हरांड्यांत बसणें होई. आधींच हवेंत थोडासा एकदम गारठा आला होता व घाम आलेल्या आंगावर उघड्या व्हरांड्यांतील गारठा लागल्यामुळें किडनीचा आजार झाला.

लागलीच आम्ही मुंबईस गेलों. औषधोपचार व शेक केल्यावर आजाराचा जोर कमी झाला; पण ह्या वेळीं त्यांत एक भर पडल्यानें आजार उलटला व बरेच दिवस त्याचा त्रास भोगावा लागला. जूनअखेर एका आदितवारीं सकाळचा सगळा वेळ कांहीं कोर्टाचें काम व त्याचसंबंधानें कायद्याचीं बुकें पाहून त्यावर खुणा करण्यांत गेला. दुपारीं जेवण झाल्यावर मुद्दाम हांक मारून सांगितलें " आज मला कांहीं विशेष काम आहे, कोणी भेटावयास आलें तरी मी आज कामांत आहें असें सांगण्यास चोपदारास सांग आणि तूं मुलांना आज इकडे येऊं देऊं नकोस." असें म्हणून कामाला आरंभ केला.

मीं चोपदाराला निरोप सांगून म्हटलें " तुमच्यापैकीं एकजण कदाचित् कांहीं काम लागेल म्हणून जवळ असा, व मी पलीकडील खोलींत मुलांना घेऊन जातें. हांक मारली तर मला ऐकूं येणार नाहीं म्हणून सांगतें." असें म्हणून मी दुसऱ्या दालनांत मुलांना घेऊन गेलें. पुढें सुमारें तीन साडेतीन वाजतां फळाच्या फोडी व द्राक्षें घातलेली बशी मीं हळूच जवळ ठेविली व " चहा आणूं का ? " असें विचारलें.

या वेळीं लिहिणें अगदीं एकाग्रतेनें चाललें होतें, म्हणून वर न पहातां म्हटलें " आतां माझ्याशीं एकही शब्द बोलूं नको, मी कामांत आहें. माझें काम झाल्यावर मी तुला मुद्दाम हांक मारीन. " तेव्हां मी मुकाट्यानें निघून गेलें.

पुढें सुमारें तास पाऊण तासानें मला हांक मारून सांगितलें "आतां तुझें फराळ, चहा, पाणी काय असेल तें घेऊन ये," असें म्हणून तोंड व हातपाय धुवून येऊन स्वत: बाहेर जाण्याकरितां कपडे घालण्यास सुरुवात केली.

मी चहा व दुसरे कांहीं पदार्थ वर घेऊन आलें होतें इतक्यांत प्रार्थना-समजांतून शिवराम शिपाई येऊन म्हणाला "आज उपासना आपल्याला करावयाची आहे असें सेक्रेटरी यांनीं सांगितलें आहे."

हें ऐकून मला थोडा राग आला व मीं म्हटलें "सांगितलें आहे, असें म्हणण्यापेक्षां हुकूम केला आहे असें म्हटलेंस तर अधिक शोभेल! काय, त्यांना चिठ्ठीसुद्धां लिहवली नाहीं? तुझ्या हातीं निरोप आणि तो पांच वाजतां!!"

शिवराम बिचारा काय बोलणार, तो गप्प राहिला. पण स्वत: म्हटलें "त्याच्याकडे काय आहे. त्याचें निरोप्याचें काम. त्या बिचाऱ्याला काय बोलावें, शिवराम तूं जा, मी येतों आहें म्हणून सांग."

असें म्हणून माझ्याजवळ प्रार्थनासंगीत मागितलें. तेव्हां पुस्तक पुढें करून मीं थोडें रागानें म्हणालें "मला माहीतच होतें, कीं, सगळी धांदल काय ती खाण्यापिण्याच्या वेळीं यावयाची. इतका वेळ कोर्टाचें काम झालें; आतां समाजाचें धर्माचें काम आलें. एकीकडे कपडे घालणें चाल-लेंच आहे, माझ्या हातांतले जिन्नस व चहा गार होत आहे, पण तिकडे पहाण्यास देखील वेळ होत नाहीं!"

इतकें ऐकून पोषाख करणें थांबविलें, व माझ्या हातांतील फराळाचें घेऊन थोडेंसें खाल्लें व चहा घेतला. तेव्हां मीं विचारलें "आज पांचसहा तास एकसारखें बसण्याजोगें मोठें काम काय होतें?"

तेव्हां म्हटलें "आतां तूं माझ्याबरोबर प्रार्थनासमाजांत येतेस ना मग गाडींतच सांगेन."

मी होय म्हणून आंत गेलें व मुलांना कपडे करून शिपायाबरोबर फिरा-वयास पाठवून गाडींत येऊन बसलें. थोडा वेळ स्वत:चें प्रार्थनासंगीत पहाणें

झाल्यावर माझ्याकडे पाहून म्हटलें "मघाशीं तूं आमच्या कामाबद्दल विचारलें होतेंस. आजचा खटला फार महत्त्वाचा आहे. आम्हां जज्जां-मध्यें पांचसहा दिवस खल झाला, तरी आम्हां सर्वांचें एकमत होईना. तथापि उद्यां त्याचा निकाल सांगावयाचा आहे व तो मींच लिहावा अशी माझे जोडीदार जज्जांची चिठ्ठी काल संध्याकाळीं आली होती. त्यामुळें आज सकाळीं व संध्याकाळीं जरा जास्त बसावें लागलें. खटला खुनाचा आहे व त्यांत धारवाडाकडील सहा ब्राह्मण आहेत."

इतकें बोलणें होत आहे तोंच आमची गाडी प्रार्थनासमाजाचे जवळ येऊन उभी राहिली व आम्ही उतरून समाजांत गेलों. सकाळपासून काम करून थकवा आला होता तरीही त्या दिवशींची प्रार्थना व उपा-सना नेहमींसारखी अतिशय प्रेमळ व भक्तिपूर्ण झाली.

तेथून परत येतेवेळीं गाडींतच पोट तिडल्यासारखें होऊन थोडें दुखूं लागलें व कदाचित् ताप येईल, असें दिसूं लागलें. रात्रीचें जेवण झाल्या-वर नित्यासारखें कांहीं वाचून घेतलें नाहीं. "मला थंडी वाजत आहे व अंग दुखत आहे, जरा चेप म्हणजे बरें वाटेल," असें मला म्हटल्यावर मी अंग चेपीत बसलें. सरासरी एक तासानें अंगांत बराच ताप भरला व दर पांच चार मिनिटांनीं वारंवार उठावें लागत असल्यामुळें गव्हाचें पोटीस व कढत पाण्यानें भरलेल्या रबरबॅगचा शेक, पोटाकडील व पाठीकडील 'किडनी'च्या भागावर सारखा ठेविला होता; पण वर सांगि-तल्याप्रमाणें वारंवार उठावें लागत असल्यामुळें झोंप मात्र अगदीं आली नाहीं.

दुसरे दिवशीं मीं विचारलें "अलीकडे दहाबारा दिवस चांगलें वाटूं लागलें होतें, मग आज हें असें कशानें झालें? पोटावर व पाठीवर एक-सारखा वारा लागला कीं काय!"

तेव्हां म्हटलें "वारा नाहीं लागला. पण थोडासा आळस केला ती चूक केली असें वाटतें. दुपारीं जजमेंट लिहीत बसलों होतों तेव्हां मनांत जुळलेल्या विचारामध्यें व्यत्यय येऊं नये, एकदां सर्व लिहून काढावें, असें

बाटून लिहिणें संपेपर्यंत मध्यें उठून बाहेर जाऊन येण्याचा आळस केला. पण हें सर्व लिहिणें आटोपण्यास चार तास लागले, हें त्या वेळीं मला समजलें नाहीं, त्यामुळें असें झालें."

मीं म्हटलें "अलीकडे हाच थोडासा विकार झाला आहे. त्यांत त्याची हयगय झाली मग काय? जजमेंट लिहावयाचें झालें म्हणून काय झालें? अशा कामालाही मध्यें उठूं नये कीं काय? थोड्या हयगयीमुळें आतां किती बरें इजा सोसावी लागत आहे! काल सगळा दिवस दगदग झाली. संध्याकाळीं विश्रांति मिळावी तीही नाहीं. समाजाचें काम आपलें तयारच. बरें, रात्रीं झोंप चांगली लागली असती तर थकवा कमी होऊन सकाळला हुषारी वाटली असती; पण हेंही नाहीं. शिवाय, काल व आज पुन: कोर्ट आहेच. असें सत्त्व पाहिल्यासारखें केलें तर शरीर बिचारें काय करील? मन सदासर्वदा ताब्यांत आहे, तें हवें तसें वागतें; पण त्यामुळें शरीराचे मात्र सर्व बाजूंनीं हाल होतात, व तें थकून जातें."

माझें हें सर्व बोलणें शांतपणें ऐकून घेतलें. नेहमींची संवय अशी असे, कीं, बोलणारें मनुष्य जरा आवेशानें कीं रागानें बोलत असलें तर त्याचें तें सारें बोलणें थोडें हंसून शांतपणें ऐकून घ्यावयाचें आणि त्याचें बोलणें संपल्यावर असें उत्तर द्यावयाचें, कीं, त्यापासून विचारणाराला आपला दोष दिसून यावा व मनांतल्यामनांत लाजल्यासारखें व्हावें.

माझें वर लिहिल्याप्रमाणें बोलणें झाल्यावर बऱ्याच वेळानें म्हटलें "हें बघ, मी आधीं एक तुला विचारतों त्याचें उत्तर मला दे."

मीं म्हटलें "मला कांहीं विचारावयास नको व मी उत्तरही देत नाहीं. युक्तिवादानें दुसऱ्यास कुंठित करण्याची इकडे संवयच आहे."

ह्या माझ्या बोलण्याकडे लक्ष न देतां स्वत: म्हटलें "वेड्यासारखें आपलें तेंच काय घेऊन बसलीस? जरा ऐकून तरी घे. आपल्या थोड्याशा श्रमानें कदाचित् एखाद्याचा जीव वांचेल, असें जर असलें तर तूं सुद्धां याहून जास्त इजा सोसण्यास तयार झाली असतीस कींनाहीं!"

मीं म्हटलें " मीच नाहीं, आणखी कोणीही आनंदानें तयार होईल. "

तेव्हां स्वत: म्हटलें "असें जर मग आहे, तर मघाशीं विचार केल्यावांचून उगीच आपल्याशीं रागावलीस ! आजाराची काय कोणाला हौस आहे ? सदासर्वदा प्रत्येक गोष्ट मनुष्य विचार करून करीत आहे " असें माहीत असून मग उगीच त्रास करून कां बरें घ्यावा ? परवांच्या खटल्यांत माझ्या जोडीदाराच्या मतानें फांशी ठरली आहे. एक माझें काय तें मत वेगळें पडलें. म्हणून कालचें जजमेंट लिहिण्यास जरा अधिक वेळ द्यावा लागला व श्रम करावे लागले. मनांत जुळलेले विचार असतात ते कागदावर उतरून घेईपर्यंत मध्यें उठलें किंवा कोणाशीं बोलण्यानें व्यत्यय आला, तर ते विचार विस्खलित होतात व पुन: जुळण्यास त्रास पडतो; म्हणून मध्यें उठावें असें मला जरी एकदांदोनदां वाटलें, तरी उठण्याचा आळस केला. " असें म्हटल्यावर नित्यक्रमाला आरंभ झाला.

रात्रीं ताप आला होता तरी जेवण झाल्यावर कोर्टांत जाणें झालेंच. संध्याकाळीं घरीं आल्यावर सांगितलें "आज दोघांजणांचा जीव वांचला. त्यांना फांशी ठरली होती, त्या जागीं काळ्यापाण्याची शिक्षा झाली."

ह्या जून महिन्यापैकीं सुमारें तीन वार, चार दिवस बरें व चार दिवस प्रकृतीची कुरकूर, अशांत गेले. पुढें २० जुलईपर्यंत म्हणजे जवळ जवळ एक महिना स्वत:ची प्रकृति अगदीं चांगली होती. ह्या महिन्यांत जेवणखाण असावें तसें असून झोंप चांगली येत असे. त्याप्रमाणें कोर्टांतील काम, घरचें नित्याचें वाचन, व्यायाम, व रात्रीं निजते वेळीं एखादुसरा बुद्धिबळाचा डाव खेळून मग निजावयाचें, असा सारखा क्रम होता. तारीख २० जुलईला संध्याकाळीं घरीं आल्यावर सांगितलें, कीं, " आज माझें पोट बरें नाहीं, अस्वस्थ वाटतें. रात्रींतून बरें वाटलें नाहीं तर सकाळीं कांहीं औषध घ्यावें लागेल. "

त्या रात्रीं जेवतेवेळीं पहिल्या भातावांचून दुसरें कांहीं खाल्लें नाहीं. वर जाऊन निजल्याबरोबर प्रथम तर झोंप चांगली लागली. सुमारें दोन वाजतां

मला जागें करून सांगितलें " मला बाहेर जावयाचें आहे, दिवा ठेवण्यास सांग, " असें म्हणून पायांत जोडा घातला.

माझ्या हातांत दिवा होता, तोच घेऊन मी पुढें झालें व दिवा ठेवून खालीं गेलें व चुलीवरचें ऊन पाणी आणून वर मोरीवर चूळ भरून टाकण्यास ठेविलें. स्वतः चूळ भरून टाकिली व तसेंच येऊन बिछान्यावर पडणें झालें आणि मला म्हटलें " अजून माझ्या प्रकृतीला बरें वाटत नाहीं असें वाटतें. कालपासून पोट बिघडण्याचा मला संशय वाटतच होता; त्याप्रमाणेंच झालें. "

असें म्हटल्यावर मी माणसांना उठवून शेकण्याकरितां आधणाचें पाणी रबराचे पिशवींत भरून आणा म्हणून सांगितल्याप्रमाणें त्यांनीं पिशव्या भरून आणल्यावर मी शेकीत बसलें. सकाळीं आठवाजेपावेतों असेंच चाललें होतें. डॉ. अगदीं उजाडतां येऊन प्रकृति पाहून त्यांनीं जें औषध दिलें तें हा वेळपर्यंत दोनतीन वेळ पोटांत गेलें होतें. पण बरें वाटेना, म्हणून चीफ जस्टिसांना चिठ्ठी लिहिली, कीं, " आजारामुळें आज मला कोर्टांत येतां येत नाहीं आणि उद्यांपासून एक महिन्याची रजा पाहिजे आहे, ती मंजूर व्हावी. "

ह्याप्रमाणें पत्र गेल्यावर चीफ जस्टिसांचें रजा मंजूर केल्याचें उत्तर आलें. पुढें दोनतीन दिवसांनीं प्रकृतीला जरा अधिक बरें वाटल्यावर एक महिनाभर वांद्यास समुद्रकांठच्या हवेवर जावें असें डॉक्टरचें मत पडल्यावर आम्ही वांद्यास रहावयास गेलों. तेथें डॉक्टर रोज येत होता व औषध सुरूच होतें. त्यामुळें नवीन दुखण्यानें अशक्तपणा आलेला होता, तो कमी झाला. पण रात्रीं दहा आणि साडेदहा यांच्यामध्यें हातांपायांस मुंग्या आल्यासारखें पण थोडें जोरानें आंतील शिरांना झटके येऊन एकाएकीं छातींत बांध घातल्यासारखें होऊन चैन पडेनासें होई. कांहीं तरी उग्र वास घेतल्यावर अगर जांभई किंवा ढेंकर आल्यावर हा बांध कमी होऊन बरें वाटे व लागलींच झोंप येई. मग पुनः दुसरे दिवशीं रात्रीं दहा वाजेपर्यंत ह्या आजाराची

ओळखही नसे. बाकीच्या गोष्टी नित्याप्रमाणें एकापुढें एक व्हावयाच्या, त्यांत किंवा रोजच्या जेवणखाणांत अंतर पडलें नाहीं.

रजा संपून वांद्याहून परत मुंबईस आल्यावर रोज कोर्टांत जाणें सुरू झालें. ह्यामुळें ह्या नवीन जडलेल्या घातुक आजाराचें आम्हांला वाटावें तितकें भय वाटलें नाहीं. पण हा आजार १९०० ऑगस्टपासून जो जडला तो शेवट-पर्यंत पुरला. वांद्यास हा आजार जडल्यापासून स्वतःला मात्र या आजा-राचा कांहीं विशेष संशय आला व याचा संबंध कोणीकडे आहे हें समजून घेण्याची रात्रंदिवस विवंचना लागली. दोनतीन डॉक्टर दररोज निर-निराळ्या वेळीं येत व ते औषध देत; त्यांना पुष्कळ वेळां विचारणें होई, कीं, "मला तुम्ही औषधें देत आहां व मी तीं घेत आहें; पण गुण कांहींच वाटत नाहीं. चालू आजारावर तुमच्या औषधांचा परिणाम होत नाहीं. ह्याकरितां तुम्ही दोघे तिघे एका जागीं बसून व आजाराची चिकित्सा नीट करून मग औषध काय द्यावयाचें तें ठरवा."

याप्रमाणें तिघांच्या मताप्रमाणें ठरविलेलें औषध महिनाभर घेतलें तरीही गुण वाटला नाहीं व आजाराच्या नेमलेल्या वेळेंत व स्वरूपांत यत्किंचितही अंतर पडलें नाहीं. त्यामुळें स्वतःची काळजी वाढली. खऱ्या शब्दांत बोला-वयाचें म्हणजे ह्या ऐहिक गोष्टींविषयीं काळजी दिवसेंदिवस कमी होत चालली व त्या जागीं उदासीनता येऊन बसली. आधींच अलीकडे या वर्षांत व्यावहारिक लहानमोठ्या गोष्टींत थोडी बहुत उदासीनता होतीच; त्यांत ती आतां प्रत्येक गोष्टींत अधिक दिसूं लागली. कोर्टाच्या कामाशिवाय इतर सर्व वेळ वाचनच चालत असे; पण त्यांत सगळा वेळ सारखें लक्ष असेलच असें दिसत नव्हतें. कारण एकीकडे वाचन चालू असतांनाच वृत्ति दुसऱ्याच कांहीं विषयांत गढून गेली आहे, असें, वाचणाऱ्या मुलानें चुकी केली तरीही ह्या वेळीं ती लक्षांत येत नसे यावरून मला वाटे. घरगुती कांहीं गोष्टींबद्दल जवळ विचारावयास गेलें तर म्हणावयाचें "संसारासंबंधीं घरगुती कांहीं गोष्टींविषयीं मला विचारून उगीच त्रास देऊं नकोस, हीं

कामें तुमचीं आहेत, तीं तुमचीं तुम्हीं पहावींत!" अशाच रीतीनें कांहीं तरी उत्तर द्यावयाचें.

भाग बाविसावा.

## सन १९०० सप्टेंबर महिना.



ऑगस्ट महिन्यामध्यें वांद्र्यास असतांना जो नवीन आजार जडल्याचें वर लिहिलें आहे, त्यावर डॉक्टरांचे औषधोपचार चालू होते. त्यांपैकींच हाता-पायाला व सर्वांगाला एक प्रकारचें औषधी तेल रोज रात्रीं चोळून जिरवावें म्हणून सांगितलें होतें. त्याप्रमाणें रोज रात्रीं जेवण झाल्यावर मी व मुली आणि केव्हां केव्हां वन्संही हें तेल चोळीत असूं. यावेळीं चि० सखू, तारा, नानू व शांता तेथेंच खेळत व बोलत असून, सासूबाईसुद्धां सर्व मंडळी या वेळीं दिवाणखान्यांत येऊन बसत असत. एकीकडे तेल चोळण्याचें काम, व एकीकडे दिवसभर काय काय कामें केलीं त्यांची चौकशी, त्याबद्दल टीका करण्याच्या बुद्धीनें स्वतःचें चेष्टेचें व विनोदाचें भाषण, आणि हीं चारीं मुलें भोंवतालीं खेळत असतांना त्यांचें कौतुक करणें यांत दहा साडेदहापर्यंत वेळ काढावयाचा. वडील बायका ज्या दिवशीं कांहीं कामांत गुंतल्या असतील त्या दिवशीं आम्हीं बुद्धिबळें खेळावयाचीं. कधीं कधीं मुलें निजलीं असतील त्या दिवशीं मीं, मुलींनीं व वन्संनीं पाळीपाळीनें गाणीं म्हणावयाचीं. आमच्या सगळयांमध्यें वन्संचा गळा फार चांगला व मधुर होता; आणि भगवद्भक्तांचीं प्रेमळ व भक्तिपर गाणीं, मिराबाईचीं व कबिराचीं पदें, वगैरे त्यांना पुष्कळ येत असत. त्यांच्या गाण्याला नवीन शिक्षणाचा कांहीं संस्कार नसल्यामुळें त्या आपलीं गाणीं जुन्या व साध्या तऱ्हेनेंच पण फार चांगलीं म्हणत. त्यांच्या गाण्यांपैकीं रंगाबाई, कान्हूपात्रा, म्हातारी, चिंधी, आढी, गांठोडें वगैरे गाणीं स्वतःला फार आवडत असत व तींच गाणीं

वन्संना म्हणावयाला सांगावयाचें होई. चारही मुलांपैकीं सगळयांत लहान जी शांता ( ही आबा भावोजींचा मुलगी ) ती अतिशय बोलकी व खेळकर होती. तिचें बोलणें लाडकें व नाजूक असून स्वभाव मोहक, मनमिळाऊ व गोड असे. ती सगळयांशीं प्रेमानें वागे व तिजवरही प्रत्येकाचें प्रेम असे. पण आम्हां सर्वांपेक्षां स्वतःला ती भारी आवडत असे व तिचाही आपल्या आईबापापेक्षां स्वतःकडेच सगळा ओढा असे. ही जात्या फार नकली असे. वाटेल त्याची नक्कल ती बिनचूक करी व सगळयांना फार हंसवीत असे. तिला एकदां स्वतः जवळ घेऊन विचारलें, कीं, अमुक अमुक माणूस कसें बोलतो चालतो तें दाखीव. असें म्हटलें, कीं झाली सुरुवात. बजाबापासून तों सासूबाईच्यापर्यंत एकामागून एक सगळयांच्या नकला हुबेहूब करून स्वतःला व आम्हां सर्वांना खूप हंसावयाला लावावयाची व दुसऱ्या तीन मुलांची चेष्टा करून त्यांची फजिती करावयाची.

अशा रीतीनें कांहीं खेळ, कांहीं करमणूक, कांहीं गोष्टी व कांहीं गाणीं या सर्वांत मिळून जेवण झाल्यापासून साडे दहापर्यंत वेळ काढावयाचा. हेतु हा, कीं, दहा व साडेदहा यांचे दरम्यान छातींत जो विकार होत असे तो ' ऑर्गनिक ' नसून नुसता ' नर्व्हसनेस ' चा आहे असें डॉक्टरचें म्हणणें असल्यामुळें अमुक वेळेलाच आपल्याला हा आजार व्हावयाचा असा विचार व त्याबद्दलची हुरहूर स्वतःच्या मनांत सतत वागत असल्यामुळेंच हा आजार त्याच नेमल्या वेळीं होतो असें आम्हांला वाटे, म्हणून दुसऱ्या कांहींतरी गोष्टींत स्वतःचें मन गुंतवावें म्हणजे त्या वेळचा विसर पडेल, इतकाच काय तो आमचा सर्वांचा हेतु होता. याप्रमाणें मन गुंतविण्याचा प्रयत्न केला, तरी एक दिवससुद्धां त्या आजाराची वेळ टळली नाहीं. दहा साडेदहा वाजतां छातीमध्यें बांध बसल्यासारखें होऊन जीव गुदमरावयाला लागावयाचा व हातापायांमध्यें मुंग्या येऊं लागून जोरानें झटके आल्यासारखें व्हावयाचें. मग कांहीं उग्र वास घेतल्यावर बऱ्याच वेळानें दोनचार ढेंकरा व जांभया आल्या, कीं, हें सर्व मिटून बरें वाटाव-

याचें, पण एवढ्या श्रमानें शरीराला थकवा येई व लागलीच जाऊन अंथरुणावर निजणें होई. असें नित्य चालत असे.

मी माझ्यासंबंधानें अशी फारशी हकीकत लिहूं नये म्हणून आरंभापासून हा विचार मनांत ठेवून चाललें आहे; पण चमत्कार हा, कीं, संसारांत बायकोचा संबंध अगदीं सावलीसारखा असल्यामुळें तें कितीही टाळूं म्हटलें तरी टाळतां येत नाहीं. म्हणून **स्वतः**ची गोष्ट अगर मनाची स्थिति नीट समजण्याकरितांच जेथें माझा संबंध आला आहे, तेथें मात्र चालतच नाहीं, म्हणून ठेवीत आहें. माझ्याही जुन्या आजाराची कुरकुर या वेळीं सुरू होती, असें म्हणण्यापेक्षां त्या आजाराचा अधिक जोर होता, असें म्हणणें जास्त शोभेल. केव्हां आजार सुरू होईल व केव्हां अडवील, याचा नेम नसे.

या वर्षाच्या जून अखेरपासून **स्वतः**ची प्रकृति एकसारखी चांगली अशी नव्हतीच. जून महिन्यांत जो किडनीचा आजार झाला त्यामुळें मला रात्रंदिवस जवळ बिछान्याशीं सुमारें आठ दिवस उभेंच राहावें लागलें, असें म्हटलें तरी हरकत नाहीं. मधून मधून मी पलंगाशेजारींच खुर्चीवर बसून रहात असें, पण दर पांचपांच मिनिटांस **स्वतः**ला उठावें लागत असल्यामुळें मला दहापंधरा दिवस सतत काम पडल्यानें अठराएकोणीस वर्षें असलेला माझा एक जुना आजार अलीकडे बळावूं पहात होता, त्याला हें अनायासें कारण मिळून तो मात्र अधिक बळावला.

एके दिवशीं नित्याप्रमाणें मी तेल लावण्यास जवळ गेलें, व खालीं वांकून आतां तेल लावणार, तोंच पोटांत एक मोठी कळ येऊन त्यासरशीं मला एकदम खालीं बसावें लागलें. हातापायांच्या सर्व शिरा अगदीं आंखडल्यासारख्या होऊन पुष्कळ वेळ जागच्या जागीं खिळून रहावें लागलें. अलीकडे मला मिस बेन्सनचा औषधोपचार सुरू होताच; पण दुसरे दिवशीं तिनें प्रकृति पाहिल्यावर साफ सांगितलें, कीं, "हा आजार फार वर्षांचा जुना आहे. नुसत्या औषधोपायानें हा बरा होणार नाहीं, ऑपरेशन केलें तरच बरा होईल."

हें ऐकून स्वतः म्हटलें "आधीं तुमचे औषधोपाय तर चांगले चालूं देत. ऑपरेशन करण्यास आमचा धीर होत नाहीं. ऑपरेशन केल्यावांचून जितके दिवस जातील तितकें बरेंच, असें मला वाटतें; पण उपाय नसलाच तर मग पुढें पाहूं."

मग "माडीवरच्या माडीवर हिंडवलें तर हिंडा, पण जिन्याची चढउतर अगदीं करावयाची नाहीं," असें मिस बेन्सननें मला बजावून सांगितलें. त्याप्रमाणें मी वरच्यावरच साधारण हिंडून फिरून असें.

पांचसहा दिवसांनीं पुष्कळ बरें वाटूं लागलें म्हणून मी पुनः तेल चोळण्यास जवळ गेलें; तें पाहून स्वतः म्हटलें "नको बुवा, तूं नको तेल लावूंस. पुन्हां त्या दिवसासारखें झालें म्हणजे तुला त्रास व आम्हांला काळजी. यापेक्षां तूं स्वस्थ बसून आपली प्रकृति सांभाळ, म्हणजे झालें."

हें ऐकून मला फार वाईट वाटलें व खेद झाला, कीं, सध्यां स्वतःला बरें नाहीं. ज्यावेळीं माझ्या कामाची खरी गरज त्यावेळीं हें माझ्या आजाराचें कुलंगडें कोठून आलें बरें ? आजार काय आजकालचा नवा आहे ? आज अठरा वर्षें त्याचा त्रास थोडाबहुत मी काढीत आलें, पण आतांच्यासारखें त्यानेंही कधीं अडविलें नव्हतें. मग आतांच त्याला हें वेड कोठून आलें आहे कोण जाणें. नेहमीं आजारी आजारी म्हणून जर असेंच राहाण्याची मला वेळ आली, तर माझा जगण्याचा उपयोग तरी काय? ऑपरेशनला भ्यावयाचें म्हणजे त्यांतून मी बरी होईन कीं नाहीं, हीच ना शंका ? मी बरी झालें व माझ्या हातून स्वतःची सेवा घडली, व दुखण्याबहाण्याच्या वेळेस माझा स्वतःला उपयोग झाला, तरच माझें जगण्याचें सार्थक आहे. नाहींतर जगून नुसतें असें बसून रहाण्यापेक्षां व खेद करण्यापेक्षां मेलें तर काय वाईट ? या स्थितीपेक्षां मला मरण बरें वाटतें.

असे विचार माझ्या मनांत येऊन ते मनाला फार लागून राहिले, व चैन पडेना म्हणून मीं वन्संना वर बोलाविलें व त्यांना म्हटलें "काल मिस बेन्सन काय म्हणत होत्या तें कळलें ना ? त्यांचें म्हणणें 'ऑपरेशन केल्या-

वांचून हा आजार अगदीं बरा व्हावयाचा नाहीं.' आहे असें खुटूरुटू चालावयाचें असें आहे व इकडे तर ऑपरेशन करावयाला आम्हीं कबूल नाहीं, आम्हांला भय वाटतें, तुमच्या हातून होतील तितके औषधोपचार करा, असें मिस बेन्सनला स्वतः सांगितलें. माझा आजार काय नवीन आहे? त्याची इतकी काळजी कशाला हवी आहे? मी कांहीं अशक्त झालें नाहीं. मला ऑपरेशन सोसेल. त्यांत सगळ्यांना इतकी भीति ती काय वाटते? या आजाराच्या निमित्तानें कण्हत कुंथत एके ठिकाणीं पडून रहाणें मला अगदीं लाजिरवाणें वाटतें. इस्पितळांत हजारों माणसें ऑपरेशन करितात, तीं मरतात कीं काय? उगीच कांहीं तरी स्वतःच्या मनानें भीति घेतली आहे, झालें."

त्या म्हणाल्या "भीति खरोखरच नसली तर करावें. आम्हांला त्यांतलें कांहीं समजत नाहीं. पण दादांना याबद्दल अधिक काळजी व भीति वाटत आहे, तेथें काय करावें? त्यांचा स्वभाव जात्या मायाळू व काळजीखोर आहे. शिवाय, दुखण्याचें अंग आहे, त्यांतच आणखी तुझी काळजी नवीन उपस्थित कशाला करावयाची?"

हें ऐकून मी निरुत्तर झालें व गप्प बसलें. पण मनाची तळमळ कांहीं केल्या कमी होईना. असें निरुपयोगी जगणें काय करावयाचें! असें वाटून त्या रात्रीं मला चांगली झोंपसुद्धां आली नाहीं. मन अस्वस्थच होतें.

दुसरे दिवशीं सकाळीं दहा वाजतां जेवणाकरिता स्वतःचें खालीं जाणें झालें, व अकरा वाजतां जेवून हायकोर्टांतही जाणें झालें. मला जिन्याची चढउतर करावयाची नसल्यामुळें मी वरच जेवलें. सुमारें बारा वाजतां रोजच्या सारख्या मिस बेन्सन आल्या व माझ्याजवळ येऊन मला उपचार करूं लागल्या, तों काय झालें कोण जाणें, माझा आजार एकदम सुरू झाला व हातपाय ताठल्यासारखे होऊन ते फुगूं लागले. पंधरावीस मिनिटांत हातांतील बांगड्या इतक्या दाटूं लागल्या, कीं, त्या पिचवून काढण्याची वेळ आली. मला आंतून शुद्धि होती व काय होतें तें मात्र सांगतां

येत नव्हतें. अरेबियन नाईटमधल्या दगडी पुतळ्याच्या गोष्टीसारखें माझें पायाकडून कंबरेपर्यंत अंग घट्ट होत चाललें, व घट्ट झालेला भाग बधिर होऊन स्पर्श समजेनासा झाला. तसेंच, जिभेला मुंग्या येऊं लागल्या. ही सर्व स्थिति पाहून मिस् बेन्सनही अगदीं घाबरून गेल्या, व त्यांनीं हायकोर्टांत एक चिठ्ठी लिहून पाठविली, कीं " मिसेस रानडे यांची प्रकृति एकाएकीं जास्त बिघडली आहे, आपण लवकर घरीं यावें. " ही चिठ्ठी स्वतः वाचल्याबरोबर उठून घरीं येतां येतां बरोबर एकदोन डॉक्टर घेऊन येणें झालें.

ही वेळ चार वाजण्याची होती, व तीन वाजण्याच्यापूर्वींच मला थोडा उतार पडूं लागला होता. आतां तितकी भीति नाहीं असें पाहून तीन वाजल्यावर मिस् बेन्सन आपल्या घरीं गेल्या. इकडे स्वतः बरोबर आणलेल्या डॉक्टरांनीं आंत येऊन माझी नाडी पाहिली व आजाराची सर्व हकीकत ऐकून घेऊन दोन्ही डॉक्टरांनीं जवळ सांगितलें, कीं, "ऑपरेशन करवावें हा उत्तम मार्ग. असेंच चाललें तर यामुळें केव्हां तरी धनुर्वात होण्याचा संभव आहे. "

हें ऐकून स्वतःला अतिशय काळजी व भीति वाटली व लागलीच मिस् बेन्सनला चिठ्ठी लिहिली, कीं " उद्यां सकाळीं तुम्ही डॉक्टर डिमक व आणखी दुसरा कोणी अनुभवी डॉक्टर घेऊन नऊ वाजतां येथें या, म्हणजे चौघांच्या विचारानें काय ठरवावयाचें तें नक्की ठरवूं. "

शिपायाजवळ चिठ्ठी दिल्यावर आंत येऊन माझ्या पलंगापाशींच रात्रीं जेवणाची वेळ होईपर्यंत बसणें झालें. या दिवशीं रोजचें वाचन किंवा सकाळच्या टपालाचीं उत्तरें लिहिणें वगैरे कांहीं केलें नाहीं. माझे हात आपल्या हातांत घेऊन सचिंत बसणें झालें, तें मला बरें वाटेना. म्हणून मीं होऊन कांहीं तरी विचारून बोलविण्याचा प्रयत्न केला. कारण, बोलूं लागल्यावर तरी ही दुखण्याची काळजी कमी होईल, नाहीं तर थोडा वेळ तरी विसर पडेल. पण नाहीं; मी विचारीन तेवढ्यापुरतेंच होय किंवा नाहीं

म्हणून संपवावयाचें, अधिक बोलावयाचें नाहीं. समोरच्या दिवाणखान्यांत सखू, नानू, तारा व शांता हीं आपापसांत बोलून कांहीं खेळ खेळत होतीं, तें पाहून मीं शांताला आंत हांक मारली. आतां तिच्याशीं बोलण्यांत तरी स्वतःचा वेळ बरा जाईल, असें मला वाटलें. शांता आंत आली. मी तिच्याशीं बोलूं लागणार तोंच मला सांगितलें, " तूं आज बोलण्याचे श्रम घेऊं नकोस. तूं बोललीस तर मी मुलांना बाहेर पाठवीन. मी इतका वेळ तुझ्याजवळ आहें, तो मी नसतों का तुझ्याशीं बोलत बसलों ! पण तुला बोलतां कामा नये. स्वस्थ पडून विश्रांतिच घेतली पाहिजे; म्हणून मी मुद्दाम येथें बसून राहिलों आहें. "

जेवणाची तयारी आहे असें सांगण्यास आठ साडेआठ वाजतां बजाबा आला. त्याला सांगितलें, " आधीं हिचें ताट वाढून आणावयाला मुलींना सांग, हिचें जेवण झाल्यावर मग मी येईन. " त्याप्रमाणें माझें जेवण झाल्यावर स्वतः खालीं जाऊन व जेवून पुन्हां लागलीच माझ्याजवळ येऊन बसणें झालें.

यावरून माझ्या मनांत आलें, कीं, आज मला झोंप लागेपर्यंत जवळून हालावयाचें नाहीं, असा स्वतःचा बेत दिसत आहे. म्हणून मी अगदीं चळवळ न करतां स्वस्थ पडून राहिलें. सुमारें अर्ध्या तासानें मला झोंप लागली असें स्वतःला वाटल्यावर मग हळूच उठून दिवाणखान्यांत जाणें झालें.

त्या दिवशीं रात्रीं वाचन किंवा अंगाला तेल लावून घेणें वगैरे कांहीं केलें नाहीं. रोजची झोंपेची वेळ होईपर्यंत एका कोचावर सचिंत बसून कांहीं विचार चालला होता. झोंपेची वेळ झाल्यावर आपल्या अंथरुणावर निजणें झालें. मी निजलें होतें त्याच हॉलमध्यें मधोमध एक लांकडी पडदा असून त्याच्या पलीकडे स्वतःचा पलंग होता. त्यामुळें थोडी चळवळ झाली तरीसुद्धां माझ्या कानावर येई. रोजच्या वेळेवर बिछान्यावर जाऊन निजणें झालें खरें, पण त्या रात्रीं झोंप बिलकूल आली नाहीं. या कुशीवरून त्या

कुशीवर वळतांना नेहमींच्या संवयीप्रमाणें 'राम राम' उच्चारलेले शब्द माझ्या कानीं पडत. शिवाय, त्या रात्रींतून चारपांच वेळां माझ्या पलंगापाशीं स्वतः येऊन मला झोंप लागली आहे कीं नाहीं म्हणून हळूच कानोसा घेतला. अगदीं पहिल्यांदा येणें झालें त्यावेळीं "कां यायचें, झोंप नाहीं का लागली?" असे विचारणारे शब्द माझ्या अगदीं ओंठापर्यंत आले व मी बोलणार तोंच माझ्या मनांत आलें, कीं, या विचारण्यानें कदाचित् मला अजून मुळीं झोंप लागली नाहीं असें स्वतःस वाटून येथेंच बसून राहणें होईल, याकरितां आपण अगदीं गप्प पडून रहावें, असें वाटून मी स्वस्थ पडून राहिलें. स्वतः येऊन खालीं वांकून कानोसा घेतल्यावर पाय न वाजवितां हळूच परत जाणें झालें. याप्रमाणें सगळी रात्र आमची दोघांचीही जागूनच गेली.

सकाळीं उठल्यावर मला येऊन विचारलें "रात्रीं झोंप बरी लागली होती कां? आतां कांहीं थकवाबिकवा वाटत नाहींना?"

मीं म्हटलें "छे, कांहीं वाटत नाहीं; झोंप चांगली लागली होती."

असें ऐकिल्यावर सांगितलें "मी बाहेर जाऊन कामाला बसतों. तूं स्वस्थ पडून विश्रांति घे. मुलांशीं किंवा कोणाशीं बोलूं नको."

मीं 'बरें' म्हटल्यावर स्वतः बाहेरील दिवाणखान्यांत जाऊन कामाला आरंभ केला.

सुमारें नऊ वाजतां मिस् बेन्सन व दोघे डॉक्टर बोलाविल्याप्रमाणें आले. त्यांना आंत आणून माझी प्रकृति दाखविली व "आतां आपण बाहेर बसून बोलूं," असें म्हणून तिघांनाही बाहेर नेलें.

मग बाहेर या सगळ्यांचें काय बोलणें झालें कोण जाणें. ऑपरेशन दुसऱ्या दिवशींच करावयाचें ठरलें असावें. कारण, स्वतःचा चेहरा अगदीं उतरून जाऊन मन काळजीच्या विचारानें उद्विग्न झाल्यासारखें दिसत होतें. तरी तो कोर्टाचा दिवस असल्यामुळेंच खालीं जाऊन स्नान व जेवण आटोपून कोर्टांत जाणें झालें. कोर्टांतील काम आटपल्यावर त्या दिवशीं पायीं न

चालतां गाडींत बसून लागलीच घरीं येणें झालें. माडीवर आल्याबरोबर पोषाख काढण्याससुद्धां बाहेर दिवाणखान्यांत न थांबतां माझ्या पलंगाजवळच खुर्चीवर येऊन बसणें झालें.

पोषाख उतरल्यावर माझ्या प्रकृतीची विचारपूस केली व बराच वेळ थांबून मला म्हटलें "मग ऑपरेशनचें काय करावयाचें? डॉक्टर अनमानित बोलतात, खात्री देत नाहींत. म्हणून नुसत्या धाडसानें ऑपरेशन करविण्यास परवानगी द्यावयाला मन धजत नाहीं, भीति वाटते."

हे शब्द बोलतांना आवाज अगदीं हळू झाला, व मन किती तरी आवरून धरिलें होतें. पण बोलण्यांत थोडा तरी गहिंवरल्यासारखा आवाज आलेला माझ्या कानीं पडल्याबरोबर, याबद्दल मला मुळीं भीति वाटत नाहीं हें दाखविण्याकरितां व स्वतःला धीर वाटण्याकरितां मीं किंचित हंसून पण मोठ्या हुषारीच्या स्वरानें म्हटलें "अं; त्यांत काय आहे? इतकी भीति कसली वाटते? क्लोरोफार्म देतील व ऑपरेशन करतील. त्याची इजा मला तर कांहीं समजावयाची नाहीं. येऊन जाऊन स्वतःला पाहावणार नाहीं, तर जरा मन घट्ट करून दिवाणखान्यांतच बसून रहावें, म्हणजे झालें. नाहीं तरी ऑपरेशनच्या खोलींत कोणी यावयाला नकोच. डॉक्टरिणीशिवाय दुसऱ्या कोणालाच त्या खोलींत येऊं द्यावयाचें नाहीं, असें मीं मिस् बेन्सनजवळून आज सकाळीं वचन घेतलें आहे. कांहीं झालें तरी ऑपरेशन करावयाचेंच, मला कांहीं भीति वाटत नाहीं. स्वतः उगीच नसती काळजी करूं नये. माझ्या हातून नेहमींसारखीं चार कामें झालीं तर माझ्या जगण्याचें सार्थक. नाहीं तर श्रीमंतांच्या घरांत वस्त्राभरणानें मंडित अशा पांगळ्या बायका कण्हत कुंथत बसलेल्या असतात, व आपल्याच सेवेकडे चारदोन माणसें गुंतवितात, तसें वैभव मला नको आहे, त्यापेक्षां मी मुळींच बरी झालें नाहीं तरी हरकत नाहीं."

तेव्हां म्हटलें "असे वेड्यासारखे भलतेसलते विचार डोक्यांत भरवून घेऊन काय बरें आपल्याला त्रास करून घेत आहेस? आपलाच हट्ट काय

चालवावा ? दुसऱ्याच्या मनाचा त्यांत थोडा तरी विचार ठेवावा. स्वस्थ पडून किंवा एके ठिकाणीं बसून जर आज ऑपरेशन करणें टळत असेल तर बरें नाहीं कां ? घरांत हिंडून फिरून आपल्या हातानें कामें न झालीं तरी बसल्या बसल्या सर्व व्यवस्था पहातां येईल. शिवाय लिहिण्यावाचण्याची करमणूक तुझी तुला आहेच. खुर्चीवर बसून दोन माणसांनीं ती खालीं नेली म्हणजे गार्डीतून बाहेर फिरावयाससुद्धां जातां येईल. तेव्हां मला तर हेंच पसंत आहे. नीट विचार कर, म्हणजे तुलाही मी म्हणतों तेंच खरें वाटेल. उगीच आग्रह धरून आपला जीव धोक्यांत कां घालावा बरें ?"

हें बोलणें चाललें असतांना मी नुसती तोंडाकडे एकसारखी पहात होतें, त्यामुळें प्रत्येक वाक्य बोलतांना स्वतःच्या मनाची स्थिति कशी झाली होती, ती हुबेहूब माझ्या डोळ्यांवर असल्यानें माझ्या अंतःकरणांत कसेंसेंच होऊन डोळे पाण्यानें भरून आले, व लागलींच मी कांहीं बोलणार होतें पण बोलवेना म्हणून जरा थांबतें, तों चोपदारानें स्वतःला येऊन म्हटलें "डॉक्टर बेन्सन खालीं आल्या आहेत, त्या आपली भेट घेऊं इच्छितात."

तेव्हां सांगितलें "बोलाव त्यांना वर, मी बाहेर आलोंच," असें म्हणून उठतां उठतां मला म्हटलें "मी जरा जाऊन येतों, तूं स्वस्थ मनानें नीट विचार कर."

बाहेर गेल्यावर मिस् बेन्सनशीं पुष्कळ वेळ बोलणें चाललें होतें. कांहीं विचार घेण्यासाठीं म्हणून बर्नसंनाही वर बोलाविल्या होत्या. मग त्या सर्वांचें काय बोलणें झालें तें कळलें नाहीं. पण शेवटीं ऑपरेशन करण्याचें ठरलेंच, कारण, बोलणें आटोपल्यावर डॉक्टरीण आंत येऊन तिनें मला कांहीं औषध पिण्यास दिलें व "आतां रात्रीं जेवूं नका, फार तर थोडेंसें दूध घ्या; पण सकाळीं मात्र दूध अगर चहा कांहीं घेऊं नका," म्हणून सांगितलें. मीं होय म्हणून औषध प्यालें व डॉक्टरीण निघून गेली.

मिस् बेन्सन निघून गेल्यावर स्वतः पुन्हां माझ्याजवळ येऊन बसणें झालें; पण आम्हीं एकमेकांशीं एक शब्दही बोललों नाहीं. जेवणाची तयारी

असल्याचा निरोप आल्याबरोबर मला त्या दिवशीं जेवावयाचें नव्हतें हें माहीत होतें, म्हणून स्वतः एक मोठा सुस्कारा टाकून मुकाट्यानें जाणें झालें. जेवून आल्यावरही माझ्या तेथेंच येऊन बसणें झालें. माझे हात आपल्या हातांत घेऊन कांहीं तरी विचार चालला होता व दृष्टि कोणीकडे तरी लागली होती. असा किती वेळ गेला, हें त्या वेळीं आम्हां दोघांनाही समजलें नाहीं; पण अकराचा ठोका पडल्यावर " हे किती वाजले ? " म्हणून स्वतः विचारलें. अकरा वाजले असें कळतांच म्हटलें " खरें कीं काय, घड्याळ पुढें असेल ! आज रोजची साडेदहाची वेळ कशी टळली ! "

तेव्हां आमच्याही सगळ्यांच्या तें मनांत येऊन आश्चर्य वाटलें. पण यावरून स्वतःचा रोज रात्रीं साडेदहा वाजतां नेमानें होत असलेला आजार ' ऑर्गॅनिक ' नसून डॉक्टर सांगतात तसाच ' नर्व्हस्नेस ' चा खचित आहे; आज स्वतःचें लक्ष ठिकाणीं नव्हतें, त्यामुळें वेळ टळून गेली तरी रोजचा आजार झाला नाहीं, असें माझ्या मनांत येऊन मला तर फार बरें वाटलें. आणखी थोडा वेळ वाट पाहून मग स्वतः जाऊन आपल्या पलंगावर निजणें झालें.

आजही आदल्या रात्रीसारखीच झोंप आली नाहीं. नुसती या कुशीवरून त्या कुशीवर चळवळ चालली होती व नेहमींप्रमाणेंच पण आज जरा जास्त उदासवाणीनें ' राम राम ' असा उच्चारलेला शब्द मधूनमधून ऐकूं येत होता. तें ऐकूनच व गेल्या दोनचार दिवसांपासून स्वतःच्या मनाची झालेली स्थिति व संध्याकाळचें बोलणें जें मोठ्या कष्टानें मन आंवरून धरून थोड्या व तुटक शब्दांनीं चाललें होतें, तें सर्व मला या वेळीं आठवून अगदीं भडभडून आलें. त्यासरशीं जें रडें आलें तें कांहीं केल्या आवरेना. उद्यां जर मी गेलें तर स्वतःला असह्य दुःख होईल. मन अत्यंत उदास व खिन्न होईल. आपल्या स्वतःच्या कोणत्याच गोष्टी आजपर्यंत स्वतः कधीं पाहिल्या नाहींत, कोणत्या वेळीं काय पाहिजे तें आठवणीनें आजपर्यंत मीच करीत असें, तें आतां कोण करील ? रात्रीचे रात्रीं कांहीं

होऊं लागलें तर तें कोणाला कळेल? घरांतील सर्व माणसें काळजीचीं व अगत्याचीं आहेत, पण स्वतःकडून उच्चार होईल तेव्हांना त्यांना कळेल. अशा संकोचवृत्तीनें नित्य किती तरी हाल होतील. एरव्हींपेक्षां जरासें बरें नसलें तरी जेवणखाण, औषधपाणी, अंग व डोकें चेपणें वगैरे उपचार माझ्याशिवाय कोणीं केलेले कधीं आवडत नाहींत. मग आतां कसें होईल? आज तीनचार महिने तर स्वतःचें दुखणें चाललें आहे. बाकी, अशा वेळीं मी गेलें तर त्यांत काय वाईट आहे! इतकें सुख व वैभव भोगल्याचें सार्थक होईल व धन्य धन्य म्हणतील. हेंच मी परमेश्वराजवळ आजपर्यंत मागत आलें आहेंना! संसारांतील मुख्य सुखाचा भाग जीं अपत्यें तीं आम्हांला मुळींच नाहींत. तरी आम्ही दोघेंही त्यानें ठेविलेल्या स्थितींत आनंदानें आहों. कधीं उदासीन राहिलों नाहीं, किंवा सुस्काराही टाकला नाहीं. उलट, ती वाण भरून काढण्याचीही आम्हीं तजवीज केली आहे. तेव्हां आतां आमच्या या असलेल्या स्थितींत कांहीं बदल न करतां शेवटीं मलाच देव आधीं नेईल, असाच विश्वास आजपर्यंत मी ठेवीत आलें आहेंना? कारण, माझ्यामध्यें कुलीन घराण्याशिवाय स्वतः-चा संबंध जुळल्यासारखें रूप, रंग, गुण, किंवा विद्या यांपैकीं कांहींच नसून केवळ परमेश्वराच्या कृपाप्रसादानेंच मला ही जन्माची जोड मिळून माझें जीवित धन्य झालें आहे. ही जन्माची जोड तोच कायम राखील, असा मला पूर्ण भरंवसा आहे.

असा आपल्या आपल्याशीं मी विचार करीत असतांना आदले दिवशीं संध्याकाळीं माझ्याशीं बोलतां बोलतां स्वतःच्या तोंडून "दुसऱ्याच्या मनाचा थोडासा तरी विचार ठेवावा," हें जें वाक्य जपून व हळू उच्चारलें गेलें होतें—तरी त्यांतील गहिंवरलेल्या व घोगऱ्या आवाजाची आणि खिन्न झालेल्या चेहऱ्याची मला आठवण होऊन त्या शुद्ध प्रेमाची व माझ्या या चाललेल्या उलट विचाराची मीं जेव्हां तुलना केली, तेव्हां मला अगदीं चमत्कारिक होऊन माझा मला थोडा तिरस्कारही वाटला. आपल्या मार्गें

स्वतःच्या मनाची होणारी स्थिति मनांत आल्याबरोबर मन अगदीं विव्हळ झालें, व वाटलें, कीं, आम्हां उभयतांपैकीं कोणी तरी दुःख सोसलें पाहिजे अशी जर परमेश्वराची इच्छा असेल तर स्वतःकरितां मीं कांहींही सोसावें, पण माझ्याकरितां स्वतःला कांहीं दुःख होऊं नये, त्या कोंवळया मनाला तें अगदीं सहन होणार नाहीं. बायकांचें खरें व्रत म्हटलें म्हणजे आपल्यापासून आपल्या प्रिय पतीला केव्हांही व कोणत्याही बाबतींत दुःख होऊं नये, हीच तिची आमरणात् इच्छा असावी व लहानमोठ्या सर्व गोष्टींत या धोरणानें तिचा प्रयत्न होत असावा. हेंच बायकांचें खरें सौभाग्य व हेंच व्रत. जिला पतीच्या अंतःकरणाची चांगली ओळख झाली आहे, व जिला त्या निस्सीम प्रेमाची किंमत कळत आहे, तिला आप मेलें व जग बुडालें अशा अप्पलपोट्या विचारानें समाधान कसें वाटावें ? असें म्हणून मी मनांतल्या मनांत ईश्वरचिंतन करीत स्वस्थ राहिलें.

स्वतः निजून उठून माझ्या पलंगापाशीं येऊन बसणें झालें, आणि " रात्रीं झोंपबीप कशी लागली होती ? " म्हणून विचारलें. मींही अगदीं शांतपणानें " चांगली लागली होती, " असें उत्तर दिलें. स्वतः अर्धा तास तेथें बसणें झालें. पण ऑपरेशनचें किंवा दुसरें कांहीं बोलणें झालें नाहीं, किंवा माझ्या देखत सुस्कारासुद्धां टाकावयाचा नाहीं, असा निश्चय दिसला. ही मन आवरून धरलेली स्थिति फार वेळ टिकणार नाहीं असें वाटूनच कीं काय कोण जाणे, माझ्या जवळून एकदम उठून जाणें झालें. हें मलाही जरा बरेंच वाटलें; कारण, आधीं जरी मीं शांतपणानें रहाण्याचा निश्चय केला होता, तरी स्वतः येऊन माझ्या बिछान्यावर बसल्यावर तो ढांसळून जाऊन अंतःकरणाची कालवाकालव सुरू झाली होती. उठून गेल्यावर मी तोंडावर पांघरूण घेऊन दहावीस मिनिटें स्वस्थ पडलें. अशा रीतीनें मनाला हवी होती ती मोकळीक मिळाल्यानें तें जरा स्थिर झालें. खरें म्हटलें म्हणजे आरंभापासून ऑपरेशन करविण्याबद्दल स्वतःची सर्व रीतींनीं नाखुषी असतांना मींच फार उचल केली असें असून आतां माझें मन कां कचरूं लागलें, तें मला समजेना. असो.

प्रातर्विधि उरल्यावरक पुन्हां स्वतः माझ्याजवळ येऊन बसणें झालें. मग चहा तेथेंच घेतला; पण एकमेकांकडे नुसतें पहाण्यापलीकडे कांहीं बोलणें वगैरे झालें नाहीं. स्वतः मात्र कांहींतरी बोलण्याचा विचार चालला असावा, असें दिसलें. पण बोलवलें नाहीं. इतक्यांत पुण्याहून राघोपंत नगरकर आले आहेत, असें चोपदारानें येऊन सांगितलें. तें ऐकून मुकाट्यानें उठून बाहेर जाणें झालें. ऑपरेशन करावयाचें ठरल्यावर जवळ कोणी तरी मित्रांपैकीं बोलण्याबसण्यास असावें, म्हणून वन्संनीं राघोपंत नगरकरांना मुंबईस येण्याविषयीं लिहिलें होतें, म्हणून ते अवचित त्याच दिवशीं आले. दहा साडेदहा वाजल्यावर ऑपरेशनची तयारी करण्याकरितां दोन माणसें पुढें आलीं. त्यांनीं सांगितलें, कीं, " मिस् बेन्सन आणि दुसऱ्या डॉक्टरिणी बारा वाजतां येतील. "

हा निरोप ऐकून स्वतः स्नान व जेवण उरकून घेण्याकरितां खालीं जाणें झालें. मंडळी खालीं जेवावयाला बसल्यावर मिस बेन्सन व दुसऱ्या डॉक्टरिणी आल्या. तेव्हां मीं मिस् बेन्सनला एकीकडे सांगितलें, " खालीं मंडळी जेवावयास गेली आहे ती परत येण्याच्या पूर्वींच तुम्ही मला क्लोरोफार्म देऊन ऑपरेशन सुरू करा. "

यावर " परवानगी घेतल्याशिवाय मी आरंभ कसा करूं ? कदाचित् राग होईल, " असें त्या म्हणाल्या.

तेव्हां मीं सांगितलें, " अशा वेळीं विचारलें नाहीं तरी तें कां विचारलें नसावें हें स्वतःच्या लक्षांत येईल व राग येणार नाहीं. याकरितां मीं सांगतें तें ऐका व होईल तितकी जलदी करा. मंडळी वर आल्यावर आम्हांला कोणालाच धैर्य होणार नाहीं. उगीच घोटाळा पडून तुमचा वेळ मात्र पुष्कळ जाईल. याकरितां लौकर आटपा. स्वतः कांहीं म्हटलें तर मीं आग्रह धरिला म्हणून माझें नांव सांगा. मग तर कांहीं नाहींना ? "

हें ऐकतांच त्यांनीं क्लोरोफॉर्मची तयारी करण्यास सांगितलें. क्लोरोफॉर्म देणाऱ्या दोघी बायका बरोबर आल्याच होत्या. त्यांनीं थोड्या वेळानें

'तयारी आहे' असें सांगतांच मिस् बेन्सननें मला टेबलावर निजण्यास सांगितलें. मी मनांतल्या मनांत स्वतःला व देवाला नमस्कार करून स्वस्थ मनानें टेबलावर निजलें व मग त्या दोघी बायकांनीं मला क्लोरोफॉर्म दिला. डॉक्टर कृष्णाबाई केळवकर या त्या वेळीं पास झाल्या नव्हत्या, तरी शेवटच्या वर्षांतील विद्यार्थीण असल्यामुळें मिस् बेन्सनच्या जवळ मद-तीला उभ्या होत्या. क्लोरोफॉर्मचा अंमल येऊन मी बेशुद्ध होण्याच्या पूर्वीं माझ्या मनांत आलें, कीं, आजचा हा प्रकार उलट झाला, तर मात्र स्वतःचा निरोप घेऊन व विचारून मी टेबलावर आलें नाहीं हें माझ्या मनां-तल्या मनांत राहून जाईल. तसें झालें तरीही माझ्या मनांत राहिलेली गोष्ट स्वतःच्या मनाला खचित कळेल, कधीं राहणार नाहीं, वगैरे विचार करीत असतांना मी बेशुद्ध झालें-ती सुमारें पावणेदोन तासांनीं ऑपरेशन संपल्या-वर या तिघीचौघी बायका टेबलावरून उचलून मला पलंगावर ठेवूं लागल्या तेव्हां प्रथम शुद्धीवर आलें व स्वतःला बोलावण्यास सांगितलें. त्याप्रमाणें स्वतः येऊन व बराच वेळ तेथें बसून "आतां भिऊं नको, ऑपरेशन संपलें, मी तुझ्याजवळून जात नाहीं, येथेंच बसतों," वगैरे धीर येण्यासारखें सांगून तेथेंच पलंगावर बसून राहणें झालें. मी स्वतःचे दोन्ही हात आपल्या हातांत घट्ट धरून ठेविले होते; पण अर्धवट शुद्धींत असल्यामुळें मला बोलण्याची उमका झाली नाहीं. कांहीं तासांनीं मला बरें वाटून मी अगदीं चांगली शुद्धीवर आलें व दूध घेतल्यावर स्वतःचें दिवाणखान्यांत जाणें झालें. पुढें मी तीन आठवडेपर्यंत बिछान्यांतच पडून होतें. पलंगावर किंवा खुर्चीवर बसावयाचें नाहीं, असें मिस् बेन्सनचें सांगणें होतें.

ह्या ठिकाणीं सांगावयाची विशेष गोष्ट म्हणजे ही कीं, जुलई महिन्या-पासून स्वतःला रोज रात्रीं दहा आणि साडेदहा यांच्या दरम्यान जी 'स्पॅझम' येत असे, ती माझें ऑपरेशन झालें त्या दिवसापासून तीन आठवडेपर्यंत मुळींच आली नाहीं, त्यामुळें आम्हां दोघांना व घरांतील सर्व मंडळीला बरें वाटलें; पण हें बरें वाटणें पुढें आणखी एक आठवडाभरही पुरतें टिकलें

नाहीं. यावेळीं दिवाळीची सुट्टी झाल्यामुळें स्वतः मलाही बरोबर घेऊन माथेरानास जाण्याचा बेत केला. सामानसुमान, आचारी, गडी व ब्राह्मण यांना पुढें पाठवून देऊन दुसरे दिवशीं मिस् बेन्सन आल्यावर तिला स्वतः सांगितलें, कीं, " उद्यांपासून मला तीन आठवड्यांची सुट्टी आहे. या सुट्टींत मीं हिला घेऊन माथेरानास जाण्याचा विचार केला आहे. बरोबर जीं काय औषधें द्यावयाचीं असतील तीं लिहून द्या व उपाय काय करावयाचे असतील ते तिला सांगा."

तेव्हां त्या म्हणाल्या, "आणखी पंधरा दिवस त्यांना कोठें नेतां येणार नाहीं. आजपर्यंत चालू असलेले उपायच कांहीं दिवस चालू असले पाहिजेत."

हें ऐकल्यावर स्वतःची बरीच निराशा झाली. तें पाहून मलाही वाईट वाटलें, पण कांहीं उपाय नव्हता. " माणसें व सामान आदले दिवशीं पुढें पाठविलें असल्यामुळें आतां त्यांना परत बोलावणें बरें दिसत नाहीं, याकरितां स्वतः पुढें जावें व मी दहाबारा दिवसांनीं मागाहून येईन. गेल्या महिन्यांत पंधरा दिवस जाग्रणानें व काळजीनें थकवा आलेल्या मनाला त्या हवेनें हुषारी येईल व बरें वाटेल म्हणून यावेळीं जावेंच, मी होईल तितकें लौकर येईन," असें म्हणून मीं आग्रह केल्यावर जाण्याचें कबूल केलें. दुसरे दिवशीं दुपारीं भावोजींना घेऊन माथेरानास जाणें झालें.

या गोष्टीला आठदहा दिवस झाले. दररोज खुशालीचीं पत्रें येत जात होतींच. तीनचार दिवसांनीं एक पत्र आलें, त्यांत पूर्वीसारखी पुन्हां 'स्पॅझम' येऊं लागली आहे, बरोबर त्याच वेळेवर येते व पूर्वीसारखीच पंधरावीस मिनिटें टिकते, असें लिहिलें होतें. हें वाचून आम्हां सर्वांना अतिशय काळजी वाटली व होईल तितकें दोन्ही मुलांना ( सखू व नानू ) घेऊन आपण लौकर जावें, मुलांच्याशिवाय करमत नसेल, मुलें तेथें असलीं म्हणजे करमणूक होऊन बरें वाटेल असा विचार करून माझ्याकडे मिस् बेन्सन आल्याबरोबर मीं त्यांना म्हटलें, " स्वतःची प्रकृति बरी नाहीं. आज महिनाभर अगदीं राहिलेला आजार तेथें गेल्यावर पुन्हां सुरू

झाला आहे, तेव्हां माझ्याच्यानें आतां येथें रहावत नाहीं. माझ्यांत थोडी कसर राहिली तरी चिंता नाहीं. मीं पुढें औषध घेईन, पण आतां मला मुलांना घेऊन गेलेंच पाहिजे. कांहीं गोळया किंवा पुड्या विशेष खटपटी-शिवाय घेतां येण्यासारखें औषध असेल तर, व घेतलेंच पाहिजे असें असेल तर, मला द्या, नाहीं तर तूर्त कांहींच नको; माझें मन स्वस्थ नाहीं, म्हणून मी उद्यांच जाण्याचा बेत करितें."

ह्याप्रमाणें वन्सांचा व सासूबाईचा विचार घेऊन मी दुसरे दिवशीं उभयतां मुलांसह माथेरानास गेलें. तरी 'स्पॅझम' येण्याचा विकार जो पुन्हां सुरू झाला तो तसाच होता; पण माझ्या कल्पनेप्रमाणें सखू व नानू यांच्यापासून स्वतःला पुष्कळ करमणूक झाली. चि० नानू पांचसहा वर्षांचा लहान होता व सखूला आतां अकरा वर्षे पुरीं झालीं होतीं. ती अलेक्झांड्रा हायस्कूलमध्यें इंग्रजी तिसरी इयत्ता शिकत होती. तिचा मराठी सर्व अभ्यास घरीं मास्तर ठेवून करविला होता. ती फार बुद्धिमान्, हुषार आहे, तशीच शहाणी, देखणी आणि मर्यादशील आहे, अशी स्वतः तिची नेहमीं वाखाणणी करावयाची असे, व स्वतःला ती मनापासून फार आवडे. तिच्या गरीब स्वभावाबद्दल जेव्हां तेव्हां कैवार घ्यावयाचा. मी तिला रागें भरलें, तर मलाच उलट स्वतःकडून तिच्यासंबंधांत रागें भरून घ्यावें लागे. चि० नानूचा स्वभाव हूड, धीट, तापट पण पक्का निश्चयी व अभिमानी असून तो बुद्धीनें चलाख असल्यामुळें त्याला चवथ्या वर्षा-पासूनच लिहितांवाचतां येऊं लागलें. त्याप्रमाणें तो कविताही चांगल्या म्हणे. सर्वांपेक्षां गोष्टी ऐकण्याची व सांगण्याची त्याला फार गोडी असे. तो एकदां ऐकलेली गोष्ट बिनचूक सांगे. घरांत कोणीही मुली अगर मुलगे पाहुणे आले, कीं, याचा आपला गोष्टी सांगा म्हणून त्यांच्यामागें लकडा असावयाचाच. तसेंच, आपलें तें सर्व दुसऱ्यापेक्षां चांगलें आहे, अशी त्याची लहापणापासून समजूत व महत्त्वाकांक्षा असे. दुसऱ्या मुलांची चांगली आणि नवी वस्तु असली व आपली खरोखरीच वाईट, जुनी असली

तरी तो चिडावयाचा नाहीं. उलट, आपलें चांगलें व तुझें वाईट म्हणून दुसऱ्या मुलांना चिडवून खूप हंसावयाचा. या त्याच्या स्वभावाचें स्वतः-ला कौतुक वाटे.

रोज जेवण झाल्यावर दोन्ही वेळ तास दोन तास या मुलांना घेऊन बसणें होई. सखूचें इंग्रजी व मराठी वाचन घ्यावयाचें, तिला कांहीं वाक्यें विचारावयाचीं व तिच्याकडून गाणीं म्हणून घ्यावयाचीं. त्याप्रमाणेंच नानूकडूनहि कविता म्हणून घेऊन कांहीं गोष्टी सांगून घ्यावयाच्या. या प्रमाणें स्वतःचा बराच वेळ जाई. तिसऱ्या प्रहरचें फराळाचें व चहा सखूला करावयास सांगावयाचा. तिनेंच तें केलें आहे असें तिला विचारून फार छान केलें आहेस असें म्हणून तिची पाठ थोपटावयाची. ती " मोठेपणीं फार उत्तम स्वभावाची बायको होईल, तूं तिला सगळा दिवस बोलतेस, पण तीच तुला उद्यां शिकवूं लागेल, " असें स्वतः मला म्हणावयाचें. अशा रीतीनें दोन्ही मुलांकडून होणाऱ्या करमणुकींत स्वतःचा पुष्कळ वेळ जाई. बाकी, मुंबईहून कांहीं पुस्तकें आणलीं होतीं तीं भावोजी वाचून दाखवीत. अशा रीतीनें सुट्टीचे दिवस माथेरानास संपवून आम्ही मुंबईस परत आलों.

माथेरानास असेपर्यंत स्वतःच्या मनाला जी हुषारी दिसत होती ती मुंबईस आल्यावर हा आजार पुन्हां कशानें सुरू झाला याबद्दल डॉक्टरांना स्पष्ट विचारून घ्यावयाचें, नाहीं तर तो कशापासून आहे हें आपलें आपण आतां शोधून काढावयाचें असा स्वतःच्या मनाला नाद लागला. " माझ्या आजाराला तुम्ही नांव तरी काय देतां ? " असें दोघांतिघां डॉक्टरांना स्वतः निरनिराळ्या वेळीं विचारलें; पण त्यांनीं नीटसें उत्तर दिलें नाहीं. यावरून ते मुद्दाम नांव सांगत नाहींत, असें स्वतःला वाटलें. तेव्हां आतां कोणाला कांहीं न विचारतां आपला आजार काय आहे हें आपणच शोधून काढावयाचें, असा निश्चय करून मेडिकल कॉलेजांतून कांहीं पुस्तकें आणवून तीं सर्व वाचून पाहिलीं.

एके दिवशीं संध्याकाळीं मुद्दाम मला हांक मारून इकडच्या तिकडच्या कांहीं गोष्टी बोलतां बोलतां विष्णुपंत रानडे नांवाच्या आपल्या एका जुन्या मित्राची मला पुढील गोष्ट सांगितली. "सुमारें पसतीस वर्षांपूर्वीं विष्णुपंत रानडे म्हणून आमचे एक जुने मित्र येथेंच रहात असत. ते स्वभावानें फारच चांगले, शांत व उदार बुद्धीचे होते. तसेच ते शरीरानें उंच, धिप्पाड व बळकट होते. त्यांना व्यसन कसलेंही नसे. एक वेळ घोड्यावरून पडल्याचें नुसतें निमित्त होऊन त्यांना Angina-Pectoris नांवाचा आजार जडला. पुढें ते तीन वर्षें होते, पण कोणत्या वेळीं काय होईल याचा नेम नव्हता. याकरितां 'होईल तितकें घरांतल्या घरांत बिछान्यावर पडून वेळ काढावा; वाचनासारखी करमणूक थोडा वेळ केली तर चालेल, पण एकदम श्रमाचें काम कांहीं करावयाचें नाहीं,' असें डॉक्टरांनीं त्यांना सांगून ठेवलेलें असल्यामुळें ते बहुतेक घरांतच बसून असत, बाहेर कोठेंच जात नसत. जरूरीच्या वेळेशिवाय ते केव्हांही एकटे नसत. कोणीना कोणी तरी त्यांच्याजवळ असावयाचेंच. इतके सर्व रीतीनें ते जपत होते, तरी शेवटीं बहिर्दिशेला गेले असतांना तेथेंच त्यांचा अंत झाला. अशा रीतीनें मनुष्याचें केव्हां काय होतें याचा नेम नाहीं."

तें ऐकून मला अगदीं चमत्कारिक वाटलें व मीं म्हटलें, "पण ही गोष्ट कशाकरितां सांगितली? आपल्या आजाराशीं या गोष्टीचा काय संबंध आहे?"

तेव्हां स्वतः म्हटलें "कांहीं तरी वेड्यासारखा तर्क घेऊन विचारीत बसतेस. संबंध कसले आहेत? बोलतां बोलतां आठवलेली गोष्ट सहज एकमेकांजवळ सांगत नाहीं का? तर म्हणे असेंच कां सांगितलें? आठवलेली गोष्ट सहज ऐकलेली असावी म्हणून तुला सांगितली. दिवसेंदिवस तुझा हा कांक्षेखोर स्वभाव वाढत चालल्यानें तुझ्याशीं बोलण्याची पंचाईत झाली आहे."

मीं म्हटलें, "मी सगळ्याच का गोष्टींत कांक्षा घेतें? आजपर्यंत स्वतःला दुखणीं कां कधीं आलीं नाहींत; वर्षा दोन वर्षांनीं जिवावरचें असें दुखणें

जातच आहे. असें असतांना याच वेळच्या दुखण्याबद्दल अशी काय समजूत करून घेतली आहे, कोण जाणे ! प्रत्येक गोष्टींत निराशेचे उद्गार व उदासपणाची वागणूक पाहून बरें कसें वाटावें ? माझ्या बरें वाटण्याचें एक राहूं द्यावें, पण रात्रंदिवस हाच विचार बाळगल्यानें त्याचा परिणाम स्वतःच्या प्रकृतीवर होत नाहीं का ? पहिल्या प्लेगमध्यें ह्याहीपेक्षां काळजीचा आजार होता. त्या वेळेस तर माझा जीव अगदीं भिऊन गेला होता. दोन महिने अगदीं अन्नद्वेष झाला होता व झोंप नाहींशी झाली होती. तरीसुद्धां महाबळेश्वरीं गेल्याबरोबर तेथील हवेनें एक आठवड्यांत किती तरी बरें वाटलें. त्यापेक्षां आतांचा आजार कांहीं जास्त नाहीं. कांहीं तरी मनानें घेतलें आहे, त्यामुळें डॉक्टरचें सांगणेंही खरें वाटत नाहीं, त्याला काय करावें ? ”

हें बोलणें स्वस्थपणें ऐकून घेतलें व म्हटलें, “ तसें कांहीं नाहीं, मनानें कसलें घेतलें आहे ? आज दुपारीं पुस्तकांत कांहीं आजारासंबंधानें वाचीत होतों त्यावरून ही गोट आठवली, ती तुला सांगितली. आज सकाळीं मला वर्तमानपत्रें पहावयास झालें नाहीं. त्यांत विशेष काय आहे तें पाहून ठेव व जेवतांना मला सांग. ”

हें सांगण्याचा हेतु काय होता तो मी समजलें, व अशा गोष्टींची चर्चा अधिक नसलेलीच बरी असें मनांत येऊन स्वतः सांगितल्याप्रमाणें मी वर्तमानपत्रें हातांत घेऊन दुसऱ्या दिवाणखान्यांत गेलें.

दुसरे दिवशीं दुपारीं डॉक्टर राव व नायक आले. त्यांना स्वतः विचारिलें, तुम्हीं आजपर्यंत दोघेतिघेजण जीं जीं औषधें देत आहां तीं मी घेत आहें, पण माझा आजार काय आहे याची परीक्षा निदान नीट करून औषधाची योजना केली आहेना? तुम्हांला या आजाराचें नांव सांगावयाचें नसेल तर माझा कांहीं तसा आग्रह नाहीं; पण औषध जें पोटांत घ्यावयाचें तें निदान त्याच रोगावर आहे इतकें जरी असलें तरी पुरें. औषधाचा गुण येईल कीं नाहीं याचा कोण विचार करीत बसलें आहे ? व त्या गोष्टी

कोणाच्या हातांत आहेत ? तुमच्या समजुतीप्रमाणें तुम्हीं रोगाचें निदान नीट करून औषधाची योजना नीट करावी, आणि तुम्ही लिहून द्याल तें आम्हीं मुकाट्यानें घ्यावें, एवढेंच काय तें तुमच्या आणि आमच्या हातांत आहे. औषध घेतलें नाहीं, हयगय केली, असा या जवळच्या मंडळीचा दोष येऊं नये म्हणून औषध घेतों, दुसरें काय ? ”

इतकें म्हटलें तरी डॉक्टर राव कांहीं बोलले नाहींत. स्वस्थ बसले. तें पाहून स्वतः म्हटलें, “ तुम्हीं नांव सांगत नसलां तर मी तुम्हांला नांव सांगतों. माझ्या आजाराचें नांव Angina-Pectoris असें नाहीं काय ? याबद्दल गेले पांचसहा दिवस मीं बरींच पुस्तकें वाचून पाहिलीं, आणि त्यांत सांगितलेलीं लक्षणें मला होणाऱ्या विकाराशीं ताडून पाहिलीं, त्यावरून माझ्या आजाराचें हेंच नांव आहे, अशी माझी खात्री झाली आहे. हा विकार माझ्या एका मित्राला झाला होता. ”

हें ऐकून डॉक्टर राव एकदोन मिनिटें गोंधळल्यासारखे झाले. पण तें बाहेर न दाखवितां लागलीच म्हणाले, “ आपण जीं लक्षणें ताडून पाहिलीं, त्यांवरून आपल्याला Angina-Pectoris वाटतें, तें बरोबर आहे. असें जरी आपणास वाटत आहे, तरी तें खरें नसून आपल्याला कल्पनेनें त्या आजाराचा भास होत आहे. याच आजाराला Pseudo Angina-Pectoris असें खरें नांव आहे. हा आजार रोग्याला नुसत्या कल्पनेनें हुबेहुब खऱ्या आजारासारखा भासतो व सर्व लक्षणें पटतात; तरी पण तें कांहीं खरें नसतें. अशा तऱ्हेचे पुष्कळ रोग आहेत, कीं जे खरे नसून रोग्याच्या मनावर त्यांचा बराच परिणाम होतो. त्यांपैकींच हा एक आहे व म्हणूनच ह्याला वर सांगितलेलें Pseudo Angina- Pectoris असें म्हणतात. ”

असें त्यांनीं म्हटलेलें ऐकून स्वतः म्हटलें, “ यांत कांहीं तरी Pseudo आहे खरें. आजार तरी Pseudo आहे, नाहीं तर माझी समजूत करण्याचा तुमचा प्रयत्न तरी Pseudo आहे असेंच म्हणावें लागतें. ”

## भाग शेवटचा.

# शेवटचें वर्ष—लाहोरची कॉंग्रेस.

सन १९०० या वर्षी प्रकृति चांगली नसल्यामुळें कॉंग्रेसला जाण्याला डॉक्टर परवानगी देतात कीं नाहीं, याबद्दल धाक वाटत होता. तथापि स्वतःच्या मनाचा कॉंग्रेसला जाण्याकडे सर्वस्वीं ओढा होता. जरी या वेळीं आजार होता तरी दरसालप्रमाणें या वर्षींहि सोशल कॉन्फरन्सचे रिपोर्ट मागाविण्याचें, लांबलांब पत्रें लिहिण्याचें, व आलेलीं पत्रें वाचून त्यांचीं उत्तरें पाठविण्याचें काम दररोज नित्यनियमाप्रमाणें चाललेंच होतें. त्यांत अंतर पडत नसे. निरनिराळया संस्थांकडून आलेल्या रिपोर्टांचा सारांश काढण्याचें काम सुरू होतेंच. शेवटीं शेवटीं हें काम करण्यांत कित्येक तास जाऊं लागले. कॉन्फरन्सपुढें वाचण्याकरितां वसिष्ठ आणि विश्वामित्र हा लेख लिहिण्यांत पांचसहा दिवस नेटानें बसावें लागलें. कामाशिवाय उरलेल्या वेळांत लाहोरला जाण्यासंबंधानें तयारीचे बेत व गोष्टी बोलावयाच्या. जाण्याची वेळ दोनतीन दिवसांवर आली. "मी यंदां बरोबर येणार आहें, स्वतःची प्रकृति बरी नाहीं, अशा वेळीं एकटें जाणें झालें तर मला अगदींच चैन पडणार नाहीं. मी आपली बरोबर येणार," असें जवळ एकदां म्हणून ठेवावयाचें व मग आपली तयारी करून यावेळीं बरोबर जावयाचेंच असा मीं बेत केला होता; पण "तुला यंदां माझ्याबरोबर यावयाचें आहे," असें, मीं गोष्ट काढण्याच्या पूर्वींच स्वतः आपण होऊन म्हटलें. तें ऐकून माझा जीव अगदीं खालीं पडला, व मीं मोठ्या उत्सुकतेनें आपली तयारी केली. तशीच स्वतःकरितां लागणाऱ्या सर्व वस्तू व कपडे नीट आठवणीनें घेऊन बांधाबांध केली. त्यावेळीं सासूबाई, वन्सं, सौ. गंगाबाई, सौ. लक्ष्मीबाई, आबासाहेब व त्यांचीं मुलें मुंबईसच असल्यामुळें आम्ही लाहो-

रला जातेवेळीं चि. सखू व नानू यांना बरोबर न घेतां फक्त दोघांनींच जावें, असें ठरलें होतें; पण पुन्हां काय वाटलें कोण जाणें, रात्रीं निजते वेळीं मला विचारलें, " सर्व तयारी करून घेतली आहेसना? सखूला बरोबर घेण्याचा माझा विचार झाला आहे. तिचे कपडे बांधून घे. उद्यां पुण्याहून मंडळी येतील त्यांना ' सीट्स ' रिझर्व्ह करावयास सांगेन. तिकडे थंडी फार असते, गरम पांघरुणें जास्त घे. सखूचे गरम कपडे अधिक घे."

मीं म्हटलें, " नानूला येथें ठेवून नुसत्या सखूला बरोबर न्यावयाची हें बरें कसें दिसेल? नेलें तर दोघांनाही न्यावें. नाहीं तर दोघांनाही येथें ठेवावें, म्हणजे कोणाचें कांहीं नाहीं."

तेव्हां सांगितलें " या पंचायतींत तूं पडूं नकोस. मी सांगतों तसें कर. जी गोष्ट करावयाचीच आहे तिची वाटाघाट करीत बसूं नये. सांगितलें तसें करावें. नानूलाहि बरोबर घेतला असता पण तिकडे थंडी फार आहे. बरोबर दोनच नोकर घेत आहों. तो लहान असल्यामुळें एक नोकर त्याच्याकडेच असेल. शिवाय, तुझाही बराच वेळ त्याच्याकडे जाईल. त्यामुळें तुला सर्व व्यवस्था व खटपट एकटीलाच करावी लागेल, व माझ्या आजारामुळें तें सर्व जमणार नाहीं. याकरितां त्याला येथें ठेवावा. सखूला आतां पुष्कळ समजूं लागलें आहे, ती तुला त्रास देणार नाहीं. तिला बरोबर घेतली तर तिची तुला पुष्कळ मदत व सोबत होईल. म्हणून तिला येथें ठेवण्यापेक्षां बरोबर न्यावी असें मी म्हणतों. तिची तयारी कर."

मीं बरें म्हटलें व सकाळीं उठून तिची सर्व तयारी केली. सखूला हें कळल्यावर तिला अतिशय आनंद झाला; पण नानूला एकटा येथें ठेवून जाण्याचें मनांत आल्यावर मला अतिशय वाईट वाटलें. मीं या झालेल्या बेताबद्दल बाहेर कांहींच बोललें नाहीं, व निघेपर्यंत बोलावयाचें नाहीं असाच माझा निश्चय होता. आम्ही फक्त दोघेंजण जाणार; मुलांना बरोबर नेत नाहीं; हेंच समळयांना कळलें असल्यामुळें जीं तीं माणसें सखूला चिडवीत; व त्यामुळें ती घटकेघटकेला मुळुमुळूं रडत असे, व जेव्हां जेव्हां संधि मिळेल

तेव्हां जवळ जाऊन " मला बरोबर न्यावी," म्हणून आर्जव करी. मलाही तिला ठेवण्याचें जिवावर आलें होतें; पण एकट्या नानूला कसा ठेवूं असें वाटून त्याच्याकरितां तिलाहि ठेवण्यास तयार झालें होतें. नानू लहान असल्यामुळें त्याला हें कांहीं फारसें समजत नव्हतें. घरांतील मंडळी चिडवूं लागल्यावर "मी तुझ्याबरोबर येतों," असें तोहि मला एकदांदोनदां म्हणाला; पण एका लहानशा पाकिटांत पांच रुपये घालून "हे तुला चित्रें घेण्याकरितां पैसे घे. हें पाकिट तूं आपल्याजवळ ठेव. कोणाला देऊं नको," असें मीं म्हटल्याबरोबर तों आनंदाने नाचूं उडूं लागला.

पुण्याहून कॉंग्रेसला जाण्याकरितां नगरकर,गोखले,भिडे वगैरे पांचसहाजण मंडळी सकाळच्या गाडीनें आली. दुपारीं आमच्या'सीट्स'रिझर्व्ह करण्याकरितां भावोजींना स्वतःसांगितलें. त्याप्रमाणें ते स्टेशनवर जाऊन सीट्स रिझर्व्ह करून आले.व उद्यां संध्याकाळीं निघावयाचें असें त्यांनीं सांगितलें. सकाळपासून रात्रीं निजेपर्यंत स्वतःचा तो सर्व दिवस एकसारखें बसून काम करण्यांत व पुण्याहून आलेल्या मंडळीशीं बोलण्यांत गेला. दुपारीं दहापांच मिनिटें पडून विश्रांतीसुद्धां घेतली नाही. त्यामुळें त्या रात्रीं नित्याची ' स्पॅझम ' जरा जोरानें आली व जास्त वेळ टिकली. म्हणून रोजच्यापेक्षां आज थकवाहि जास्त आला.अंथरुणावर पडून आज तास झाला.दीडतास झाला तरीहि झोंप लागेना. गेल्या सर्व आठवडाभर लिहिण्याचें काम जास्त पडल्यामुळें डोक्याला त्रास झाल्यानेंच झोंप येत नाहीं असें माझ्या मनांत येऊन मी उठलें व खालीं जाऊन लोणी घेतलें आणि येतां येतां पहारेवाल्याला सांगितलें कीं, बागेतून एरंडाचीं कोवळीं पानें पांचसात तोडून आण. त्याप्रमाणें त्यानें पानें आणून दिल्यावर मीं वर जाऊन स्वतःच्या डोक्याला व कानशिलाला बराच वेळ लोणी चोळून एरंडाचीं पानें टाळूवर ठेविलीं; आणि कोणीकडून तरी झोंप लागावी म्हणून पायांला लोणी चोळीत बसलें. स्वतःही अगदीं स्वस्थ पडून झोंप घेण्याचा प्रयत्न केला पण झोंप लागेना. एकाचा ठोका पडला. झोंप लागण्याचें

एकीकडेच राहून छातींत कळा येऊं लागल्या. इतका वेळ झोंप लागली नाहीं तरी अंथरुणांत स्वस्थ पडून शरीराला नुसती विश्रांति मिळत होती तीहि आतां मिळेनाशी झाली.छातींत कळा येऊं लागल्यानें आडवें निजण्याची सोय नव्हती. पलंगावरच उठून बसून व एक तक्क्या घेऊन त्याला टेंकून बसावें लागलें. त्याप्रमाणें उठून बसल्यावर मी खालीं गेलें व चूल पेटवून थोडेंसें पाणी कढत करून रबराच्या पिशवींत ओतून घेतलें आणि बजाबाला उठवून सांगितलें, की, " तूं आणखी पाणी तापवून दुसरी पिशवी भरून घेऊन ये. " मग मी माडीवर गेलें, व दुखत असलेल्या भागाच्या पाठीकडे होऊन पाण्याची पिशवी दिली,आणि छातीवर मोहरीची पट्टी घातली.तरी कांहीं केल्यानें कळा बंद होईनात.सकाळीं सहा वाजतां कळा बंद झाल्या, व सात साडेसातपर्यंत डोळा लागला.

कळा बंद होऊन डोळा लागल्याबरोबरच मीं डॉक्टर भालचंद्र यांना बोलावणें पाठविलें होतें. नगरकर,गोखले वगैरे मंडळींस ही हकीकत सांगितली. आतां लाहोरला जाण्याचें कसें करावें,अशा पंचायतींत आम्ही पडलों. साडेसात वाजतां स्वतःची झोंप झाली, व प्रातर्विधि उरकून आठ वाजतां दिवाणखान्यांत येणें झालें, तेव्हां " रात्रीं छातींत दुखलें काय ? झोंप आली नाहीं काय ?" असें पुण्याच्या मंडळींनीं विचारतांच सांगितलें कीं, "छे हो, मला असें नेहमीं होतें, त्यांत काय एवढें मनावर घ्यावयाचें ! मला तसाच थोडासा विकार जडला आहे, त्यामुळें असें कधीं कधीं होतें."

इतकें बोलणें होत आहे तोंच डॉक्टर भालचंद्र आले. व स्वतःची प्रकृति पाहून व हकीकत ऐकून म्हणाले " कांहीं झालें तरी एवढा लांबचा प्रवास करण्याला माझी सल्ला बिलकूल नाहीं; इतकेंच नाहीं, पण आपण यंदा जाऊं नयेच, असें माझें निक्षून सांगणें आहे. "

हें ऐकून स्वतःला अतिशय वाईट वाटलें. डॉक्टर गेल्यावर किती वेळ तरी कोणाशीं कांहींएक न बोलतां अगदीं सचिंत बसणें झालें. मग गोखल्यांकडे पाहून म्हटलें, "जाण्याचें कसें करावयाचें तें ठरवा. "

तेव्हां गोखले म्हणाले, "आम्हांला प्रकृतीसंबंधानें काय बोलतां येणार? डॉक्टर भाटवडेकर म्हणतात त्याप्रमाणेंच करावें, हें बरें. काय करावयाचें तें मला सांगितलें तर मी जाऊन आपल्या सांगण्याप्रमाणें सर्व करीन."

तेव्हां म्हटलें " तुम्ही करालहो. आतां हें सर्व तुमच्यावरच पडणार आहे; पण या वेळीं मीं येऊं नये असेंच तुमचें सगळ्यांचें मत असेल तर मला एक टेलिग्राम तरी पुढें पाठविला पाहिजे."

यंदां जाऊं नये हेंच बरें, असें सगळ्यांनीं म्हटल्यावर दौत, लेखणी व कागद घेऊन टेलिग्राम लिहिला व तो मंडळींना वाचून दाखवून 'अठरा वर्षांनीं माझ्या जाण्यामध्यें खंड पडत आहे,' असें बोलतांना गळा अगदीं दाटून आला व डोळ्यांतून एकसारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या.

झालें. याप्रमाणें लाहोरला जाण्याचा बेत रहित झाला. कॉन्फरन्समध्यें वाचण्याकरितां जो लेख लिहिला होता, तो गोखल्यांच्या बरोबर देऊन चि. आबासाहेब यांना मंडळीच्या बरोबर लाहोरास पाठविलें.

त्याच दिवशीं संध्याकाळीं सर्व मंडळी निघून गेल्यावर दुसरे दिवशीं आम्ही लोणावळ्यास निघून आलों.लोणावळ्यास आल्यावर पुण्याची मित्र-मंडळी भेटावयास आली. त्यांनीं स्वतःला पुण्यास राहून औषध घेण्याबद्दल पुष्कळ आग्रह केला, तेव्हां सांगितलें " मी तूर्त मुंबईस राहूनच औषध घेऊन पहाणार आहें. तेथें बरें वाटूं लागल्यावर मग पुण्यास यावयाचा विचार करीन."

पुढें तीनचार दिवसांनीं लाहोरास कॉंग्रेसला गेलेली मंडळी परत आली. त्यांनीं कॉंग्रेसची व कॉन्फरन्सची सर्व हकीकत सांगितली व दुसरे दिवशीं ती मंडळी पुण्यास निघून गेली. ती हकीकत ऐकून मनावरचा थोडा भार कमी झाल्यासारखें होऊन पुष्कळ बरें वाटलेंसें दिसलें.

नंतर या सभेची हकीकत टाइम्स, ॲडव्होकेट, सोशल रिफॉर्मर, पंजाबी वगैरे पत्रांत साग्र दिली होती. त्यांतील गोखले व चंदावरकर यांचीं भाषणें वाचून, लागलेंच " आतां यापुढें हा भार घेण्यास तुम्ही दोघेही योग्य

आम्हांत हें पाहून मला फार संतोष वाटला; यासंबंधानें मला वाटत असलेली काळजी आतां कमी झाली," वगैरे मजकुराचीं आपल्या हातानें दोघांना दोन पत्रें लिहिलीं.

एकंदर ह्या खेपेला आमचा लोणावळ्याला मुक्काम काय तो दहा दिवस होता. त्या अवधींत स्वतःच्या प्रकृतीचें मान चांगलें तर नव्हतेंच, पण दिवसेंदिवस बारीकसारीक विकार जास्तच वाढत चालला. तशीच मनाची उदासीनता तर विलक्षण झाली होती. माझ्याशीं किंवा वन्संशीं बोलावयाचें म्हणजे अमुक एक खर्च पुष्कळ आहेत ते कमी करा, बाग खंडानें लावा, गुरें कमी करा, मुंबईचा पसारा व जागजागच्या शेतीचा पसारा होईल तितका आटोपता घ्या, आतां मी सहा महिन्यांची रजा घेणार आहें, व ती संपली म्हणजे तिला जोडूनच पेन्शन घेणार आहें; तेव्हां मुंबईस परत लवकर येणें होईलसें दिसत नाहीं. म्हणून मुंबईस असलेलें सामान पुण्यास नेऊन टाकावें, असें माझें म्हणणें आहे. अशा तऱ्हेचें निरवानिरवीचें पण बाहेरून अगदीं सहज सोईच्या गोष्टी सांगत असल्यासारखें बोलावयाचें. हे वेळोवेळचे उद्गार ऐकून स्वतःची विरक्त झालेली वृत्ति पाहून मला अतिशय वाईट वाटे व दुःख होई; तरी पण तें बाहेर दाखवावयाचें नाहीं, अशा निश्चयानें दाबून ठेवावें लागे.

सुट्टी संपतांच आम्ही लोणावळ्याहून मुंबईस परत गेलों, व आठ तारखेला सहा महिन्यांची रजा देण्याबद्दल स्वतः हायकोर्टाला अर्ज लिहिला. तेव्हां मला मुद्दाम वर बोलावून सांगितलें, " आज मीं सहा महिन्यांच्या रजेचा अर्ज लिहिला आहे व रजा संपल्यावर लागलीच पेन्शन घेणार आहें. तेव्हां पेन्शनशिवाय सातआठशें रुपयांपर्यंत आपली एकंदर आयात राहील. त्यांत तुला पुण्याचा खर्च व येथला आपला खर्च चालवितां येईलना ! "

मीं म्हटलें, " मुंबईत घर खरेदी घेईपर्यंत जरा अडचण आहे. तेथें घरभाड्यालाच तीनशें साडेतीनशें रुपये दरमहा लागतात. करितां तूर्त पुण्याचें खटलें मोडून आपण सर्वच एके ठिकाणीं राहिलों तर सगळें नीट होईल."

तेव्हां स्वतः सांगितलें "तसें नाहीं. पुण्यांतील घर मोडावयाचें नाहीं व तेथील माणसेंही हालवावयाचीं नाहींत. त्यांच्या आजपर्यंतच्या संवयीप्रमाणें कथाकीर्तन, पुराण वगैरे सर्व गोष्टी तेथेंच त्यांच्या मनासारख्या होतील आणि त्यांना अधिक बरें वाटेल. मला आतां मुंबईसच रहावयाचें आहे. तेव्हां दोन्ही खर्च एवढ्यांत भागतीलना, एवढेंच विचारण्याकरितां तुला बोलाविलें."

मीं म्हटलें "भागतील, अगदीं भागतील, कां नाहीं भागणार? अमुक एका गोष्टीवांचून आमचें अडतें आहे अशी आम्हांला संवयच नाहीं. विनाकारण कांहीं खर्च आहेत ते कमी करतां येतील. सदोदित चालेल तेंच करावें, असें जर नेहमींचें म्हणणें आहे व तसेंच आम्हांला वळण लाविलें आहे, तर थोडे कमी पैसे असले म्हणून मला कांहीं तें जड जाणार नाहीं. आहे ही रक्कम कांहीं कमी नाहीं. तरी पण एखादें घर होईल तितकें लवकर घेतलें तर बरें होईल. येथें घरभाड्याचा खर्च फार मोठा येतो."

हें ऐकून स्वतः म्हटलें "घर घेण्याच्या तर मी विचारांत आहेंच. जमेल तेव्हां खरें. आजपर्यंत पांचसहा घरें पाहिलीं तीं कांहीं चाईट नव्हतीं. तुला जुनें घर आवडत नाहीं. सोईवार नवें घर चांगल्या वस्तींत मिळणें व तें तुम्हां सगळ्यांना पसंत पडणें, ह्या दोन्ही गोष्टी एकदम जमून येतील, तेव्हां घर घेण्याचा योग येईल." असें बोलणें झाल्यावर रजेचा अर्ज लिहिलेला पाठवून दिला.

दुसरे दिवशीं चीफ जास्टिसचें रजा मंजूर केल्याबद्दल पत्र आलें. तें वाचून पाहिल्यावर मला सांगितलें "आतां आपल्या तैनातींत असलेले शिपाई व चोपदार यांना कांहीं देऊन आज कोर्टांत जाऊन हजर होण्यास सांग. रजा घेतल्यानंतर सरकारी शिपाई आपल्या तैनातीला नको आहेत."

मीं "बरें आहे," म्हणून लागलीच शिपायांना वर बोलाविलें, व त्यांना कांहीं इनाम देऊन सांगितलें, "आज तुम्हां चौघांना अकरा वाजतां कोर्टांत जाऊन हजर होण्यास सांगितलें आहे."

हें ऐकतांच त्यांचीं बिचाऱ्यांचीं तोंडें अगदीं उतरून गेलीं. चोपदार तर अगदीं गहिंवरला, व मला म्हणाला "बाईसाहेब, साहेबांनीं रजा घेतली, म्हणून काय झालें? आम्हांपैकीं दोघांना कोर्टांत पाठवून दिलें म्हणजे बाकींचे दोघे आम्ही तैनातीला राहूं. रजा घेतली तरी शिपाई तैनातीला ठेवण्याची चाल आहे. फक्त साहेबांनीं जरा चिठ्ठी पाठविली, म्हणजे झालें." मीं म्हटलें "कोर्टाची असेल पण आमची तशी चाल नाहीं. म्हणून तुम्ही याबद्दल जवळ कांहीं विचारूं नका. सांगितल्याप्रमाणें आज कोर्टांत हजर व्हा. तितकी गरज वाटली तर पुन: तुम्हांला मागवून घेऊं."

हें ऐकल्यावर ते बिचारे अधिक काय बोलणार? अगदीं सद्गदित होऊन माझ्या पायां पडले आणि तसेच थोरल्या दिवाणखान्याकडे स्वतःच्या पायां पडण्यास गेले. ते एकामागून एक स्वतःच्या पायांवर डोकें ठेवून पायां पडले. सगळ्यांच्या मागून चोपदार पायां पडतांना मात्र त्याला हुंदका आवरेनासा होऊन तो रडूं लागला. हा चोपदार फार चांगला माणूस असे. नेहमीं तो स्वतःच्याच तैनातींत असून त्याची स्वतःवर भक्ति असे. तो म्हणाला "आज आपल्या हुकुमाप्रमाणें कोर्टांत हजर होतों; पण आम्हांला आपल्या पायांपाशीं लौकर मागवून घ्यावें."

इतकें म्हटल्यावर त्याच्यानें अधिक बोलवेना. तो दुसरीकडे तोंड वळवून रडूं लागला. हें पाहून स्वतःचें अंतःकरण सद्गदित झालेलें दिसलें. नुसतें मीं निश्चल दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें मात्र, पण बोलणें कांहीं झालें नाहीं. स्वतःच्या कोचाजवळच मी उभी होतें. तेथून लवकर निघून जा म्हणून हळूच मीं चोपदाराला व शिपायांना खूण केलेली पाहून ते लोक अगदीं जड पावलानें आमच्याकडे वळून वळून पहात निघून गेले. या वेळीं माझा गळा अगदीं दाटून आला व तेथें उभें रहावेना ह्मणून मी एकदम पलीकडल्या ग्यालरींत गेलें व इतका वेळ जुलमानें आंवरून धरलेल्या मनाला प्रवाहाच्या रूपानें मोकळीक देऊन जरा हलकें केलें. मग डोळ्यांला बरेंचसें गार पाणी लावून व थोडा वेळ इकडे तिकडे करून दोघां मुलांबरोबर बोलत त्यांना व शांतेला घेऊन दिवाणखान्यांत आलें.

या वेळीं स्वतःचा चेहरा अगदीं गंभीर होऊन मन कांहीं विचारांत गढल्यासारखें दिसलें. मी शांतेला घेऊन हंसत व बोलत गेलेली पाहून तिला घेण्याकरितां म्हणून स्वतः हात पुढें केले व तिला माझ्याजवळून घेतली आणि मला म्हटलें, " तूं बैस, येथेंच कोचावर बैस. अशी उभी कां ? "

तें ऐकतांच मी कोचावर बसलें. पण माझ्या मनांत आलें, कीं ज्या गोष्टीला मी जपत होतें, तीच वेळ आली. आतां मन जरा घट्ट केलें पाहिजे. स्वतः मुलांशीं जरा बोलल्यासारखें करून माझ्याकडे पाहिलें व म्हटलें " हें पहा, आज आपण शिपाई परत पाठविले आहेत. तेव्हां तुमच्याकरितां आठनऊ रुपयांपर्यंत एखादा शिपाई नोकरीवर ठेवा."

मीं म्हटलें, "शिपाई कशाला हवा ? गडी, ब्राह्मण, कोचमन, पहारे-वाला वगैरे सर्व नोकर आहेतच. मग आणखी शिपाई वेगळा कशाला हवा ? " तेव्हां सांगितलें, " कशाला हवा असें नाहीं. आमचें शिपाया-वांचून कधींच अडत नाहीं व त्याची आम्हांला गरजही नाहीं; पण तुम्हांला लहानपणापासून शिपाई बरोबर असल्याशिवाय कोठें जाण्या-येण्याची संवय नाहीं. शिवाय, मुलांनाही शिपायांचीच अधिक संवय असल्यामुळें आतां त्यांना चुकल्याचुकल्यासारखें होईल. म्हणून म्हणतों एखादा शिपाई ठेवला म्हणजे सगळ्यांचीच सोय होईल. खर्च होतो म्हणून संकोच करण्याचें कांहीं कारण नाहीं."

हें बोलतांना बोलणें जरा ओढत व आवाज हळू झाल्यासारखें मला वाटलें. तेव्हां मीं धीराच्या आवाजानें थोडें हंसून म्हटलें, " वा ! स्वतःला शिपायाची गरज नाहीं व त्यावांचून अडत नाहीं, मग आम-च्यासाठीं आणि मुलांसाठीं मुद्दाम वेगळा मनुष्य ठेवावयाचा कीं काय ? आमचेंसुद्धां शिपायावांचून कांहीं अडावयाचें नाहीं. गाडींतून जातांना शिपाई बरोबर हवाच असें नाहीं, त्याबद्दल इतकें कांहीं वाटावयाला नको. सहा महिन्यांची अडचण आहे; मग पुन्हां शिपाई येतीलच."

हे मी बोलत असतांना स्वतःची वृत्ति आंतून सद्गदित झाली होती; पण तें माझ्या लक्षांत येऊं नये म्हणून बळेंच कांहीं तरी शांतेशीं बोलणें चाललें होतें. मला तरी तेंच पाहिजे होतें. स्वतःकडे माझें लक्ष नाहीं असें दाखवून मीही शांतेची चेष्टा करून हंसूं लागलें. जरी आम्ही दोघेंही बाहेरून उसना धीर आणून दुखण्याची भीति नाहीं, आपल्याला कांहीं इतकी काळजी वाटत नाहीं, असें परस्परांना भासविण्याची शिकस्त करीत होतों, तरी अंतःकरणाची स्थिति लपली जात नव्हती. अशा रीतीनें अर्धा पाऊण तास गेल्यावर जेवणाची वेळ झाली म्हणून स्वतः स्नानाकरितां उठणें झालें व मीही मुलांना घेऊन खालीं गेलें. स्नान झाल्यावर जेवतांना वन्सं म्हणाल्या, "रजा मंजूर झालीना? बरें झालें. आतां विश्रांति मिळेल व प्रकृतीला बरें वाटेल. मात्र या डॉक्टरांच्या औषधापेक्षां वैद्याचें औषध सुरू करावें, हें बरें." तेव्हां स्वतः म्हटलें "तें असो. वैद्य काय व डॉक्टर काय? कांहीं तरी चाललें आहे झालें. पण आतां येथून सर्व पुण्याला पाठवा. गाडी, घोडा, गुरें वगैरेची तूर्त पायरस्त्यानें पुण्याला रवानगी करून द्या, म्हणजे पुष्कळ गोंधळ कमी होईल. तसेंच बरेंचसें सामान पायरस्त्यानेंच पाठवावें, म्हणजे सामानाच्या गाड्या व जनावरें बरोबर जातील." वगैरे बोलणें या दिवशींच झालें.

पुढें दोनतीन दिवसांनीं बंगल्याच्या मालकाला स्वतः एक पत्र लिहिलें, कीं, मीं सहा महिन्यांची रजा घेतली आहे व त्या अवधींत मला बाहेरगांवीं जावयाचें आहे, म्हणून या महिनाअखेर बंगला सोडण्याचा माझा विचार आहे. असें पत्र वाचून बंगल्याच्या मालकांनीं to be let म्हणून दुसरे दिवशींच पाटी लाविली. तें पाहून स्वतःशिवाय आम्हां सर्वांना बरें वाटलें नाहीं. आम्ही घरांत रहात आहों तोंपर्यंत तरी पाटी लावावयाची नव्हती. कारण, या महिनाअखेर आंम्ही भाडें भरीतच आहों. आम्ही गेल्यावर वाटेल तर पाटी लावावयाची होती, असें माझ्या मनांत येऊन व मला अपमान वाटून राग आला. म्हणून आम्ही दुपारीं जेवण झाल्यावर बोलत

बसलों, तेव्हां घरवाल्यानें आज बंगल्याला पाटी लाविली आहे असें मीं सांगितलें. तें ऐकून स्वतः म्हटलें, "मग त्यांत वाईट काय झालें? तुम्हांला घर सोडावयाचेंच आहे, मग पाटी लागली म्हणून काय कमीपणा वाटला? त्यांना भाडेकरी लवकर मिळावयास नको का? म्हणून त्यांनीं पाटी लाविली. हा त्यांच्या हुषारीचा भाग आहे. त्यांत तुमचें काय गेलें?"

हें ऐकून मला चमत्कारिक वाटलें, वाईट वाटलें, व मी कांहींच बोललें नाहीं. पण वन्सं म्हणाल्या "मग इतक्यांत घर सोडण्याचें घरवाल्याला पत्रच कां लिहिलें बरें? रजा संपून परत आल्यावर पेन्शन घेण्याचा विचार ठरला म्हणजे मग वाटेल तर हा बंगला सोडावा? पण आतांच सोडून काय करावयाचें आहे! आपण गांवाला गेलों तरी हें सामान-सुमान सहा महिन्यांकरितां कोठें न्यावयाचें आहे? सहा महिने केव्हांच संपतील आणि एकदां हें घर दुसऱ्यानें घेतलें म्हणजे पुनः असें घर मिळण्यास फार पंचाईत पडेल."

पहिल्यानें स्वतः एकदोनदां उत्तरें दिलीं नाहींत. पुनः पुनः आम्हीं हें घर न सोडण्याबद्दल गोष्ट काढली, तेव्हां जरा त्रासून म्हटलें "मनुष्यानें बोलूं नये म्हणून नेम केला तर तुम्ही त्रास देऊन बोलावयास लावतां. समजत असून वेड कां पांघरावें? मी जें सांगेन तें मुकाट्यानें करावयाचें टाकून उलट कांहीं तरी विचारीत बसतां, याचा अर्थ काय? माझ्या प्रकृतीचें मान तुम्हांला दिसत नाहीं का? ही रजा संपून मी परत येईन असें तुम्हांला वाटतें काय!"

मीं म्हटलें "हें काय मनांत भरून घेतलें आहे कोण जाणें! १८९७ सालीं याहीपेक्षां प्रकृति वाईट होती तरी महाबळेश्वरीं गेल्यावर सातआठ दिवसांत बरें वाटूं लागलें. त्यावेळीं प्रकृति अगदीं उत्तम झाली; तसेंच महाबळेश्वरीं गेलों म्हणजे यावेळींही बरें वाटेल. हेंच मनांत भरवून घेतल्यानें या विचाराचा परिणाम प्रकृतीवर होणार नाहीं का? या कामांत डॉ. राव व भाटवडेकर यांचेंसुद्धां बोलणें खरें वाटत नाहीं, तेथें काय करावें?"

हें ऐकून कांहींएक उत्तर न देतां माडीवर जाणें झालें. मी आणि वर्न्स तशाच बोलत बसलों. स्वतःची समजुत अशी झाली असल्यामुळेंच रोज रात्रीं येणारी 'स्पॅझम' जास्त येते. तो 'नर्व्हस डिसीज' आहे, असें डॉक्टर नेहमीं सांगतात व आम्हांला तेंच खरें वाटतें. पण याबद्दल स्वतःची समजूत कशी पडेल, या विवंचनेंत आम्ही बराच वेळ तशाच बसलों होतों. हें दुखणें परिणामाचें खास नाहीं. अतिशय दगदग व त्रास पडल्यानें इतकें वाढलें आहे. महाबळेश्वरीं अगर दुसरे कोठें हवेवर गेलों व कामाचा बोजा कमी होऊन चांगली पुरेशी विश्रांति मिळाली, कीं, लागलेंच बरें वाटूं लागेल. खरें पाहिलें तर काळजी करण्यासारखें दुखणें काय आहे! ताप नाहीं, खोकला नाहीं, अन्नाची अरुचि नाहीं, एक रोज रात्रीं नेमल्या वेळीं हिंवासारखें येणारें हें दुखणें मात्र नवीन जडलें आहे, हें खरें आहे. हें कशापासून आहे, याबद्दल स्वतःला काय कळलें आहे व इतकी काळजी कां वाटत आहे हें मात्र आपल्याला समजत नाहीं. पण याबद्दल खरो-खरीच कांहीं काळजी करण्यासारखें नाहींना? असें मीं सगळ्या डॉक्टरांना एकीकडे विचारून घेतलें आहे व त्यांनींही मला खात्रीनें सांगितलें आहे, कीं, हें दुखणें खरोखरींच भिण्यासारखें नाहीं. स्वतःला कल्पना वाटते तसें दुखणें काळजीचें नसून फक्त बाहेरील शिरागत आहे. हें खरें आहे असें म्हणावें तर स्वतःची ही उलट समजूत अगदीं ठाम कशी झाली? खात्री करून घेतल्यावांचून अशी समजूत कधीं व्हावयाची नाहीं. मग हें आहे तरी काय? डॉक्टर तर आपल्याला फसवीत नसतीलना? असें कालपरवांपासून माझे मनांत येऊन अगदीं चैन पडेनासें झालें आहे. जवळ बोलते वेळीं कितीही धीर आणला तरी सर्व दिवस एकसारखें धस् धस् होतें, व नसती काळजी वाटून व कांहीं तरी मनांत येऊन मन अगदीं खळबळून जातें. आतां करावें तरी काय, तें समजत नाहीं." इतकें बोलल्यावर मला पुढें बोलवेना.

हें पाहून वर्न्संनाही फार वाईट वाटलें. पुष्कळ वेळ असाच गेल्यावर त्या म्हणाल्या "डॉक्टरांनीं कांहीं सांगितलें तरी दुखणें काळजी करण्या-

सारखें दिसतें. देवाला आपली सगळयांची काळजी आहे, तो संभाळील. खरा डॉक्टर व वैद्य तोच आहे, बाकी डॉक्टर व वैद्य सर्व नांवाचेच. त्यांच्या हातांत असेल तितकें ते करतात. अंबाबाईला अनुष्ठान चाललेंच आहे, तिला सर्व काळजी आहे. तिच्यावर भार ठेवून तूं स्वस्थ मनानें रहा. असा धीर सोडूं नकोस. डॉक्टरबिक्टरचें आम्हांला कांहीं समजत नाहीं; पण तूं हुषारीनें वागलीस म्हणजे तुझ्याकडे पाहून आम्हांलाही धीर येतो. तो तूं असा धीर सोडूं नकोस बाई. घरच्या लक्ष्मीनें असें वेळीं अवेळीं डोळयांतून पाणी काढूं नये."

इतकें बोलणें झाल्यावर औषध देण्याची वेळ झाली म्हणून मी वर उठून गेलें. औषध दिलें, बराच वेळ जवळ बसलें, इकडच्या तिकडच्या गोष्टी बोललें, सकाळीं कांहीं पत्रें आलीं होतीं त्यांचीं उत्तरें काय लिहूं म्हणून विचारून घेतलें. बाहेरून हें सर्व करीत होतें, पण अंतःकरण ठिकाणावर नव्हतें. चांगली जवळ बसलेली असतांना व गोष्ट बोलत असतांना कांहीं कारणाशिवाय छाती भरून डोळयाला पाणी येऊं लागावें. मी मोठ्या धीरानें ही स्थिति झांकी व कांहीं तरी निमित्तानें दुसरीकडे पाहीं अगर चटकन ग्यालरींत उठून जाई. असें होऊं नये म्हणून मीं आपल्या मनानें किती प्रयत्न केला तरी त्याचें कांहीं चालत नसे. आतां ही स्थिति स्वतःच्या लक्षांत येऊं द्यावयाची नाहीं, एवढीच काय ती माझी उत्कट इच्छा असल्यामुळें त्या धोरणानें वागणें हेंच माझ्या हातांत होतें व तितकें मी करीत होतें.

नाहीं तरी अलीकडे ऑक्टोबर महिन्यापासून स्वतःच्या मनाची स्थिति वेगळीच झाली होती. ऑगस्ट, सप्टेंबर, ऑक्टोबर या तीन महिन्यांत आपल्या दुखण्याबद्दल स्वतःला जी काळजी वाटत असे, 'हा आजार कशापासून झाला आहे, कोणत्या औषधानें याला बरें वाटेल, याबद्दल आपलें अनुमान काय आहे, डॉक्टरचें म्हणणें काय पडतें' वगैरे संबंधानें रोज सहज बोलणीं चालत त्यांत काळजीचा व चौकशीचा भाग दिसे; पण

औदासिन्य किंवा निराशा दिसत नसे. तेव्हांही नित्याप्रमाणें कामकाजांत सर्व वेळ जाई; पण मन कामांत गुंतलेलें असेल तेव्हां कोणी घरचें अगर बाहेरचेंही मनुष्य आलें तरी काम एकीकडे ठेवून अगर बंद करून त्याच्याशीं बोलत बसावयाचें नसे. लिहिणें अगर वाचन जें काय चाललें असेल तें चालावयाचेंच. त्यांतच एकदां बसा म्हणून म्हणावयाचें व मधून मधून "बोला मी ऐकत आहें," अशा अर्थानें त्याच्याकडे पहावयाचें, अगर कांहीं तरी पुढें विचारण्याच्या अर्थाचें एखादें वाक्य बोलावयाचें, म्हणजे सांगणाराचें बोलणें पुन्हां सुरू होई. अशा रीतीनें दोन्हीं कामें चालत. घरच्यापैकींही कोणी वर गेलें, कीं, "कां आलांत? काय काम आहे?" वगैरे चौकशी करावयाची, थोडें बोलावयाचें व मग आपल्या कामाला पुन्हां सुरुवात करावयाची, असें धरलें होतें. तें आतांशा सर्व उलट दिसूं लागलें. आतांशा दुखण्यासंबंधानें स्वतः काळजीचा एक उद्गारही काढावयाचा नाहीं. दुसऱ्यानें कांहीं दुखण्याबद्दल विचारलें, तर, नुसतें म्हणावयाचें, कीं, "आहे, बरें चाललें आहे. कधीं बरें, कधीं वाईट असावयाचें. शरीराबरोबर व्याधि ही असावयाचीच. त्याचें काय? जोंपर्यंत कामधंद्याकडे मन लागतें, तोंपर्यंत कांहीं हरकत वाटत नाहीं. औषध चाललेंच आहे, वाटेल थोडे दिवसांनीं बरें."

आतां जी इजा होईल ती मुकाट्यानें सोसावयाची,होतां होईल तों दुसऱ्याला कळूं द्यावयाची नाहीं, असा निश्चय दिसे. सारा दिवस वाचन व लिहिणें नित्याप्रमाणें बिनचूक चालावयाचें. वेळ बिलकूल फुकट जाऊं द्यावयाचा नाहीं. दिवसभर सारखें एके ठिकाणीं बसल्यानें अगर छातींतील आजारामुळें असेल, संध्याकाळच्या वेळीं हातपाय दुखत व पाठीला ओढ लागे, त्या वेळींसुद्धां वाचन बंद करावयाचें नाहीं. अधिक दुखत असेल तो भाग मात्र चेप किंवा चोळ म्हणून सांगावयाचें. एखादे दिवशीं छातींत कळा येत व हातांपायांस झटके बसत. तरी ही इजा होत असून बाहेर दाखवावयाची नाहीं, मुकाट्यानें सोसावयाची व मन शांत ठेवावयाचें. मी पाय अगर

पाठ चेपीत जवळ बसलें असेन तेव्हां प्रकृतीसंबंधानें जर कांहीं बोलत असेन तर चारदोन वेळ विचारल्यावर एखाद्या गोष्टीचें उडवाउडवीचें उत्तर द्यावयाचें, नाहीं तर वाचण्यच्या नादांत ऐकूं आलें नाहीं अशावारीच न्यावयाचें. वाचन चाललें असतांनासुद्धां मन सारा वेळ कांहीं गंभीर व खोल विचारांत गुंतलेलें असे; तथापि शांत आहे, असें दिसे. मानसिक सामर्थ्यापुढें शारीरिक व्यथेचें कांहीं चालूं द्यावयाचें नाहीं, असा जसा कांहीं निर्धारच केला असल्याचें वारंवार दिसे. बिछान्यावर पडल्यावर मात्र हा निर्धार चालत नसे. मग इकडून तिकडे वळतांना कण्हावयाचें. अमुक एक जास्त दुखत आहे तें चोळ, शेक किंवा चेप, असें म्हणावयाचें. या चेपण्याच्या व चोळण्याच्या नादांत कधीं कधीं झोंप लागे व ती तीनचार तासपर्यंतही टिके. कधीं कधीं मुळींच झोंप लागत नसे, त्या वेळीं मात्र उगीचच्याउगीच बिछान्यावर स्वस्थ पडून झोंप लागल्यासारखें दाखवावयाचें. हेतु हा कीं, जवळ बसणाऱ्या माणसाला सारखें जागरण पडूं नये. आपल्याला झोंप लागली असें वाटलें म्हणजे तास दोन तास त्यालाही झोंप मिळेल. अशा रीतीनें तीन किंवा चार तास मधून मधून झोंप लागावयाची. तरी सकाळीं उठण्याचा अवकाश, प्रातर्विधि आटोपून नित्यक्रमास सुरवात व्हावयाची.

रजा घेतल्यापासून अलीकडे चारपांच दिवस दुपारचीं जेवणें झाल्यावर आम्ही तास दोन तास सर्वजणें एक ठिकाणीं बोलत बसत असूं. यावेळीं स्वतः सहज म्हणून उद्गार काढलेले शब्द नेहमीं गंभीर, अर्थी असून प्रत्येक वाक्यापासून ऐकणाराला उपदेशच मिळावा, असे असत. आतांशा काळजीचें किंवा निराशेचें कांहीं बोलावयाचें नसे. धीरानें बोलावयाचें, दुसऱ्याची कांहीं भीति नाहीं असें दाखवावयाचें, मुलांशीं बळेंच बोलावयाचें व हंसावयाचें, असें चाले खरें, पण हें सर्व वरवर आम्हांला बरें वाटण्याकरितांच होत आहे, असें माझ्या मनांत येऊन मला मात्र बरें वाटत नसे.

अशा रीतीनें एकामागें एक दिवस चालले. चवदाव्या तारखेच्या सकाळीं दोन्ही पावलांवर बरीच सूज आलेली दिसली. रोजच्याप्रमाणें दोन्ही तिन्ही डॉक्टर येऊन गेले. त्यांना सगळ्यांना मीं ह्या सुजेचें कारण विचारलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें "सूज आली आहे याबद्दल कांहीं काळजी करावयाला नको. अशक्तपणामुळें रक्त बरोबर खालीं उतरत नाहीं इतकेंच."

तरी चवदाव्या तारखेचा सारा दिवस आमचा काळजींत गेला. रात्रीं जेवण झाल्यावर अर्धा तास वाचन झालें. रोजच्यासारखें औषधी तेल मी अंगाला चोळीत असतांना मुलींनीं गाणीं म्हटलीं व वन्सनींही भक्तिपर कबिराचीं व मिराबाईचीं कांहीं पदें म्हटलीं; तोंच साडेदहाचा ठोका पडला व नित्याची 'स्पॅझम' येण्यास सुरवात झाली. पंधरावीस मिनिटें झालीं तरी आज जांभई किंवा शिंक येईना. दोनतीन माणसें पंख्याचा वारा जोरानें घालीत होतीं, पण चैन पडेना. अधिकच जीव गुदमरूं लागला. अशा वेळीं वास देण्याकरितां डॉक्टरांनीं एक प्रकारच्या लांबट गोळ्या देऊन ठेविल्या होत्या. त्यांपैकीं एक एक रुमालांत घालून फोडून वास दिला. दोनतीन गोळ्या हुंगावयास दिल्यावर मग कोठें एकदांची एक शिंक आली व दोनतीन जांभया आल्या आणि हा आजार थांबला. प्रत्येक दिवशीं ही वेळ निघून गेली म्हणजे आजचा दिवस पार पडला, असें माझ्या मनांत येऊन मी देवाचे आभार मानीं. बाकी, जसें स्वतःला हें दुखणें परिणामाचें आहे असें वाटे, तितकेंच उलट मला तसें वाटत नसे. आंतून माझ्या मनाला धास्ती वाटे, तथापि देव आपल्या भक्तांना अत्यंत संकटांत पाडून मग त्या दुर्धर संकटांतून त्यांची सुटका करतो. अशा ज्या त्याच्या सहज लीला आपण नेहमीं वाचतों किंवा ऐकतों, त्यांपैकींच हीही वेळ नसेल कशावरून ? करमाळ्याच्या भयंकर दुखण्यांतून त्यानें वांचविलें, तो आतां का उपेक्षा करील? असें कधीं होणार नाहीं, अशी माझी दृढ समजूत असल्यामुळें असा भयंकर प्रसंग माझ्यावर तो आणणार नाहीं व हें दुखणें बरें होईल, अशी शेवटपर्यंत मला आशा होती.

याप्रमाणें त्या रात्रीं तीन साडेतीन वाजेपर्यंत झोंप आली नाहीं. मग स्वतःला झोंप लागली. म्हणून मीही आतां घटकाभर निजण्याच्या विचारांत होतें. इतक्यांत वन्सं आल्या व म्हणाल्या "कायग, कांहीं झोंपबीप लागली होती का? रात्रीं कांहीं अधिक त्रास झाला नाहींना?"

मीं म्हटलें "त्रास फारसा झाला नाहीं; पण रात्रींची 'स्पॅझम' रोजच्यापेक्षां जोराची आली व जास्त वेळ टिकली. त्यानें थकवा फार आला आहे. तीन साडेतीन वाजेपर्यंत मुळींच झोंप आला नाही. आज मोठा पंखा सारखा चालूच आहे. आज त्या माणसांनाही झोंप मिळाली नाहीं. स्वतःला तरी आतां अर्ध्या तासापूर्वींच झोंप लागली आहे."

तेव्हां त्या म्हणाल्या "तूं आतां बसूं नकोस. मुलांच्या पलंगावर तासभर जाऊन पड जा. जा आतां. बसूं नकोस. मी येथेंच बसून रहातें, खालीं जात नाहीं. तूं स्वस्थ मनानें घटकाभर पड."

असें ऐकून मी उठलें व पलीकडे जाऊन निजलें. प्रथम अर्धा पाऊण तास झोंप लागली, पण मला हांक मारिली असा भास होऊन मीं खडबडून जागी झालें तों फटफटलें होतें. म्हणून तशीच उठलें व प्रातर्विधि उरकून देवाला नमस्कार करून स्वतःच्या पलंगाजवळ गेलें तों स्वतःची झोंप नुकतीच होऊन डोळे उघडले होते व तोंडानें हळू हळू नित्याचे श्लोक म्हणणें चाललें होतें. तोंड निस्तेज दिसत होतें व त्याजवर विलक्षण थकवा दिसत होता. तें पाहून माझ्या पोटांत चरचरलें. म्हणून मीं पायांशीं जाऊन पांघरूण काढण्याचें निमित्त करून दोन्हीं पावलें पाहिलीं, तों गेल्या दोन दिवसांपेक्षां आज दोन्ही पायांवर सूज अधिक दिसली. हें पाहून माझ्या काळजानें अगदीं ठाव सोडला. हातपाय कांपूं लागले व छातींत विलक्षण धडकी भरली. तरी मी तशीच पाठीकडे बसून पाठ व पाय चेपले. त्यामुळें स्वतःला थोडें बरें वाटून स्वतः लागलीच उठून प्रातर्विधि उरकून दिवाणखान्यांत नित्याप्रमाणें बसणें झालें व वाचणाऱ्या मुलानें वाचनालाही सुरवात केली. सुमारें १०॥ वाजेपर्यंत हें काम झाल्यावर मग

स्नानास उठणें झालें. स्नान घालण्यास मी होतेंच. स्वतःची नजर सहज पायांकडे जाऊन मला म्हटलें "आज काय सूज जास्त आली आहे!"

मीं म्हटलें "नाहीं कांहीं, फार वेळ एका जागीं बसणें झाल्यानें ते भारावले असतील."

जेवावयाला बसल्यावर वन्संना पुन्हां सूज आल्याचें सांगितलें तेव्हां त्या म्हणाल्या, "आतां डॉक्टरांचें औषध पुरें करावें. त्यांना नाडीज्ञान नसतें कांहीं नसतें, नुसती नळी लावून काय समजणार आहे! तसेंच दुखण्याचें अंग आहे, काम जरा कमी करावें. सगळा दिवस वाचनाचा तरी कंटाळा नसेल का येत? त्यांचें म्हणणें आहे तर कांहीं विसावा घेऊन पाहावा."

हें वन्संचें बोलणें ऐकून थोडा वेळ कांहीं उत्तर दिलें नाहीं. जेवण चाललें होतें, पण त्यांतही लक्ष नव्हतें. घास तोंडांत न जातां तो किती वेळ तरी हातांतच घोळत रहावयाचा. एकदा उचलावयाचा, पुनः खालीं ठेवावयाचा. हा पदार्थ जवळ घे, तो दूर सार, अशांतच वेळ घालविणें चाललें होतें. मन कांहीं तरी विचारांत निमग्न होतें खास. हें वन्संच्याही लक्षांत येऊन कांहीं तरी बोलावें म्हणून त्या म्हणाल्या, "मग आतां महाबळेश्वरींच जावयाचें ना! तेथेंच गेलें म्हणजे बरें वाटेल; पण काम वाचन वगैरे फार करतां कामाचें नाहीं. डॉक्टर सांगतात तशी स्वस्थ पडून विश्रांति घेतली तर बरें वाटेल, नाहीं तर येथल्यासारखें चालविलें तर कोठेंही गेलें म्हणून काय सारखेंच!" असें म्हणून त्या गप्प बसल्या.

तेव्हां स्वतः म्हटलें "काय तुमची समजूत आहे कोण जाणें! मला तर राहून राहून याबद्दल आश्चर्य वाटतें. तुम्हांला असें का वाटतें, कीं, नुसत्या हट्टानें जाणूनबुजून मी हें दुखणें वाढवीत आहें; हा तुमचा दोष राहूं नये हें एक, व दुसरें आयुष्य असेपर्यंत मनुष्याला आपला उद्योग करतां यावा ह्या दोन्ही उद्देशांनीं तर रात्रंदिवस जीं कोणी घाल तीं औषधें मी घेत आहें. बाकी, औषधें व डॉक्टर काय करणार आहेत! तीव्र इजा कमी करणारीं तीं साधनें व यंत्रें आहेत, इतकेंच खरें समजावयाचें. हें का तुम्हांला समजत नाहीं? हीसुद्धां जेव्हां तेव्हां असेंच म्हणते, कीं, विश्रांति

द्यावी, विश्रांति द्यावी. विश्रांति म्हणजे काय! ज्यामध्यें मन रमतें, समाधान पावतें, बारीकसारीक वेदना सहज विसरल्या जातात, त्या संवयीच्या व करमणुकीच्या वाचनासारख्या गोष्टी सोडल्यानें विश्रांति मिळेल काय? ज्याला उगीच बसण्यांत विश्रांति वाटून सुख लागणार असेल तें त्याचें सुख त्यालाच लखलाभ असो! हातून कोणत्याही प्रकाराचें काम न होतां नुसतें पडून राहून निरर्थक आयुष्य घालविण्याची पाळी आली तर तें आजच संपलें तरी हरकत नाहीं, असें मनुष्याला वाटेल." असें म्हणून एक मोठा सुस्कारा टाकिला, व सगळ्यांचें जेवण झालें आहे कीं नाहीं हें पाहिल्यावर म्हटलें "उठाहो तुम्ही, माझेंही झालें आहे" असें म्हणून, माझ्या कडे पाहून व उगीच हंसल्यासारखें करून म्हटलें, 'आज तुमचा स्वयंपाक मन लावून खावा असा झालाच नाहीं. त्यांतून आज मलाही चांगलीशी भूक लागली नाहीं."

मीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. कारण, इतका वेळ ऐकलेल्या बोलण्यानें व विशेषेंकरून त्या शेवटच्या वाक्यानें माझें मन अतिशय उद्विग्न झालें होतें. केवळ स्वतःचें जेवणच होत होतें म्हणून मी मन अगदीं आंवरून धरून निरुपायानें इतका वेळ तेथें उभी होतें. पण आतां धीर निघेना. मुखशुद्धीचीं फळें व पानसुपारी जवळ ठेवून मी तशीच निघून वर गेलें. वर जाऊन दाराला आज आंतून कडी लावली व एका पलंगावर पडलें. त्यासरशी मला जी जोरानें उकळी आली तीं कांहीं केल्या किती वेळ तरी आंवरेना. पुष्कळ वेळानें तो वेग कमी झाला; पण मन अगदीं सैरभैर झालें होतें. काय संकट आहे व मी हें काय करीत आहें, हें माझें मलाच समजेनासें झालें. वेळेवारी, मी असें काय करीत आहे, असा माझा मलाच राग येऊन मी आपला आपल्याशीं निषेध केला व खालीं निघून गेलें; पण मनाला चैन पडेना. सारखी हुरहुर लागली. उगीचच्या उगीच गळा दाटून येऊन डोळ्यांला धारा लागावयाच्या. त्याला कांहीं वेळ किंवा ठिकाण लागतच नसे. असें झालें कीं, ती स्थिति मला आवरतां आवरतां पुरेसें होई. घटकेंत आशा व घटकेंत निराशा व तिच्यामागून कुकल्पना यांनीं काहूर करून

माझें चित्त अगदीं बावरल्यासारखें करून सोडलें होतें. रोजचीं करावयाचीं तीं सर्व कामें मी हातानें करीं; पण हें केवळ सवे संवयीनें होई. मन म्हणून कशांतही लागत नसे. फार वेळ कोठेंच वसवत नसे. अंमळ एकीकडे जाऊन पडेन व मनाला थोडें शांत वाटेल म्हटलें तरी चैन पडत नसे. खालीं बायकांमध्यें जाऊन बसावें तों चुकल्याचुकल्यासारखें वाटून वर केव्हां जाईनसें होऊन मी चटकन उठें व दिवाणखान्यांत जवळ जाऊन बसें, तरी मनाची स्थिति सारखीच. आपल्या मनासारखें जगांत कोणीही वैरी नसेल! मन चिंती तें वैरी न चिंती असें म्हणतात तें अगदीं खरें आहे, असें मला क्षणोक्षणीं वाटे. माझ्या दुष्ट मनानें कांहीं वेड्यावांकड्या कल्पना करूं नयेत म्हणून मी किती तरी शिकस्त करीत असें. मनांत वाटे, कीं, माझें मन उगीच रहात नाहीं, त्याला उपाय काय करूं? कोणाला शरण जाऊं? कोण माझी मावली होऊन हें संकट निवारण करील? देवा! माझी लाज तुला असूं दे. आजपर्यंत थोडीं का जिवावरचीं दुखणीं गेलीं? तेव्हां तेव्हां तूंच माझ्या धांवणीला धावलास व स्वतःचें वेळोवेळीं रक्षण करून ज्या मला या भाग्याच्या शिखरावर चढविलेंस, त्या आज मला तूं त्या शिखरावरून खालीं पायानें लोटून देशील काय? कधीं लोटणार नाहींस, असा मला भरवंसा आहे. नारायणा! मला समजूं लागल्यापासून माझ्या सर्व सुखाचा व आनंदाचा ठेवा काय तें एवढेंच ठिकाण आहे हें तूंच जाणत आहेस. तें तूंच संभाळ! एवढी भिक्षा घाल. यापेक्षां अधिक मोठें सुख मीं दुसरें कशांतच मानिलें नाहीं. संसारांत मला मुलेंबाळें नाहींत ही उणीव सुद्धां मला कधीं भासली नाहीं इतकी मी याच सहवासांत संतुष्ट व गर्क आहें. राजेरजवाडे, संस्थानिक, जहागीरदार, यांच्या बायका संततिसंपत्तीनें व अधिकारवैभवानें कितीही थोर असल्या तरी माझ्यापेक्षां त्यांचें सुख अधिक खास नसेल. स्वतःची जोड मिळाल्यानें मला आज जी धन्यता व जें समाधान होत आहे तिला उपमा नाहीं. देवा, हें सारें देणारा तूंच आहेस व रक्षण करणाराही तूंच समर्थ आहेस."

याच तऱ्हेचे विचार सारखे माझ्या मनांत घोळूं लागल्यानें कोठेंच चैन पडेनासें झालें. इकडे स्वतःचीही अशीच कांहीं तरी विशेष स्थिति झाली असावी. मनाला सुख दुःख किंवा आशा निराशा कांहींही वाटत असलें तरी सहज चेहऱ्यावर या विकारांची छाया कधीं दिसावयाची नाहीं, असें नेहमींच असे; मग आतां तर जाणून बुजून सगळ्या गोष्टी, तशाच मनाच्या व शरीराच्या वेदनासुद्धां केवळ संयमनानें आकळून धरल्या असाव्या, असें माझ्या मनांत येऊं लागलें. अलीकडे अलीकडे मी मात्र सदोदित जवळ बसावें, इकडे तिकडे जाऊं नये, असें स्वतःला वाटत असे व मलाहि जरी असेंच वाटे तरी क्षणोक्षणीं बदलणारी मनाची अनावर स्थिति झांकण्याकरितांच कांहींतरी निमित्त करून मधून मधून मला थोडा वेळ उठून जावें लागे. अशी मी उठूं लागलें म्हणजे माझ्या हाताचें बोट धरून ठेवून म्हणावयाचें कीं,"कांहीं नको जावयाला.कोठें जातेस आतां ? नुकती दुखण्यांतून उठली आहेस,उगीच खालींवर हेलपाटे किती घालावयाचे. काय करावयाचें असेल तें मुलींना सांगावें, नाहीं तर एखाद्या नोकराला वर उभें राहण्यास सांगावें, म्हणजे तुला ये जा करावयास नको."

असें म्हटल्यावर मी नुसतें होय म्हणून तशीच बसें; पण मनाची स्थिति अधिक चमत्कारिक होई. सगळा दिवस मी बहुतक जवळच बसें, बोलें, पण होतां होईलतों बोलतांना तोंडाकडे म्हणून पहावयाचें नाहीं. दृष्टादृष्ट होण्याची वेळ चुकवावयाची, असें धोरण असे.

हें माझें झालें; पण स्वतःच्या मनांतसुद्धां असेंच कांहीं असेल असें मला आपलें वाटे. सर्व वेळ मनामध्यें दुष्ट व सुष्ट कल्पनांचें काहूर माजल्यामुळें माझें मन भेदरल्यासारखें झालें होतें. कदाचित् दृष्टादृष्ट झाली तर या मुद्दाम आंवरून धरलेल्या स्वतःच्या मनाचा सुद्धां बांध लागलीच ढांसळेल, खचित राहणार नाहीं, मग माझी ती कथा काय, असें मला वाटे. भुंग्यानें पोंखरून ठेवलेल्या पण वरून अगदीं शाबूत व मजबूत दिसणाऱ्या तुळईसारखी मनाची अवस्था झालेली अशीं आम्ही दोघेंही मोठ्या कष्टानें दिवस काढीत होतों. तरी मी अगदीं वेडी ! अजूनही हें दुखणें बरें होईल

अशा आशेच्या नादांतच मी कित्येक तास काढीं व तेवढाच वेळ मला सुखाचाही वाटे.

पण ईश्वरी इच्छा निराळीच होती! तिची कल्पनाही मला नव्हती! म्हणून अंतःकरण करपून टाकणाऱ्या काळजींतही ज्या स्थितीला मी सुख म्हणून मानीत होतें तें सुख पुढें पुरतें चोवीस तासमुद्धां टिकलें नाहीं! ज्या देदीप्यमान तेजोमय सौभाग्यसूर्याच्या प्रकाशांत मी मोठ्या भूषणानें व खऱ्या आनंदानें एकसारखीं २७ वर्षें वागत होतें, ते प्रत्यक्ष सेवा घेणारे दिव्य सूर्यरूपी पाय मला अंतरल्यामुळ अत्यंत दुःखरूप निबिड अंधारांत चांचपडत रहाण्याचा प्रसंग येऊन पोहोंचला. तो दिव्यसूर्य एकाएकीं मावळून सर्वत्र निबिड काळोख पडला! शिव! शिव!! किती मी भाग्यहीन!!!

* * * * * *

कइं तो दिवस देखेन मी डोळां।
कल्याण मंगळामंगळाचें॥ १॥
आयुष्याच्या शेवटीं पायांसवें भेटी।
काळिवेरें तूटी झाल्या त्वरें॥ २॥
सरो हें संचित पदरींचा गोंवा।
उतावीळ देवा मन झालें॥ ३॥
पाउलापाउलीं करितां विचार।
अनंत विकार चित्ता अंगीं॥ ४॥
म्हणवुनी भयाभीत होतो जीव।
भाकितसे कींव अट्टाहासें॥ ५॥
दुःखाच्या उत्तरीं आळविले पाय।
पाहणें तों काय अजुनी अंत॥ ६॥
तुका म्हणे होईल आइकिलें कानीं।
दीन उद्धरणीं धांव घाली॥ ७॥